**प्रकाशन क्र. ६६**

**प्रकाशक**
सुरेश जोशी
७९०, सदाशिव पेठ, 'साईकृपा' पुणे ३०.

**टाइपसेटिंग**
प्रमोद बापट
प्रमोद प्रिंटर्स, ११२०, सदाशिव, निंबाळकर तालीम चौक, पुणे ३०

**मुद्रक**
प्रमोद बापट
स्मिता प्रिंटर्स, १०१९, सदाशिव पेठ, नागनाथ पाराजवळ, पुणे ३०



**मुखपृष्ठ/मांडणी**
रविमुकुल
८९३, सदाशिव, 'लक्ष्मी निवास', पुणे ३०

**प्रथमावृत्ती**
फेब्रुवारी १९९१

**मूल्य १२५ रुपये**

**Put on the best clothes,**
**Whenever you are broke**

—एरॉल फ्लीन



ऋणनिर्देश

'किर्लोस्कर' मासिकाच्या १९८१ सालातील जानेवारी महिन्याच्या अंकात 'ज्ञीपरकाठीचे कीयेव' हा लेख प्रसिद्ध झाला होता. सदर पुस्तकात त्या लेखाचा वापर केला आहे. 'किर्लोस्कर' मासिकाचे आम्ही आभारी आहोत.

लेखक, प्रकाशक

**मा**लवण

## मालवण

भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर वसलेल्या मालवण ह्या निसर्गरम्य गावी २४ जून १९४१ रोजी पहाटे ४ वाजून ५ मिनिटांनी माझा जन्म झाला असे माझ्या आजीने मला सांगितले. ही माझी आजी कल्याणी मालवणकर उंचीपुरी, गोरी, प्रेमळ होती. मी तिला आई म्हणून हाक मारायचो. माझी जन्मदात्री मंदाकिनी हवालदार ही माझ्या आजीची एकमेव मुलगी होती. आजीला तीन मुलगे होते. मी माझ्या आईला ताई म्हणायचो आणि वडिलांना दादा. वडील श्रीकृष्ण हवालदार हे मूळचे कोल्हापूरचे होते. स्वप्नाळू, रोमँटिक प्रवृत्तीच्या माणसाने वयाच्या अवघ्या एकविसाव्या वर्षी माझ्या आईशी प्रेमविवाह केला. १० मे १९४० रोजी त्यांचे लग्न झाले. पदरी विशेष पैसा नसताना, मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण, फालतू पगाराची नोकरी. अशा परिस्थितीतही त्यांनी उत्साहाने लग्न केले आणि ह्या विवाहाला संमती दिली माझ्या आजोबांनी. दत्तोपंत मालवणकर हे माझे आजोबा म्हणजे एक वल्ली गृहस्थ होते. मूळचे कराचीचे. कराचीहून महाराष्ट्राच्या किनारपट्टीवर स्थलांतरित झालेल्या मराठा कुटुंबांपैकी ते होते. माणूस मूळचा म्हणे खूप श्रीमंत. मालवणात घर, जमीनजुमला, नारळाची झाडे वगैरे त्यांच्या मालकीची होती. माझी आजी ही त्यांची तिसरी बायको. माझ्या आजीपासून त्यांना संततीप्राप्ती झाली. मी त्यांची दुसरी बायको पाहिली. ती माझ्या वडिलांची दूरची बहीण होती. तिच्या मार्फतच माझ्या वडिलांचा मालवणकर कुटुंबाशी परिचय झाला असावा.

आजोबांना दारू पिण्याचे व्यसन होते. त्या व्यसनापायी त्यांनी मालवणातील मालमत्ता विकून टाकली म्हणे. त्यांना सर्कस पाहण्याची खूप आवड होती. मालवणात आलेल्या सर्कशीचा खेळ सबंध मालवण गावाला स्वखर्चाने दाखवत, असे आजी सांगायची. माणूस दिलदार होता. हिंमतवान होता. गेलेल्या संपत्तीचा चकार शब्दाने कधी उच्चार केला नाही. उलट पुढे पुणे ते देहूरोड ही कष्टाची नोकरी त्यांनी केली. प्रत्येक पगारादिवशी मला खूप खाऊ आणायचे. दिवाळीला फटाके आणायचे. घरात गणपतीची पूजा उत्साहाने करायचे; पण त्यांच्या ह्या सर्व चांगुलपणावर त्यांचे संध्याकाळचे अतिरेकी मद्यपान पाणी पाडायचे. दारू चढल्यानंतर त्यांना भांडण करायची खुमखुमी यायची. मोठ्यांदा ओरडून सर्वांच्या ४२ पिढ्यांचा उद्धार करीत.

आजोबांना खर्च लिहून ठेवायची सवय होती. कधी कधी मला ते लिहायला बसवत. अशा वेळी खर्चात 'W' असे अक्षर लिहायला सांगत. त्या 'डब्ल्यू'चा मला अर्थ समजायचा नाही. पुढे पुढे 'W' म्हणजे 'वाईन' असा अर्थ समजला. कधी कधी ते मला पुण्यातील मंडईत खरेदीसाठी नेत असत. मग परतताना जिलेबी खाऊ घालत. एकदा ते मला दारूच्या गुत्त्यात घेऊन गेले. तेव्हा दारूच्या पिंपावर 'बेवडा' असा नवा शब्द मला समजला. मी शाळेत शिकताना अभ्यासात हुशार होतो. दारूच्या नशेत ते मला अभ्यासासाठी विलायतेला पाठवण्याचे आश्वासन देत. मी खूष व्हायचो.

मालवणात आजोबांच्या ज्या घरात माझा जन्म झाला, त्या घराच्या माजघराचा एक खूप मोठा उंबरा आठवतो. बालवयात मला तो उंबरठा ओलांडता यायचा नाही. एवढी एकच तेथील आठवण. माझ्या दूध पिण्याची सोय म्हणून आजोबांनी एक शेळी विकत घेतली. तिचे दूध मी तुडुंब प्यायचो आणि भरपूर ओकायचो.

## कोल्हापूर

'पो' 'पो' असा कर्णा वाजणाऱ्या मोटारीतून मला मालवणातून कोल्हापूरच्या घरी आणण्यात आले. तुकाराममामा नावाचा ड्रायव्हर होता. कोल्हापुरातील लक्ष्मीपुरीतील कोल्हापूर बँकेसमोरच्या फाटक बिल्डिंगमध्ये

दादांनी जागा भाड्याने घेतली होती. पी. डब्ल्यू. डी. मध्ये त्यांना कारकुनाची नोकरी मिळाली. वस्तुतः मंगळवार पेठेत त्यांचा वडिलोपार्जित वाडा होता; पण त्या जुनाट वास्तूत मला व ताईला नेण्याचे त्यांनी कटाक्षाने टाळले. जर त्यांनी मला त्या वाड्यात राहायला ठेवले असते, तर माझ्या जीवनाला भलतीच दिशा लागली असती.

दादा महत्त्वाकांक्षी होते. पुरोगामी विचारांचे होते. काळाला अनुरूप त्यांच्यावर डाव्या मतप्रणालींचा पगडा होता, पण त्यांनी स्वतःची मते कुणावर लादली नाहीत.

माझ्यावर उत्तम संस्कार घडावेत अशा कटाक्षाने ते वागत. कोणताही बाप स्वतःच्या अपूर्ण महत्त्वाकांक्षा मुलामध्ये रुजवतो. मी सामान्य होऊ नये, असामान्य व्हावे. पाचपन्नासांपैकी कुणी एक होऊ नये, तर एक्कावन्नावा पुरुष व्हावे, लौकिक मिळवावा. मात्र भरपूर धनसंचयाची आकांक्षा त्यांनी माझ्या मनावर बिंबवली नाही. मी विद्वान व्हावे, खूप शिकावे, नामवंत व्हावे अशी त्यांची इच्छा होती. पुढे पुढे मी नट व्हावे असे त्यांनी खूप प्रयत्न केले. कारण त्यांना स्वतःला नट व्हायचे होते. कोल्हापूरच्या विद्यापीठ हायस्कूलमध्ये ते शिकत होते. मा. विनायक, गजानन जागीरदार ही माणसे त्यांची शिक्षक होती. त्यामुळे चित्रपट, नाट्यसृष्टीचा दादांवर प्रभाव होता.

जगप्रवासाची महत्त्वाकांक्षा त्यांनी माझ्यात प्रयत्नपूर्वक रुजविली. मला आठवते, माझ्या खोलीतील भिंतीवर त्यांनी जगाचा नकाशा टांगून ठेवला होता. कधी कधी मला ते म्हणत : "ही पहा अमेरिका, हा पहा रशिया. हे देश मोठेपणी तू बघायला जा. विलायतेत शिकून मोठा हो." जेव्हा जेव्हा एखाद्या देशाकडे मी प्रथम जातो तेव्हा तेव्हा विमानात मला दादांचे शब्द आठवतात. डोळ्यांसमोर जगाचा नकाशा दिसतो. जगाचा आणखी नवा भाग पाहिला अशी परतताना मनात समाधानाची भावना असते.

जगप्रवासाबरोबरच पुस्तकांची व वाचनाची आवडही दादांनी माझ्यात बिंबवली. माझ्या सातव्या वाढदिवसापासून ते बाराव्या वाढदिवसापर्यंत प्रत्येक वेळी त्यांनी एकेक पुस्तक भेट दिले. पुढे आर्थिक दुरवस्थेपायी हा प्रघात त्यांनी बंद केला.

कारकुनी करताना ते राजाराम टॉकीजमध्ये अर्धवेळ नोकरी करीत. त्यामुळे

मला सिनेमा फुकट बघायला मिळत. चक्क प्रोजेक्शन रूममध्ये बसून मी सिनेमा पाहायचो. राजाराम टॉकीजच्या आवारात मी खेळायचो. चित्रपटांच्या मी अगदी जवळ गेलो शालेय जीवनात पदार्पण करण्यापूर्वी.

लक्ष्मीपुरीतील 'कन्या-कुमार शाळे'त मला दाखल करण्यात आले. आमच्या घरापाशी दोन मुली राहात होत्या. पैकी विमल रानडे थोडीशी मोठी होती. दुसरी विजयमाला पाटील ही एका जैनधर्मीय कुटुंबातील होती. दोघी माझ्या मैत्रिणी होत्या. कोल्हापुरात माझे कुणी बालमित्र बनलेच नाहीत. मला शाळेत पहिल्या दिवशी नेण्याचे काम विजयमालाने केले. प्रथम मी शाळेत जाण्यास घाबरत होतो. पुढे सवय झाली. पाटीवर सरस्वती काढण्यात मी तरबेज बनलो. त्या शाळेच्या संचलनाचे काम दोन बहिणी करत होत्या, एवढे मात्र आठवते. बाकी कोल्हापुरातील शाळेच्या आठवणी विशेष नाहीत.

दुसरे महायुद्ध संपले त्या दरम्यान दादांनी फार मोठी बाजी मारली. जवाहरलाल नेहरूंच्या भगिनी कृष्णा हाथीसिंग यांच्या 'Prison Days of Naini' या पुस्तकाचा मराठी अनुवाद त्यांनी केला. पुण्याच्या कॉन्टिनेंटल प्रकाशनाने 'नैनीच्या तुरुंगात' हे दादांचे पुस्तक छापले. दादा विलक्षण आनंदित झाले. त्या पुस्तकाच्या शंभराहून जास्त प्रती त्यांनी लोकांना भेट म्हणून दिल्या. पुढे पुढे त्या पुस्तकाची एकही प्रत त्यांच्यापाशी उरली नाही.

पुस्तकामुळे नामवंत बनल्यानंतर दादांचे मन पी.डब्ल्यू.डी. च्या नोकरीत रमेना. 'पुण्यात पेशव्यांसारखा राहीन' असा ध्यास त्यांनी मनी घेतला. कोल्हापूर सोडायचे व पुण्यात लेखनावर चरितार्थ चालवायचा असा त्यांनी निश्चय केला. कोल्हापुरात ताईची प्रकृती वारंवार बिघडायची. तेव्हा पुण्यात स्थायिक झालेल्या आजोबांकडे ताईसह मला आणायचे असा त्यांनी बेत आखला.

वाफेच्या इंजिनाच्या आगगाडीत बसून, मिरजेला गाडी बदलून आम्ही पुण्यात आलो. मी तेव्हा सुमारे सहा-सात वर्षांचा होतो.

## पुणे

पुण्यातील आगमन ताबडतोब सुखावह ठरले. डेक्कन जिमखान्यावरच्या बाल शिक्षण मंदिर ह्या शाळेत तिसरीच्या वर्गात मला दाखल करण्यात आले.

तेव्हा ही शाळा बराकीवजा बैठ्या गोल इमारतींमध्ये भरत होती. समोर डेक्कन जिमखान्याचे क्रिकेटच्या खेळाचे मैदान होते.

मी बिचकत वर्गात प्रवेश केला. खणखणीत आवाजाच्या व फताड्या कानांच्या एका मुलाने त्याच्या शेजारी बसण्यासाठी मला बोलावले. त्याचे नाव अनिल केळकर. आजही पन्नाशीत असताना तो माझा छान मित्र आहे. तिसरीच्या वर्गात एकूण सहा अनिल होते असे लौकरच समजले. अनिल ठणठणीत आवाजात ढेकणाचा पोवाडा गायचा. पुढे तो बॅडमिंटनपटु झाला. नौदलात, एक-दोन बूट कंपन्यांमध्ये नोकऱ्या केल्यानंतर त्याच्या मूळच्या उमद्या स्वभावात बदल झालेला नाही. त्याचे वडील नाट्यप्रेमी होते. मुलांच्या मित्रांना ते स्वतःच्या मित्राप्रमाणे वागवत. मला अठरावे वर्ष लागल्याचे कळताच त्यांनी व्हिस्कीचा प्याला देऊ केला. आयुष्यात प्रथमच मी व्हिस्की चाखली. तीसुद्धा उमद्या संगतीत. दारू उघडपणे प्यायची, ती चोरून प्यायची नाही, असा तेव्हापासून माझा शिरस्ता बनला. आश्चर्य म्हणजे नाटक-सिनेमा क्षेत्रात काम करताना मी दारू पीत नव्हतो. रशियन वकिलातीच्या माहिती खात्यात चांगल्या पगाराची नोकरी मिळाल्यानंतर, विवाह केल्यानंतर, सत्ताविसाव्या वर्षात पदार्पण केल्यानंतर मी व्हिस्कीपान नियमितपणे करू लागलो. बेभान होणे, अचकट-विचकट बोलणे, गलिच्छ वागणे ह्याचा मला तिटकारा आहे. शांत वातावरण, कला-साहित्यावर चर्चा, नर्म विनोद, विचारांची देवघेव ह्या गोष्टी संयत मद्यपान करताना मला आवडतात. मद्यपानामुळे माणसाचे तोटे होतात असे म्हणतात; पण माझे मात्र आयुष्यात फायदे झालेत. व्हिस्कीमुळे मला अनेक चांगले नवे मित्र लाभले, जगप्रवासाच्या संधी लाभल्या. एखाद्या नव्या शहरी गेल्यानंतर तेथील एक उत्तम बार शोधायचा असा मी प्रघात ठेवला. 'शंभर रुबल्स असण्यापेक्षा शंभर मित्र असावेत' अशा अर्थाची एक रशियन म्हण आहे. मी रशियन माणसांना म्हणायचो, "माझ्यापाशी शंभर रुबल आहेत, शिवाय शंभर मित्रही आहेत. प्रत्येक मित्र लाख मोलाचा आहे. म्हणून मी लखपती !"

मराठी चौथीत असताना एका छोट्या नाटिकेत काम करायचा योग आला. आमचे गायनाचे जोशी मास्तर त्यांच्या संगीत विद्यालयाचा वाढदिवस साजरा करीत. त्यानिमित्त त्यांनी छोटी नाटिका बसवली होती. मला त्या पौराणिक

नाटिकेत म्हाताऱ्याची भूमिका होती. धोतर नेसण्याची बरीच कसरत झाली एवढीच आठवण आहे. पुढे डेक्कन जिमखाना भावे स्कूलमध्ये संस्कृत भाषा शिकवणाऱ्या भिलवडीकर मास्तरांनी संस्कृत संवादात काम करण्याचा चान्स दिला. वार्षिक संमेलनात होणाऱ्या ह्या कार्यक्रमांमध्ये काम करणारे आमच्यासारखे विद्यार्थी अभ्यासाच्या तासांना दांड्या मारून पाठांतराचे बहाणे करीत; पण नाटकाचा खुळा नाद तेव्हाच नकळत लागला. शाळा-कॉलेजातील वार्षिक संमेलनाच्या नाटकांमध्ये भूमिका करता करता पुढे व्यावसायिक नट म्हणून मी वावरू लागलो.

नाटकांत कामे करताना एरवी शिस्तबद्ध वागावे, अभिनयाचा खूप अभ्यास करावा, कंठसाधना करावी हे विचार महाराष्ट्र नाट्य विद्यालयाचे संस्थापक श्री. प्रभाकर गुप्ते यांनी माझ्या मनावर ठसविले. नैसर्गिक मर्यादांमुळे कंठसाधनेत मला यश आले नाही, पण भूमिकांचा सांगोपांग अभ्यास करण्याची सवय लागली. स्तानिस्लावस्की पठडीची ओळख घडली. महाराष्ट्र नाट्य विद्यालयामार्फत सादर केलेल्या 'बुवा' ह्या नाटकाच्या अनेक प्रयोगांमध्ये डिंगाराम नावाच्या अवखळ मुलाची भूमिका मी केली. परगावी जाण्याची, विविध तऱ्हेच्या प्रेक्षकांसमोर नाटकाचा खेळ करण्याची सवय लागली. संवाद पटकन पाठ होणे, रंगभूमीवर सहज वावरणे ह्या माझ्या जमेच्या गोष्टी होत्या, पण आवाज मात्र वारंवार बसायचा. नाट्यशिक्षणाचा व्यक्तिमत्त्व डौलदार बनविण्यास फायदा होतो. श्री. प्रभाकर गुप्ते यांच्या मार्गदर्शनाचा पुढे मला खूप उपयोग झाला. महाराष्ट्र नाट्य विद्यालयाने महाराष्ट्र राज्य संस्कृत नाट्यस्पर्धेत भाग घेतला होता. 'मृच्छकटिकम्'मध्ये मी शकाराची भूमिका केली. सर्वसाधारणपणे विनोदी भूमिका करण्याचा माझा कल होता. शिडशिडीत अंगकाठी होती. लुकडा असेच मला म्हणत.

शाळेत, अभ्यासात मी हुशार होतो. परीक्षेत दुसरा किंवा तिसरा नंबर यायचा, पण पहिला नंबर पटकावणे कधीच शक्य झाले नाही. भाषांमध्ये गती होती. मराठी, इंग्रजीबरोबर लौकरच मी हिंदी भाषा अवगत केली. महाराष्ट्र राष्ट्रसभेची प्रवीण परीक्षा मी वयाच्या अवघ्या बाराव्या वर्षी उत्तीर्ण झालो. भूमिती हा विषय मला जमेना. चित्रकलेत अगदी शून्य. त्यामुळे एकूण मार्कांची टक्केवारी मार खायची. माझे अक्षर फार वाईट आहे.

अभ्यासातील हुशारीवर घरच्या आर्थिक परिस्थितीमुळे माझा हिरमोड व्हायचा. मध्यमवर्गीय गरिबी सर्वसामान्य गरिबीपेक्षा जास्त वाईट असते. गरीब असताना तुम्ही गरीब आहात असे सरळ सांगू शकता, पण मध्यमवर्गीय न जमणारे पैशाचे सोंग आणू पाहतो. त्यात मानसिक कुचंबणा होते. दादांची कमाई सुमार होती. नाव आणि प्रतिष्ठा होती, पण ताईच्या सतत आजारांचा खर्च त्यांना झेपेना. परिणामी मला नादाऱ्यांसाठी अर्ज करावे लागायचे. कपड्यांचा व पादत्राणांचा तुटवडा मला त्रासदायक व्हायचा. मात्र सरकारी फ्रीशिप होती. बहुतेक माझे शालेय शिक्षण मी माझ्या बुद्धिमत्तेच्या जोरावर केले, पण फ्रीशिपमध्ये टर्म फीचा समावेश नसायचा. सहा महिन्यांसाठी पाच रुपये टर्म फी होती. एकदा मला भर वर्गात उभे करण्यात आले. टर्म फीचे पैसे मी देणे होतो. शाळेची तशी नोटीस होती. शिक्षकांनी नाईलाजाने पैसे आणण्यासाठी मला घरी पाठविले. मी घरी आलो. ताईपाशी पैसे नव्हते. मी तसाच पैशाअभावी दोन दिवस घरात बसलो. सर्वांसमोर घडलेला तो अपमान मला जिव्हारी झोंबला. शिक्षणाबद्दल, दारिद्र्याबद्दल मनात अढी बसली.

दहाव्या-अकराव्या वर्षी शर्टाबाबत असाच माझा अपमान एका ओळखीच्या महिलेने केला. सणानिमित्त दादांनी एकदा माझ्यासाठी पिवळ्या रंगाचा कॉटन वूलचा शर्ट घेतला होता. शर्ट भारी होता. मी वारंवार तो शर्ट घालायचो. खास प्रसंगी वापरायला दुसरा शर्टच नव्हता. त्या बाईंकडे कसल्यातरी समारंभानिमित्त मी ताईबरोबर गेलो होतो. मला पाहताच त्या बाई पटकन म्हणाल्या, “अरे अनिल, किती वर्षपर्यंत एकच शर्ट वापरतोस ! नेहमी एकच रंगाचा !” मी गप्प राहिलो. मनाशी ठरविले, यापुढे रंगीत शर्ट वापरायचा नाही. कॉलेज शिक्षण संपवेपर्यंत थेट एकोणिसाव्या वर्षापर्यंत मी फक्त पांढरे कपडे वापरीत होतो. तोपर्यंत कपड्यांची टंचाई मी अनुभवत होतो. खऱ्या अर्थाने पैसे खिशात भरपूर खेळले. जेव्हा किमान दहा शर्टस् विकत घेण्याची ऐपत मला प्राप्त झाली, तेव्हाच मी रंगीत शर्ट वापरू लागलो. शर्टाबाबतचा गंड खूप वर्षेपर्यंत मनात टिकून राहिला.

हौशी रंगभूमीवरच्या यशामुळे नटाचा व्यवसाय घ्यावा असे मनात विचार येऊ लागले. दादा पत्रकार असल्यामुळे नाटक, सिनेमा फुकट पासांवर पाहायला मिळायचे. फडके, खांडेकर, नाथमाधव यांच्या पुस्तकांच्या वाचनात मी रमायचो.

एकदा बाबूराव गोखले यांच्या 'श्री स्टार्स' कंपनीच्या 'करायला गेलो एक' नाटकाचा प्रयोग मी विंगेत उभा राहून पाहिला. राजा गोसावीवर मी बेहद्द खूष होतो. त्याची भूमिका आपण करावी अशी इच्छा झाली. दादा नेहमी मास्टर विनायकांच्या व ग.दि. माडगूळकरांच्या आठवणी सांगायचे. मराठी चित्रपटांच्या सुवर्णयुगाच्या हकीकती ऐकून मी हरखून जायचो. एम. ई. एस. कॉलेजच्या (आताचे गरवारे महाविद्यालय) गॅदरिंगच्या नाटकांमध्ये मी कमालीचा यशस्वी झालो. विनोदी नट म्हणून कॉलेजात ख्याती मिळाली. प्रा. प्रभाकर तामणे दिग्दर्शक होते. प्रा. श्री. के. क्षीरसागर कौतुक करीत होते. प्राचार्य भटांनी तर कौतुकाने घरी जेवायला बोलावले. त्यांचा मुलगा शाळेत माझा बालमित्र होता.

प्रा. भटांबाबत या ठिकाणी मी एक कृतज्ञतापूर्वक आठवण सांगतो. एस.एस.सी. परीक्षेत मी प्रथम वर्गात उत्तीर्ण झालो होतो. बी.ए. संपवल्यानंतर आय.ए.एस. व्हावे असा बेत होता, पण कॉलेजमध्ये प्रवेश घेण्यासाठी दादांपाशी पैसे नव्हतेच. सवलत मिळावी म्हणून प्रा. भटांकडे अर्ज केला पण तो चुकीचा भरला होता. शेवटी प्रा. भटांनी मुद्दाम बोलावणे पाठविले व व्यक्तिशः माझी भेट घेतली. अवघ्या पंधरा रुपयांवर मला कॉलेजात प्रवेश मिळाला ! वय होते सोळा.

आर्थिक चणचण कमी व्हावी म्हणून मी शाळेत असताना स्वावलंबनाने पैसे मिळवावेत असा दादांचा प्रयत्न होता. त्या स्वावलंबनाच्या प्रयोगांमध्ये माझे कोवळे मन दुखावत होते. माझे मित्र वा सहाध्यायी श्रीमंत अथवा सधन कुटुंबातील होते. बंगल्यांमध्ये राहत होते. आमचा स्वतंत्र फ्लॅट जरी होता तरी घरात माणसांची बेसुमार गर्दी होती. वस्तुतः दादांनी आजोबांच्या घरात स्वतःच्या कुटुंबातील माणसे एकेक करून घुसवली होती. परिणामी गॅलरीत बाहेर झोपणे माझ्या वाट्याला आले होते. तसे घरात तिन्ही त्रिकाळ खायला भरपूर मिळत होते. पण दूधवाला, किराणावाला यांचे तगादे लागायचे. शाळेचे नवे वर्ष सुरू होताच मला नको नको व्हायचे. नव्या पुस्तकांसाठी, वह्यांसाठी पैसे नसायचे. शेवटी आठवीपासून मी वह्या विकू लागलो. माझ्या मित्रांनाच मी वह्या विकायचो. आप्पा बळवंत चौकातल्या ओळखीच्या दुकानदाराकडून स्वस्तातल्या वह्या घेण्यासाठी सायकल दामटत मी पळापळ करायचो. त्या धावपळीत जेमतेम मला माझ्या जरुरीच्या वह्या सुटायच्या.

दादांचे तत्त्वज्ञान त्या वेळी मनाला पटायचे नाही. “मला कुणी हजार रुपये पगार दिला तरी मी किराणा मालाच्या दुकानात पुड्या बांधायचं काम करणार नाही.” अशा फुशारक्या ते मारायचे. केवळ लेखनावर जगण्याच्या जिद्दीपायी ते आमची होरपळ करीत होते. पुण्याच्या दैनिक ‘प्रभात’ मध्ये ते नोकरी करायचे. पगार अगदी टुकार होता, पण लोकांची सहानुभूती खेचून घेण्याचे कसब त्यांच्या ठायी होते. चित्रपट-नाटकांवर सहृदय समीक्षणे लिहायचे. त्यामुळे नाट्य व चित्रपट सृष्टीत त्यांना अनेक स्नेही मिळाले. पहिल्या उमेदीत ‘पुढची पायरी’ नावाचे एक नाटक त्यांनी लिहिले होते. त्या नाटकाचे एका हौशी क्लबने एक-दोन प्रयोग केले होते.

दादांचे अक्षर फार वाईट होते म्हणून कधी कधी ते ताईला लेखनिक बनवायचे. पुढे पुढे मलाही बसवायचे. कधी कधी बातम्यांच्या तारांची भाषांतरे करवून घ्यायचे. नाटक व चित्रपटांवर परीक्षणे लिही असे सांगायचे. लोकांना वाटायचे श्रीकृष्ण हवालदारांनी लिहिले. मोबदल्यादाखल मला फुकट पासाची लालूच होती. त्यामुळे बेधडक लेखनाला आरंभ करण्याची मला सवय लागली. लेखनाला सुरुवात करण्यापूर्वी माणसाला मनात एक प्रकारची धास्ती असते. ह्या धास्तीवर मी ऐन शाळकरी वयात मात केली. पुढे पुढे अमेरिकन माहिती खात्याकडून पुस्तके अनुवादासाठी यायची. रशियन वकिलातीच्या माहिती खात्याकडूनही पुस्तके यायची; पण त्यांचा मोबदला अमेरिकन पुस्तकांच्या मानाने फार कमी असायचा. दादांना ‘प्रभात’च्या कामाबरोबर ही जादा कामे झेपत नसत. शिवाय ‘हंस’,‘मोहिनी’ मधील त्यांची लोकप्रिय सदरे चालवायची. मग त्यांची अनुवादाची कामे मी धडाधड करू लागायचो. त्यातून ते मला निम्मे पैसे देत. लेखनावर पैसे मिळवायचा आरंभ मी फार लौकर केला. अर्थात दादांना नाव होते. मातब्बर संपादक माझ्यासारख्या पोराला काय पुसणार ! लेखन आपल्याला अवगत आहे असे हळूहळू माझ्या ध्यानात आले. भरपूर, निवडक वाचन, कल्पनाशक्तीचा वापर यांचा मला फायदा झाला. मात्र कथालेखन व कादंबरीलेखन विशेष केले नाही. तसा प्रयत्नही केला नाही. फक्त एक-दोन कथा लिहिल्या. मग त्या दिशेने प्रयत्न केलेच नाहीत. जगावेगळ्या माणसांच्या मुलाखती घेण्याचा छंद मला लागला. अनुवाद तर दादांच्या तोडीने लिहायचो. पुढे दादा क्षयाच्या विकाराने आजारी झाले तेव्हा त्यांच्याने काम

होईना. त्या वेळी मी व्यावसायिक रंगभूमीवर धडपडत होतो. मग मी 'हंस' मध्ये 'अद्‌भुत' मध्ये विदेशी चित्रपट कथा अनुवादित करायचो. नाव मात्र दादांचे येत होते. श्री. अनन्त अंतरकर व श्री. ग. वा. बेहरे दादांना पैसे ठरल्याप्रमाणे देत होते. अर्थात त्यांना आमचे 'गुपित' माहीत नव्हते.

*

# व्यावसायिक रंगभूमीवर

एम. ई. एस. कॉलेजात एफ. वाय. आर्टस व इंटर आर्टस अशी दोन वर्षे मी शिकलो. त्या दोन्ही कॉलेजच्या वार्षिक स्नेहसंमेलनांच्या नाटकांमध्ये माझ्या विनोदी भूमिका गाजल्या. अशा प्रसंगी आचार्य अत्र्यांची नाटके हमखास यशस्वी व्हायची. 'पाणिग्रहण' व 'साष्टांग नमस्कार' ही दोन नाटके केली. त्याच वेळी मी दोन्ही वर्षे ड्रामा सेक्रेटरी म्हणून निवडून आलो होतो. गॅदरिंगच्या वेळी सर्व खात्यांच्या सेक्रेटरींनी फोटोसाठी अंगात कोट घालायची प्रथा होती. माझा आपला नेहमीचा पांढरा बुशशर्ट व पांढरी पँट असा गणवेष होता. कोट शिवायची ऐपत नव्हती. अशा वेळी प्रभाकर लेले नावाचा मित्र मदतीला धावला. दोन्ही वर्षे त्याने स्वतःचा कोट मला तात्पुरता दिला.

त्या दोन्ही नाटकांमध्ये बाल कलाकार आम्ही आणले. आल्हाद धर्माधिकारी आधीचा ओळखीचा होता. आज चित्रपटसृष्टीत गाजलेली अभिनेत्री रोहिणी हट्टंगडी हिला आम्ही बाल कलाकार म्हणून आणले होते. तिचा मामा माझा वर्गमित्र होता. त्याच्या ओळखीने आम्ही रोहिणीला आणले होते. बहुधा रंगभूमीवरचे तिचे हे पहिले पाऊल असावे.

रंगभूमीवरच्या यशाबरोबर कौतुक येते, पण त्याच्या जोडीला काही लोकांचा छुपा मत्सरही प्रत्ययाला येतो. 'साष्टांग नमस्कार' नंतर मी कॉलेजात गाजत होतो. तेव्हा आंतरमहाविद्यालयीन एकांकिका स्पर्धेत कॉलेजने भाग घ्यायचे ठरले होते. एकांकिका प्रा. प्रभाकर तामणे यांची 'स्वप्नफुलांच्या पाकळ्या' होती. मी नायकाची भूमिका करीत होतो. स्पर्धेआधी चाचणी म्हणून

आमच्या कॉलेजात एकांकिकेचा प्रयोग केला. त्या दिवशी विद्यार्थ्यांच्या एका कंपूने आधी ठरवूनच, प्रयोग पाडायचा असा बेत केला होता. रंगभूमीवर मी प्रवेश करताक्षणी टाळ्या-शिट्या सुरू झाल्या व 'xxx च्या बैलाला होऽऽ' असा गजर सुरू झाला. मला संवाद म्हणणे अशक्य ठरले. प्रेक्षकांत माझी आई बसली होती. अखेर फजित मनाने घरी आलो. त्या रात्री झोपेत मुलांच्या आरोळ्या सतत ऐकू येत होत्या. गुच्छ आणि गोटे यांचा मला पाठोपाठ अनुभव आला.

तरीही नाउमेद न होता आम्ही स्पर्धेत भाग घेतला, पण पारितोषिके मिळाली नाहीत.

दरम्यान व्यावसायिक नाटकात भूमिका मिळावी म्हणून मी बाबूराव गोखल्यांकडे खेटे घालत होतो. काही महिन्यांच्या तपस्येला एक दिवस अचानक फळ आले. बाबूरावांचे बोलावणे आले. त्यांच्या 'खुनाला वाचा फुटली' ह्या रहस्यमय फार्सिकल नाटकाचे नायक शामदत्त महाराव मतभेदापायी नाटक कंपनी सोडून गेले होते. नाटकाचा प्रयोग अवघ्या चार दिवसांनंतर कराड मुक्कामी आधीच ठरलेला होता. 'शो मस्ट गो ऑन' हे बाबूरावांचे तत्त्व होते. त्यांनी धाडसाने मला नायक म्हणून उभे केले. मी उत्साहाने संवाद पाठ केले. अवघ्या तीन दिवसांत माझे संवाद चोख तोंडपाठ झाले. बैठ्या तालमींमध्ये हंसराज कोरड्यांसारखा मातबर नट माझ्यावर खूष झाला. त्या नाटकात वसंत शिंदे, बापूराव माने, विश्वास कुंटे, शीला गुप्ते व स्वतः बाबूराव गोखले यांच्या भूमिका होत्या. नाटकाचे आधी चाळीस प्रयोग होऊन गेले होते. भीती, धास्ती या भावनांनी माझ्या मनाला स्पर्श केला नाही. एका नव्या अनुभवाला मी उत्सुक होतो.

रात्रीच्या पॅसेंजर आगगाडीने तिसऱ्या वर्गाच्या डब्यात अंगाचे मुटकुळे करून आम्ही पुण्याहून कराडकडे निघालो. कोरडे, माने या माणसांकडे मी नवलाने पाहत होतो. मराठी रंगभूमी एके काळी गाजवणाऱ्या त्या श्रेष्ठ नटांना तशा अवस्थेत प्रवास करताना पाहून मला वाईट वाटले. त्याच क्षणी मनात विचार आला की, वयाच्या पन्नासाव्या वर्षी अशा परिस्थितीत प्रवास करणे आपल्याला मानवणार नाही. कला, कलेसाठी त्याग वगैरे भाषणबाजी मला मंजूर नव्हती. आधी व्यवहार नेटका पाहावा अशी माझी धारणा होती. अर्थात

माझ्यासारख्या नवख्या नटाने तसे विचार प्रकट करणे तेव्हा मूर्खपणाचे होते. म्हणून मी मुकाट राहिलो. सुदैवाने आता पन्नाशीत विमानातून किंवा आगगाडीच्या फर्स्ट क्लासमधून मी माझ्या हिमतीवर प्रवास करू शकतो.

तर अठराव्या वर्षी कराड येथील एका खुल्या नाट्यगृहात 'खुनाला वाचा फुटली' नाटकात मी नायकाच्या भूमिकेत उभा राहिलो. संवाद उत्तम पाठ होते. बरोबरीचे नामवंत नट मला सांभाळून घेत होते. एकदा वसंत शिंदे यांच्या तोंडून चुकीचा शब्द निसटला... 'राणी' ह्याऐवजी 'राजी' ते म्हणाले. त्यानंतर त्यांना हसू फुटले. रंगमंचावरची इतर नट मंडळी गालातल्या गालात हसू लागली. मी मात्र पुरता बावरलो. हसू कसेबसे आवरून मी पुढचे संवाद बोलू लागलो.

पण ते यश निखळ नव्हते. ऐन रंगमंचावर जाताच माझा आवाज बसका भासू लागला. व्यावसायिक नट होण्याच्या माझ्या महत्त्वाकांक्षेवर आरंभीच पाणी पडले. गाव बदलताच मला सर्दीचा त्रास होऊ लागला. 'खुनाला...' चे आणखी चार-पाच प्रयोग मी केले, पण आवाजाची तक्रार प्रत्येक वेळी होती. माझ्याबरोबर बाबूरावही नाउमेद होत होते. मला उत्तेजन देण्याचा प्रयत्न करीत होते. माझ्या शीघ्र पाठांतराचे सर्वांपाशी कौतुक करायचे. व्यावसायिक नाटकातील माझी पहिली नाईट २० रुपये होती. कॉलेज विद्यार्थिदशेत असताना मला ते पैसे चांगले वाटले.

पण पुढची काही वर्षे नाईटच्या रकमेत विशेष वाढ होत नव्हती. उलट ती १५ रुपयांवर खाली घसरली. राजा नेने 'तुझे आहे तुजपाशी' नाटकाची निर्मिती करीत होते. त्यांनी एकदा मला श्यामची भूमिका देऊ केली. पण पंधरा रुपये मिळताच मी खट्टू झालो. तोवर मी केवळ नट म्हणून जगत होतो. पण मुंबईत रेल्वेत नोकरी करणारा आप्पा पडवळ नावाचा हौशी नट राजाभाऊंच्या संचात श्यामची भूमिका करीत होता. त्याला असेच पैसे दिले जात. नोकरी करणारे हौशी नट कमी नाईटमध्ये काम करायचे. त्यामुळे केवळ व्यावसायिकांचे नुकसान होई. हौशी मंडळी गाजराची पुंगी वाजली तर चाचपून पाहत. नाही वाजली तर मग परत नोकरीकडे धावत. एकटा श्रीकांत मोघे त्या वेळी हिमतीने व्यावसायिक नट म्हणून वावरत होता. १९६० सालाच्या दरम्यान सुशिक्षित, सुसंस्कृत तरुण व्यावसायिक नटाचा पेशा क्वचितच पत्करत. नंतर डॉक्टरांची आणि प्राध्यापकांची मराठी व्यावसायिक रंगभूमीवर गर्दी झाली. "तुम्ही काय

करता ?" ह्या प्रश्नाला मी उत्तर द्यायचो "व्यावसायिक नाटकात भूमिका !" त्यावर पुन्हा प्रश्न यायचा "त्याशिवाय दुसरं काय करता ?" केवळ नाट्याभिनयावर जगणे ही संकल्पना कुणी करू शकत नव्हते. आता परिस्थिती विलक्षण बदलली आहे. नाटकात काम करणे आज भूषणावह मानतात. सामान्य कारकुनाला तेव्हा लग्नाच्या बाजारात जास्त भाव होता. कारण त्याला नियमित पगार मिळायचा ! तेव्हा व्यावसायिक नटाकडे उपेक्षेच्या दृष्टीने आसपासची माणसे बघत.

खरे तर व्यावसायिक नट म्हणून जगणे कठीण होते. 'श्री स्टार्स' संस्थेचे खूप नाट्यप्रयोग होत. पण तिथे नाईटची रक्कम १५-२० रुपये मिळायची. एकदा त्या संस्थेचा नट म्हणून शिक्का बसल्यानंतर दुसरीकडे काम मिळायचे नाही. नव्या कंपनीत काम मिळवण्याची माझी खटपट चालली होती.

दरम्यान इंटर आर्टस्‌च्या परीक्षेनंतर बी.ए. साठी मी इंग्रजी व मराठी विषयांची निवड केली. त्यामुळे एम.ई.एस. कॉलेज सोडून फर्गसनला जावे लागले. श्री. के. क्षीरसागरांनी माझी समजूत घालण्याचा प्रयत्न केला. मराठीचा मी प्राध्यापक होऊ शकेन असे सांगितले. पण मला आय.ए.एस. व्हायचे होते. प्राध्यापकी व्यवसाय मनाला भावेना. इंग्रजी स्पेशलसाठी मी फर्गसनमध्ये नाव दाखल केले. पण तेथे मन रमले नाही. एम.ई.एस. कॉलेज अगदी घरच्यासारखे होते. मी कॉलेजसमोरच राहत होतो. त्या कॉलेजातील प्राध्यापक मंडळी माझे कौतुक करीत होती. फर्गसन अधिक विशाल महाविद्यालय होते. ज्युनियरच्या वर्गात गेल्यानंतर इंग्रजी स्पेशल घेतलेले अवघे पाच-सहा विद्यार्थी होते असे आढळले. मराठीच्या तासाला वर्गात प्रवेश करताच बिचकलो. सबंध वर्गात केवळ मुली होत्या ! मुलगे फक्त दोन— मी आणि 'श्यामची आई' प्रसिद्ध माधव वझे. अभ्यासावरचे एव्हाना माझे लक्ष उडाले होते. नाटकांचे गावोगावी दौरे चालले होते.

त्याआधी मी एका मुलीच्या प्रेमात पडलो होतो. सुलू माझ्या मागच्या वर्षात शिकत होती. अभ्यासात हुशार होती, नाटकात कामे करायची. गाणी म्हणायची. एकमेकांच्या आम्ही घरी जात-येत होतो. पण माझे प्रेम फक्त माझ्या बाजूने होते. सायकलवर बसून डेक्कन जिमखान्यापलीकडे जाण्याची एरवी माझी हिंमत होत नव्हती. सुलूच्या कँपातील घरापर्यंत मात्र मी हिय्या करून सायकलवरून

जायचो. प्रेमात पडलेला तरुण काय वाट्टेल ते करू शकतो.

सायकल चालविण्याबाबत एक गंमत सांगतो. शेजारच्या एका मुलीने मला सायकलवर बसायला शिकवले. पण मी लेडीज सायकलवर प्रथम शिकलो. टांग मारून सायकलवर बसणे मला जमेना. ट्रॅफिक आयलंडला वळसा घालताना माझी फे फे उडायची.

सुलूचे गुपचूप प्रणयाराधन करताना एक दिवस मी दादांपाशी कबुली दिली. त्यांनी ताबडतोब इशारा दिला, "इतक्यात लग्नाचा विचार करू नको. अजून आपली आर्थिक परिस्थिती चांगली नाही. पुढे तुझ्या महत्त्वाकांक्षांना मुरड घालावी लागेल. माझं उदाहरण बघ. लौकर लग्न केल्यामुळे सांसारिक अडचणींपायी माझी किती कुचंबणा होतेय. मला करीयरचा पाठपुरावा करता येत नाही. तुझीही तशी अवस्था होईल !" दादांचे बोलणे मला पटत होते. पण यौवनसुलभ भावना मारताना कठीण गेले. मनाची कोवळीक जळून गेली. पहिले प्रेम मूक राहिले.

वारंवार बसणाऱ्या आवाजावर एक कायमचा उपाय करण्याचे मी ठरविले. माझ्या नाकातील हाड वाढले होते. त्याचे ऑपरेशन करायला हवे होते. पुण्यातील नामवंत डॉक्टरांनी ऑपरेशन केले. त्याचा खर्च बराच जास्त झाला. पुढे अनेक दिवसपर्यंत दादा त्याचे कर्ज फेडत होते. त्या ऑपरेशननंतर माझी प्रकृती काही महिने खालावली. प्रेमभंगापायी मनावर निराशेचे आणखी गडद सावट आले. माझे मन अभ्यासात रमेना. मार्क कमी पडल्यामुळे फ्रीशिप थांबली. बी.ए. च्या फॉर्म परीक्षेसाठी फीचे पैसे भरणे आवश्यक होते. त्यासाठी मी दादांकडे पैशांची मागणी केली. अभ्यास न करण्याबद्दल दादांनी प्रथमच आयुष्यात माझी कानउघाडणी केली. हा प्रकार जेवतेवेळी घडला. या क्षणापर्यंत संपूर्ण शिक्षण मी माझ्या हिमतीवर केले होते. मला संताप आला. परीक्षा फी भरायची नाही आणि बी.ए. च्या परीक्षेला बसायचेच नाही. पदवीचे शेपूट लागले तर कसली तरी सामान्य नोकरी करावी लागेल या विचाराने मी कमालीचा अस्वस्थ बनलो. परीक्षेला न बसून आपणच आपले दोर कापायचे असा निश्चय केला. केवळ नट म्हणून जगण्याचा निर्धार केला. तृतीय वर्गात उत्तीर्ण होऊन पदवी घेण्याचा मला तिटकारा होता. ज्या गोष्टीत मन रमत नाही, तिच्या मागे उगीच वेळ वाया कशाला घालवायचा ? मी शिक्षण सोडल्याचे

कळताच घरात हलकल्लोळ माजला. त्या क्षणापासून पिता-पुत्र असा सनातन संघर्ष पेटला. मधल्या मधे बिचाऱ्या ताईची होरपळ झाली.

तेवढ्यात एका नव्या नाटक कंपनीत काम करण्याची मला संधी आली. अभिनेत्री उषा किरण यांच्या वडिलांनी— श्री. बापू मराठे यांनी पु.ल. देशपांडे लिखित 'भाग्यवान' नाटक रंगभूमीवर सादर करण्याचे ठरविले. त्यांची कन्या पुष्पा हिला नाटकात वाव देण्याचा त्यांचा इरादा होता. त्या नाटकात अभिनेते-दिग्दर्शक गजानन जागीरदार काम करणार होते. शिवाय विनोदी नट शरद तळवलकर भूमिका करणार होते. नाटकातील बातमीदाराच्या छोट्या भूमिकेसाठी बापू मराठे नव्या नटाला शोधत होते. त्यांनी त्याबद्दल पुण्याच्या वर्तमानपत्रांमध्ये जाहिरात दिली.

मी मुलाखतीसाठी त्यांना भेटायला गेलो. त्यांच्याबरोबर गजानन जागीरदार बसले होते. जागीरदारांनी चाचणीसाठी मला संवाद वाचायला दिले. वाचनानंतर बातमीदाराच्या भूमिकेसाठी जागीरदारांनी माझी निवड पक्की केली. बापू मराठे म्हणाले, "त्याबद्दल आम्ही तुम्हाला दर प्रयोगाची नाईट ३० रुपये देऊ !" मी मनात टुण्णकन उडालो.

पण तेवढ्यात दाणदिशी जमिनीवर खाली आपटलो. तालमींसाठी मुंबईला जाण्याची आवश्यकता होती. मुंबईत राहण्याची, जेवण्याची समस्या होती.

शाळेतील वर्गातील सहा अनिलांपैकी अनिल पत्की नावाचा माझा मित्र होता. तो आमच्याच 'यासीन-मंझिल'मध्ये खालच्या मजल्यावर राहत होता. मुंबईत राहणारा त्याचा एक मावसभाऊ, मधू कोतवाल कॉलेजच्या शिक्षणासाठी पुण्यात आला होता. मधू माझा मित्र बनला होता. मुंबईत खार उपनगरात हाऊसिंग बोर्डाच्या रामकृष्ण नगरात मधूचे आई-वडील राहत होते. तात्काळ मी त्यांच्याकडे पथारी टाकली.

ह्या कोतवाल कुटुंबाने त्यापुढे पाच-सहा वर्षे मला फार मदत केली. त्या अत्यंत अवघड दिवसांत मला तात्पुरता निवारा दिला. आपुलकी दिली. माझ्या यशापयशात आनंद, दुःख मानले. अनिल आणि मधू अद्यापही माझे चांगले मित्र आहेत.

'भाग्यवान'च्या तालमी सुरू झाल्या. पुष्पाचा नायक म्हणून यशवंत गोरे नामक सधन कुटुंबातील देखणा हौशी नट होता. सर्व कलाकार माझ्याशी

चांगले वागले. नाटकाचा पहिला दौरा ठरला. पावसाळ्याचे दिवस होते. लातूर, बार्शी, सोलापूर असा दौरा ठरला. एव्हाना 'श्री स्टार्स' मार्फत मी महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांमधून भरपूर फिरून आलो होतो. दौऱ्यापूर्वी कॉलऱ्याचे इंजेक्शन घेणे आवश्यक होते.

मी आणि शरद तळवलकर इंजेक्शन टोचून घ्यायला डॉक्टरांकडे गेलो. तळवलकर इंजेक्शनला फार घाबरतात हे गुपित तेव्हा मला समजले. पुणे विद्यापीठातील चांगली नोकरी सोडून नटाचा पेशा पत्करणाऱ्या शरद तळवलकरांविषयी मला फार आदर वाटत होता. एका परीने मला त्यांचा आधार वाटायचा. त्या वेळी त्यांचे बिकट दिवस होते. तरीही त्यांची हसरी मुद्रा कायम होती.

नाटकाचा पहिला दौरा आर्थिकदृष्ट्या अयशस्वी ठरला. दुष्काळी भागात ऐन प्रयोगावेळी पाऊस पडला. बार्शी, लातूर येथे प्रयोगाला प्रेक्षक अगदी कमी होते.

पहिल्या प्रयोगात एक गंमत घडली. जागीरदार रद्दीवाल्याची भूमिका करीत होते. त्यांची मुलाखत घेण्यासाठी मी त्यांच्याकडे येतो असा प्रसंग होता. म्हणून ते माझ्यासमोर रद्दीचा गठ्ठा टाकायचे. त्याच्यावर बसून बोलायला आरंभ करण्यापूर्वी गठ्ठा सरकला. मी किंचित घसरून पडलो. प्रेक्षकात हशा उसळला. मग त्या हशासाठी पुढच्या प्रयोगांमध्ये मी तसाच सहज पडायचो. जागीरदारांना माझे ते पडणे आवडायचे. त्या दौऱ्यात त्यांचा-माझा परिचय वाढला. पूर्वी कोल्हापुरात विद्यापीठ हायस्कूलमध्ये जेव्हा ते इंग्रजीचे शिक्षक होते, तेव्हा माझे वडील त्यांचे विद्यार्थी होते असे त्यांना मी सांगितले. त्यांना माझ्याबद्दल आपुलकी वाटू लागली. १९५९ साली ही पहिली ओळख घडली. पुढे आमच्यामधील संबंध वाढत गेले. त्यांचे स्वरूप बदलत गेले. १९७० साली मी त्यांचा पटकथा संवादलेखक, मुख्य नट बनलो. त्यांना 'पपा' म्हणून मी हाक मारू लागलो. १९८७ सालापर्यंत ही आपुलकी टिकली. १९८८ मध्ये पपा 'पैलतीरावर' पटाईतपणे पोहून गेले. 'स्वामी' ही दूरदर्शन मालिका गाजत होती. कीर्तीच्या ऐन शिखरावर असताना हा मनस्वी बुद्धिवादी कलावंत वारला. त्यांचे मरण कलावंताला साजेसे सुंदर होते. त्यांच्या सहवासात अनेक सुंदर संध्याकाळी सत्कारणी लागल्या. रशियातून भारतात परत आल्यानंतर माझा

एक प्रेमळ, वडीलधारा, कलावंत मित्र हयात नव्हता. त्यांच्याबद्दल पुढे विषयाच्या ओघात आणखी बरेच काही सांगेन.

'भाग्यवान'चे आणखी एक-दोन प्रयोग पुण्यात जेमतेम चालले. बापूंनी जुनी थकबाकी दिली. मी पुन्हा 'श्री स्टार्स'कडे आलो. तेथे बाबूरावांच्या जुन्या नाटकांची पुण्याई विशेष उरली नव्हती. पण 'करायला गेलो एक'मध्ये काम करायची संधी मात्र मला मिळाली नाही. पुढे काही वर्षांनंतर कु. रजनी मुथा यांनी (आजच्या सौ. रजनी निळू फुले) त्या नाटकाचे 'ब्लफ मास्टर' असे हिंदी रूपांतर केले होते. त्या हिंदी नाटकात डान्सरची मी भूमिका केली. चार-पाच प्रयोगांपलीकडे 'ब्लफ मास्टर' मी केले नाही.

बाबूरावांनी 'रात्र थोडी सोंगं फार' नावाचे एक नवे नाटक लिहिले होते. त्यात दिवाबत्तीची उघडझाप व पार्श्वसंगीताचा ढणढणाट होता. ते तंत्र संभाळण्यासाठी माझी नेमणूक झाली. अभिनयाला वाव नव्हता. मग रंगमंचावरील तांत्रिक कामाची सवय व्हावी म्हणून मी ते काम पत्करले. फक्त सात रुपये एका प्रयोगासाठी मिळायचे.

रंगभूमीवरची किरकोळ आमदनी माझे वैयक्तिक किरकोळ खर्च भागवायची. घरात राहणे, जेवण वगैरे गोष्टी फुकट होत्या. मी घरात जेवणाचे पैसे द्यावेत असा दादांनी एकही शब्द कधी काढला नाही. नट म्हणून एक दिवस माझे नशीब उजळेल अशी त्यांना मनोमन आशा वाटत होती. दौऱ्यांदरम्यानच्या मोकळ्या काळात सिनेमात भूमिका मिळविण्यासाठी मी खटपटत होतो. अशा वेळी ग.दि. माडगूळकर, म.गो. पाठक, राजा परांजपे, राजा ठाकूर इत्यादी मंडळींच्या घरी खेपा टाकत होतो. बिचारी भली माणसे माझी तात्पुरती बोळवण करीत होती. ग.दि. माडगूळकरांकडे म्हणजे अण्णांकडे मी फर्गसनपासून चालत जायचो. पुणे-मुंबई रस्त्यावरचा त्यांचा 'पंचवटी' बंगला बराच दूर होता. सौ. विद्यावहिनी हसतमुखाने, आस्थेने माझी विचारपूस करायच्या. अण्णा बिचारे कोल्हापूरच्या कृष्णा हवालदाराच्या मुलाला समजावून सांगायचे, "अन्याबा, भुकेल्याचा भात लवकर शिजत नाही. म्हणून असा घायकुतीला येऊ नको." चित्रपटाच्या पडद्यावर शोभण्यासाठी साजेसे व्यक्तिमत्व माझ्यापाशी नव्हते. पण या लोकांनी परखड, कडू बोलून मला कधी दुखावले नाही. अण्णा कधी मजेने म्हणायचे, "बासुंदी पुरी खाऊन कसंबसं जगतोय !" त्यांचीच ही कल्पना

उचलून पुढे मॉस्कोत चांगले दिवस आल्यानंतर मी मित्रांना म्हणायचो : "कोंबडी खाऊन, व्हिस्की पिऊन कसंबसं जगतोय !" अण्णांना भेटण्यात एक आनंद असायचा.

असा आनंदाचा अनुभव गो.नी. दांडेकरांना भेटून एकदा लाभला. त्यांची मुलाखतं लिहिण्याच्या उद्देशाने दांडेकरांच्या तळेगाव दाभाडे येथील निवासस्थानी मला सांगाती घेऊन दादा गेले होते. मी गो.नीं.च्या 'कुणा एकाची भ्रमणगाथा'वर खूष होतो. त्या भेटीत आप्पांनी स्वतःजवळच्या मौलिक अत्तरांचा संग्रह दाखविला. त्यांनी हरतऱ्हेची मौलिक रत्ने गोळा केली होती. सुंदर सुंदर छायाचित्रे काढली होती. 'भ्रमणगाथे'वर चित्रपट काढावा असे तेव्हा मला वाटले होते.

'श्री स्टार्स' चालविण्याच्या धडपडीत बाबूरावांनी एकदा 'अंमलदार' नाटक काढले. सर्जेरावाच्या भूमिकेसाठी बबन प्रभू यांना बोलावून घेतले. मला त्या नाटकात हरभटाची भूमिका मिळाली. बबन प्रभू एक विलक्षण माणूस होता. बुद्धिमान होता. आंघोळ करणे, दात घासणे हे विधी त्याच्या लेखी नसायचे. 'अंमलदार' विशेष चालले नाही.

अखेर नवा उपाय म्हणून बाबूरावांनी नव्या नाटककाराला 'श्री स्टार्स' मध्ये बोलावून घ्यायचा निर्णय केला. नाटककार बाळ कोल्हटकर यांना त्यांनी पाचारण केले. कोल्हटकरांची नाटके त्यापूर्वी जयराम शिलेदारांच्या मराठी रंगभूमीवर विदर्भात खूप गाजली होती. शिवाय ललितकलादर्शमध्ये 'दुरितांचे तिमिर जावो' चालू होते. कोल्हटकर नव्या नाटकाची वही घेऊन आले. वाचन सर्वांसमक्ष घडले. बरीच चर्चा केल्यानंतर नाटकाचे नाव 'वेगळं व्हायचंय मला' ठरले. ह्या नाटकाच्या निर्मितीने 'श्री स्टार्स'ला, बाबूराव गोखल्यांना, बाळ कोल्हटकरांना सोन्याचे दिवस दाखविले. नाटक बघता बघता तडाखेबंद चालू लागले. विदर्भाच्या दौऱ्यानंतर अक्षरशः पिशव्या भरून पैसे आणत.

ह्या नाटकात लेखनदृष्ट्या सर्वांत कच्ची अशी भूमिका, प्रा. रमेश भांडारकरची, माझ्या वाट्याला आली. माझा बसका आवाज, सुटातील उंचेपुरे व्यक्तिमत्व, ह्या गोष्टी ध्यानात घेऊन बाबूरावांनी ती भूमिका मला दिली. पण कोल्हटकरांना मी त्या भूमिकेत कधी आवडलो नव्हतो. त्यांच्या पठडीत बसण्यासारखा मी नव्हतोच. तरीही 'वेगळं व्हायचंय मला'चे मी शंभर-दीडशे

प्रयोग केले. त्या नाटकामुळे महाराष्ट्रातील अनेक गावे पाहायला मिळाली. प्रवास व दर प्रयोगाला पंधरा रुपये हा लाभ घडत होता. प्रयोगसंख्या खूप होती.

पण माझ्या मनातील जिप्सी अस्वस्थ होता. मी खूष नव्हतो. 'वेगळं व्हायचंय मला' सोडण्यास मी सतत उत्सुक होतो. हॉलीवूडच्या, पाईनवूडच्या कथांमध्ये मी रमायचो. एरॉल फ्लीन, डर्क बोगार्ट, स्पेन्सर ट्रेसी, कॅरी ग्रँट हे नट डोळ्यांसमोर नाचायचे. मी प्रत्यक्षात वाशीम, पुसद, नागपूर अशा ठिकाणी फिरायचो. काल्पनिक जग व वास्तवातील जग यांच्यात फार मोठी तफावत होती. मेक-अप करून सुटाबुटात सजून प्रवेशापूर्वी जेव्हा मी विंगेत उभा राहायचो, तेव्हा बाबूराव चेष्टेने म्हणायचे : "काय अनिलोवस्की तयार ?" बाबूराव मूळचे छान क्रिकेटपटु आणि हाडाचे कवी. पण दारू प्यायल्यानंतर विचित्र वागायचे. नाटक कंपनीतील प्रयोगानंतरचे वातावरण फार गलिच्छ बनायचे. माझ्या सुसंस्कृत, संस्कारक्षम मनाला ते रुचेना. द्रव्यप्राप्ती विशेष नव्हती. अशा परिस्थितीत माझे तेथे उज्वल भवितव्य कधीही घडणार नाही हे जाणून एका ३१ डिसेंबरच्या रात्री नाट्यप्रयोगानंतर मी 'श्री स्टार्स'ला रामराम ठोकला.

*

## हौशी रंगभूमीवर नाट्यनिर्मितीचा उपद्व्याप

'श्री स्टार्स'चा निरोप घेतल्यानंतर मी एकदम रिकामा बनलो. पण स्वस्थ बसवेना. एम.ई.एस. कॉलेजात माझ्याबरोबर नाटकात काम करणाऱ्या सहकारी कलावंतांना मी भेटलो. त्या भेटींमधून 'भवभूती थिएटर्स' या हौशी नाट्यसंस्थेची कल्पना आकाराला आली. बाळ कोल्हटकरांचे 'एखाद्याचे नशीब' नाटक बसवायचे ठरविले. मुख्य भूमिका करणार होती सुलू. निखळ आवाजाचा कल्याण वर्दे सामील झाला. माझ्या वाट्याला विशेष भूमिका नव्हती. नाटकाची जाहिरातीची बाजू मी सांभाळत होतो. तालमी चालू झाल्या. १९६१ सालाच्या जुलै महिन्याच्या दुसऱ्या आठवड्याच्या सुमारास आम्ही भानुविलास थिएटर रविवारी सकाळी पहिल्या प्रयोगासाठी म्हणून मुक्रर केले.

११ जुलैची मध्यरात्र, तालीम संपवून लकडी पुलापलीकडच्या इराण्याच्या हॉटेलकडे चहासाठी आम्ही पुलावरून चालत जात होतो. पुलाखाली पाणी दुथडी भरून वाहत होते, मनात आले : 'पाणी कधीतरी पुलावरून जाईल तेव्हा काय होईल ?'

मनात ह्या अभद्र विचाराची पाल चुकचुकली. नेमके दुसऱ्या दिवशी पानशेतचे धरण फुटले. १२ जुलैला पुण्यात महापूर आला. भानुविलास थिएटर पाण्याखाली गेले. कर्वेरोडवर मी राहत होतो त्या घराच्या खालच्या मजल्याला पाणी स्पर्शून गेले. तेथे पाण्याच्या प्रवाहाचा जोर नव्हता. पण पुढे कित्येक दिवसपर्यंत आसपास चिखल साचला होता.

'एखाद्याचं नशीब'चा पहिला प्रयोग लांबणीवर पडला. त्या नैसर्गिक

आपत्तीमुळे मी बधिर बनलो. १२ जुलैची दुपार पी.वाय.सी. पाशी राहणाऱ्या कल्याणच्या घरात काढली. जेवणानंतर मी तेथेच संध्याकाळपर्यंत गाढ झोपलो.

माझ्या सहकाऱ्यांचे महाविद्यालयीन शिक्षण चालूच होते. फक्त मी एकटा रिकामा होतो. पुरानंतर दोन आठवड्यांनंतर मुंबईहून चित्रपट दिग्दर्शक दत्ता धर्माधिकारींचे चिखलमाखले एक कार्ड आले. त्यापूर्वी जवळच राहणाऱ्या धर्माधिकारींकडे काम मिळावे म्हणून मी सारखा चकरा मारायचो. त्या कार्डात त्यांनी मला मुंबईतील ताडदेव येथे सेंट्रल स्टुडिओत ताबडतोब भेटण्यासंबंधी कळविले. सहाय्यक दिग्दर्शक म्हणून त्यांनी मला पाचारण केले होते. 'एक धागा सुखाचा' ह्या चित्रपटाच्या दिग्दर्शनात त्या वेळी ते गुंतले होते.

महापुराने 'एखाद्याचं नशीब' चा प्रयोग लांबणीवर पडला होता. तेव्हा हाती आलेली ही नवी संधी घेण्यासाठी मी मुंबईला जायला निघालो. त्या वेळी कर्वे रोड चिखलात भरलेला होता. तसाच चिखल तुडवीत शिवाजीनगर स्टेशनपर्यंत मी भल्या सकाळी पायी निघालो. मुंबईत खारला मधू कोतवालच्या घरी गेलो. मुंबईत पाऊस कोसळत होता. दुपारी चारच्या सुमारास हाजी अलीच्या बस थांब्यावर मी बसमधून उतरलो. समुद्रावरच्या वाऱ्यामुळे रेनकोट सावरताना तिरपिट होत होती. तसाच अर्धवट ओलेत्या अवस्थेत सेंट्रल स्टुडिओत चालत गेलो. आज त्या जागी ताडदेव एअर कंडिशन मार्केट उभे आहे.

स्टुडिओत 'एक धागा सुखाचा' या चित्रपटाचे चित्रीकरण चालू होते. दत्ता धर्माधिकारींनी मला पाहिले. त्यांना मी काका म्हणत होतो. त्यांचा मुलगा मोहन माझा मित्र होता. तो त्यांना काका म्हणायचा. म्हणून मीही काका म्हणत असे. काकांनी मला एका बाजूला बोलावून घेतले व ते म्हणाले : "हे बघ, ह्या चित्रपटासाठी मला चौथ्या सहदिग्दर्शकाची जरुरी आहे. तुझी आठवण आली, म्हणून बोलावून घेतलं. पण मुंबईत रहा-जेवायची बरेच महिनेपर्यंत तुझी सोय आहे ?" तशी सोय माझ्यापाशी नव्हती. "आम्ही तुला दरमहा चाळीस रुपये पगार देऊ !" काका पुढे म्हणाले. मला समजून चुकले— हे काम आपल्याला जमणार नाही. पण काकांना माझा नकार आवडला नाही. त्यांना माझ्याबद्दल आपुलकी वाटत होती. व्यावहारिकदृष्ट्या मला ते जमणे अशक्य होते. तसाच कुडकुडत मधूच्या घरी परतलो.

आणखी एक निराशा पदरी घेऊन 'नशीब'चा प्रयोग पूर्ण करण्यासाठी मी

पुण्याला परतलो. कारण पूर्वी ठरविलेल्या प्रयोगाच्या तिकिटांची कॅनव्हासिंग करून आम्ही आधीच विक्री केली होती. लोकांचे पैसे आमच्यापाशी अडकले होते. जाहिरातींचा जादा खर्च सोसून शेवटी आम्ही तो प्रयोग विजयानंद थिएटरमध्ये एका रविवारी सकाळी केला.

त्या नाटकाचे आणखी प्रयोग होऊ शकले नाहीत. मनाला दमवून टाकणारा तो एक अनुभव पदरी पडला.

पुन्हा मी एकटा, रिकामा पडलो. हे एकटेपण त्या क्षणापासून आत्तापर्यंत अधूनमधून आयुष्यात माझ्या सोबतीला येते. जगाच्या पाठीवर कुठेही ते सांगाती असते. मॉस्कोत, मॉरिशसमध्ये, पुण्यात... त्या वेळी
सकाळी-संध्याकाळी फर्गसन टेकडीवर फिरायला जाण्याचा क्रम मी सुरू केला. टेकडीवर गोखले स्मारकापाशी बसून सूर्योदय व सूर्यास्त पाहायची मला सवय लागली. सूर्योदयाच्या वेळी सूर्याकडे टक लावून पाहिले तर डोळे चांगले होतात असे कुणी सांगितले होते. सूर्यास्ताची मला प्रथमपासून ओढ होती. पश्चिम क्षितिजापलीकडे पुढच्या आयुष्याचे गूढ लपलेय असे वाटायचे. टेकडीवरून दूरवरची आगगाडी दिसायची. मुंबईची त्या वेळी मला विलक्षण ओढ वाटायची. जीवनाच्या वाटा आपल्याला मुंबईत सापडतील असे वाटायचे. पुणे नकोसे वाटायचे. सकाळ-संध्याकाळ मी खूप पायी फिरायचो. भांडारकर रस्ता, कमला नेहरू उद्यान, प्रभात स्टुडिओभोवती भावुक मनाने चकरा मारायचो. कधीतरी शुभ्र पोषाखातील फत्तेलाल त्यांच्या बंगल्याच्या आसपास दिसायचे. किती थोर कलावंत: स्वतःच्या कर्मभूमीशेजारी सतत वास्तव्य करणारी ही थोर कलावंत माणसे. फत्तेलाल, शांतारामबापू, भालजी पेंढारकर. अष्टौप्रहर त्यांना कलेचा ध्यास.

अधूनमधून मी लेखन करायचो. 'कुमारांचा सोबती' ह्या सुरेख पुस्तकाचे लेखक य.गो. नित्सुरे यांनी 'नवे जग' नावाचे मासिक काढले होते. त्यांनी मला लेखन करण्यास उत्तेजन दिले. 'सावल्या' नावाची प्रतिकात्मक पहिलीच कथा मी लिहिली. त्यांना ती आवडली. त्यांनी मासिकात छापलीसुद्धा व मोबदला दिला. त्यांच्याकडे पी. आर. शिंदे या आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या छायाचित्रकाराची ओळख झाली. शिंदे व मी अशी आमची जोडी जमली. सकाळी दहा वाजता व संध्याकाळी सहा वाजता आम्ही हमखास भेटत असू. शिंदे वयाने माझ्या

वडिलांपेक्षा दोन वर्षांनी मोठे होते. पण मला ते बरोबरीच्या मित्रासारखे वाटायचे. ते अविवाहित होते. त्यांचा इंग्रजीचा अभ्यास दांडगा होता. त्यांच्यामुळे चांगली चांगली इंग्रजीतील आत्मचरित्रे मी वाचली. एरॉल फ्लीनचे 'माय विकेड विकेड वेज', डायना बॅरीमूरचे 'टू मच टू सून', चार्ली चॅप्लीनचे आत्मचरित्र, डॉ. क्रोनिनचे 'ॲडव्हेंचर इन टू वर्ल्डस् !' कधी टाईम्समध्ये 'मिडल्' लिहीत. डान्स या शब्दाची व्याख्या : 'व्हर्टिकल एक्सप्रेशन ऑफ हॉरिझॉन्टल डिझायर' असे म्हणून मिस्किल हसत. भरपूर धूम्रपान करण्याची त्यांना सवय होती. सकाळी जिमखान्यावरच्या लकी रेस्तराँमध्ये एक कप चहा आणि संध्याकाळी कॅफे डिलाईटमध्ये एक कप कॉफी घेण्याचा आमचा नित्यक्रम असायचा. ह्या दोन ठिकाणी इतर मित्र जमत, गप्पा व्हायच्या. फुकटात वर्तमानपत्र वाचन व्हायचे. दिवस कसेबसे रेटले जात होते. हॉलीवूडचे उत्तमोत्तम चित्रपट यायचे. ते बघितल्यानंतर एका विलक्षण धुंदीत थिएटरातून मी बाहेर पडायचो. तेवढे क्षण मी स्वतःला त्या चित्रपटाचा नायक समजायचो. त्या बेकारीतील दिवसांचा वेळ मित्रांमुळे सुसह्य व्हायचा. नवनव्या कल्पना, नवनवीन सदरे मी तयार करायचो. त्यातच 'मनोहर' मासिकात श्री. दत्ता सराफ संपादक आले. त्यांच्या पूर्वीच्या एका संपादकांनी 'सायोनारा सायोनारा' हा माझा लेख नाकारला होता. एका मराठी इंजिनिअर तरुणाला जपानमध्ये भेटलेल्या तरुणींबाबतच्या आठवणींवर, छायाचित्रांसह तो लेख होता. सराफांना लेख आवडला. त्यांनी दाण्दिशी पुढील अंकाच्या आरंभी तो छापला. तेव्हापासून लेखनक्षेत्रात ते माझे 'गॉडफादर' बनले ! 'छंद' नावाचे सदर मी 'मनोहर'मध्ये 'ओ निल' नावाने चालवायचो ! वेगवेगळे छंद करणाऱ्या माणसांचे ते परिचय होते. त्यामुळे एकनाथ बागुल, श्री. भा. महाबळ तेथे स्नेही बनले. त्या अवघड काळात 'मनोहर'चा छोटासा मोबदला मला केवढा आधार वाटायचा ! आज घटकेला पुण्यातील लेखनक्षेत्रात सराफ, बागूल, महाबळ हे त्रिकुट मला पूर्वीएवढेच जवळचे वाटते.

तेवढ्यात एका जुन्या पद्धतीच्या नाटक कंपनीचे मला बोलावणे आले. पंडितराव तरटे हे नाटक कंपनीचे मॅनेजर म्हणून जुन्या काळातील नाट्यव्यावसायिकांना चांगले परिचित असावेत. ह्या तरट्यांनी मला 'श्री

स्टार्स'मध्ये काम करताना पाहिले होते. सरस्वतीबाई बोडस ह्या जुन्या काळातील नाट्य अभिनेत्री. त्यांच्या नाटक कंपनीतर्फे नवीन नाटक त्या काढणार होत्या. अत्र्यांच्या 'तो मी नव्हेच' नाटकावर बेतलेले त्यांच्याकडचे नाटक होते. 'मी तो नव्हेच, अर्थात तरुणींनो सावध राहा' असे त्याचे नाव होते. नाटकाचे लेखक सरस्वतीबाईंचे यजमान होते. पंडितरावांनी जुन्या काळच्या खुबीने माझ्यापुढे प्रस्ताव मांडला. मी नाटक कंपनीचा नायक होतो. प्रवास रेल्वेच्या सेकंड क्लासमधून. पगार महिना दोनशे रुपये. पैकी दर आठवड्याला पन्नास रुपये मिळतील. प्रयोग जेवढे होतील ते. जेवणाचा, चहाचा व राहण्याचा खर्च कंपनीचा. भूमिका फार मोठी होती. बेकारीत दोनशे रुपये म्हणजे त्या दिवसात अप्रूप. शिवाय जुन्या पद्धतीच्या कंपनीत मासिक पगारावर काम करायचा नवा अनुभव होता. मी होकार दिला.

कंपनीचा पहिला मुक्काम होता मुंबई-आग्रा महामार्गावरच्या कसारा घाटाच्या अलीकडे वसलेल्या शहापूर गावी. मी त्या गावी गेलो. कंपनीचे बिऱ्हाड राहत होते त्या घरापाशी गेलो. एकमजली घराच्या तळमजल्यावरच्या मोठ्या दिवाणखान्यात पाच-सहा माणसे पथाऱ्या पसरून बसली होती. पंडितराव तरटे तेथे होते. चेहऱ्यावर देवीचे वण असलेल्या एका गृहस्थांची त्यांनी ओळख करून दिली. प्रभात फिल्म कंपनीतील ते जुने नट रा. वि. राणे होते. श्री. राणे आमच्या नाटकाचे दिग्दर्शक होते. शिवाय कंपनीच्या मालकीणबाई सरस्वतीबाई बोडस तेथेच बसल्या होत्या. सुमारे आठवडाभर तालमी चालू होत्या. मला खूप मोठी नक्कल पाठ करायची होती. चार-पाच वेगवेगळी सोंगे वठवायची होती. पाठांतराचा प्रश्नच नव्हता. संध्याकाळच्या वेळी कसारा घाटाच्या पायथ्यापर्यंत श्री. राण्यांच्या बरोबर मी फिरायला जायचो. तेथे ट्रकवाले रांगेत ट्रक उभे करायचे. राणे प्रभात कंपनीच्या आठवणी सांगायचे. कंपनीतील आणखी एक-दोन जुने नट गावापासच्या ओढ्यावर गांजा ओढायला जायचे. चिलीम ठासण्याचा त्यांचा कार्यक्रम एकदा मी पाहिला. त्यातील एका तरुण नटाचे डोळे गांजा सेवनानंतर तारवटायचे. प्रत्यक्ष प्रयोगावेळी त्याने माझी फजितीच केली. तारवटल्या डोळ्यांनी तो माझ्याकडे नुसता बघत राहिला. नक्कल पुढे बोलेना. अखेर मला सावरून घ्यावे लागले.

पहिला प्रयोग ठरला. त्या दिवशी नशिबाने नेमकी माशी शिंकली. अमेरिकेत जॉन केनेडींचा खून झाला होता. म्हणून त्या दिवशी कसारा घाटातील शहापूर गावी करमणुकीचे सर्व कार्यक्रम रद्द झाले होते. ती रात्र स्वस्थ बसून काढावी लागली.

शहापुरात पुढे तीन-चार प्रयोग करून कंपनीचा मुक्काम हलला. नासिकमध्ये पोहोचलो. तेथे 'रसरंग' साप्ताहिकाचे संपादक श्री. इसाक मुजावर यांची भेट घेतली. त्यांना भेटल्यानंतर मला पुन्हा 'माणसात' आल्यासारखे वाटले. सुमारे दोन-तीन आठवडे जंगलात राहिल्यासारखे वाटत होते.

नाटक ठीक चालले होते. माझे काम बरे वठत होते. मनमाड मुक्कामी पगाराचे पैसे प्रथमच मिळाले. फक्त मला एकट्याला पैसे मिळाले होते. घाईत पैसे पँटच्या खिशात ठेवून मी रंगमंचावर प्रवेश केला. परत विंगेत आलो तो पँटच्या खिशातल्या पैशातील शंभराची नोट गायब झाली होती. थोडी गडबड उडाली. पण पैसे परत मिळाले नाहीत. कंपनीत चोर आहे असे माझ्या ध्यानात आले.

दुसऱ्या दिवशी बाबूराव गोखल्यांची तार मिळाली. 'खुनाला वाचा फुटली' चा प्रयोग इचलकरंजीला ठरला होता. आता त्या नाटकात मी तोतऱ्या मधूची भूमिका करायचो. मूळ ती भूमिका मधू आपटे यांच्यावर आधारली होती. पण आपटे नको त्या ठिकाणी अडखळायचे. म्हणून पुढे पुढे काम करीत नसत. मधूची भूमिका मला छान जमायची. मी इचलकरंजीला जाण्याचा निश्चय केला.

आमची नाटक कंपनी पुढे विदर्भात जाणार होती. कंपनी एकदा जर विदर्भाच्या झाडीपट्टीत गेली तर लवकर बाहेर येणार नाही असे इतर नटांच्या बोलण्यातून मला समजले होते. गांजेकस, चोरट्या माणसांबरोबर मुंबईपासून फार दूर जाण्याची मला इच्छा नव्हती. नाही तरी त्या कंपनीत राहून फार मोठी आमदनी होणार नव्हती. शिवाय नाट्यसेवा घडणार नव्हती. कंपनीला रामराम ठोकायचा मनाशी मी निर्णय घेतला. पण प्रत्यक्षात सांगितले की, इचलकरंजीचा प्रयोग आटोपल्यानंतर जळगाव मुक्कामी येतो.

इचलकरंजी, निपाणी असा दौरा आटोपून मी पुण्याला आलो आणि तापाने आजारी पडलो. 'येत नाही' अशी जळगावला तार केली. पुढे त्या नाटकाचे वा नाटक कंपनीचे काय झाले हे मला कधीही माहीत नाही. माझ्याऐवजी रा.वि.

राणे काम करू शकले असते हे मला माहीत होते. जुन्या पद्धतीच्या नाटक कंपनीत मासिक पगारावर काम करून खेडोपाडी फिरण्याचा अनुभव पदरी पडला.

*

# मराठी चित्रपटात नायकाची भूमिका

नाटकात व्यावसायिक नट म्हणून काम करताना चित्रपटात काम मिळवण्याची माझी धडपड चालूच होती. एक दिवस म.गो. पाठक ऊर्फ बाबा पाठक यांचा निरोप आला– "शूटिंगसाठी प्रभात स्टुडिओत ये !"

मी हुरळून गेलो. 'चिमण्यांची शाळा' या चित्रपटाचे बाबा पुन्हा चित्रीकरण करीत होते. मला रिक्रूट ऑफिसरची छोटीशी भूमिका देण्यात आली. नायक राजा गोसावी रिक्रूट कचेरीत येतो असा प्रसंग होता. मी वयाने खूप लहान दिसत होतो म्हणून रंगपटात माझे केस पांढरे करण्यात आले व मिशा चिकटवण्यात आल्या. त्या वेळी प्रभात स्टुडिओत दुसऱ्या दालनात 'हा माझा मार्ग एकला' या चित्रपटाचे शूटिंग चालू होते . रंगपटात शेजारच्याच टेबलापाशी राजाभाऊ परांजपे डोक्यावर केसांचा टोप चढवून तरुण दिसण्याचा प्रयत्न करीत होते. मला त्या योगायोगाची मौज वाटली. बाल कलाकार सचिनची व त्याच्या देखण्या आईची तेथेच ओळख झाली. सचिन तेव्हा शम्मी कपूरचे 'याऽऽहू' नृत्य करायचा. त्याचा परिचय करून देणारा माझा एक छोटा लेख पुण्याच्या 'तरुण भारत'मध्ये प्रसिद्ध झाला.

मला दैवतासमान वाटणाऱ्या प्रभात स्टुडिओत बाबा पाठकांनी चित्रपटात काम करण्याची प्रथम संधी दिली म्हणून मी खूष झालो. पण तेवढ्या छोट्या कामावर माझे समाधान होणे अशक्य होते.

मुंबईच्या एका वृत्तपत्रात नवे कलाकार पाहिजेत अशा आशयाची जाहिरात 'नालंदा चित्र'ने दिली. वर्तमानपत्रात आलेल्या अशा जाहिरातींना विशेष अर्थ

नसतो हे माहीत असूनही 'नालंदा चित्र'च्या मुंबईमधील वरळीच्या फेमस स्टुडिओतील कचेरीकडे मी अर्ज पाठवला.

आश्चर्य म्हणजे 'नालंदा'चे मला मुलाखतीसाठी बोलावणे आले. निर्माते-दिग्दर्शक माधव वेलणकर पूर्वी एके काळी गजानन जागीरदारांचे साहाय्यक होते. त्यांनी व पटकथा-संवाद लेखक फाटक यांनी माझी दुसऱ्या नायकाच्या भूमिकेसाठी निवड पक्की केली. ही भूमिका करण्यासाठी त्यांनी तीनशे रुपये देण्याचे करारपत्र केले ! मुख्य नायक होता अरुण सरनाईक. नायिका होती उमा. त्या वेळी ती तशी नवीनच होती. तेव्हा वयाच्या बाविसाव्या वर्षी मी चित्रपटाचा नायक बनलो. चित्रपटाचे नाव होते 'यालाच म्हणतात प्रेम.'

शूटिंगचा पहिला टप्पा दादरच्या रूपतारा स्टुडिओत ठरला. माझ्या वाढदिवसाच्या सुमाराला शूटिंग होते. सबंध रात्रभर शूटिंग चालायचे. रात्रीच्या शूटिंगसाठी स्टुडिओचे भाडे निम्मे असायचे म्हणे. पण त्रास खूप व्हायचा. दुसऱ्या दिवशी तांबारल्यासारखे व्हायचे. 'लग्नाची पहिली रात्र' असा प्रथम प्रसंग चित्रित केला. केसांचे जंगल मी डोक्यावर तसेच ठेवले होते. परिपक्व दिसावा म्हणून तलवारकट मिशा राखल्या होत्या. त्या पडद्यावर नकली मिशांसारख्या दिसल्या. चित्रीकरणावर माझ्यासह सारे खूष होते.

शूटिंगनंतर पुण्याला आल्यानंतर 'पहिल्या रात्री'च्या अनुभवावर मी एक रंगतदार लेख लिहिला. चित्रपटाची जाहिरात व्हावी म्हणून सा. 'रसरंग' कडे पाठवला. दादा 'रसरंग'मध्ये वारंवार चित्रपट परीक्षणे व इतर चित्रपटविषयक लेख लिहीत. तेव्हा 'रसरंग'चे संपादक श्री. इसाक मुजावर माझ्या परिचयाचे होते. त्यांनी तो लेख तात्काळ माझ्या व उमाच्या फोटोसह छापला. लेख बराच गाजला. लोकांच्या अपेक्षा माझ्याबद्दल वाढल्या. शूटिंगच्या वेळी स्टिल फोटोग्राफर श्री. राव यांनी माझे हौसेने बरेचसे फोटो काढले होते. माझ्या-उमाच्या एकत्र छायाचित्रांची ऑर्डर मी त्यांच्यापाशी नोंदवली. त्यांनी तत्परतेने सहा फोटो पाठवले. त्यांचे बिल होते— पंचाहत्तर रुपये. तोवर तेवढेच पैसे शूटिंगदाखल मला 'नालंदा'कडून मिळाले होते ! मुंबईतील हॉटेलात राहण्याचा खर्च माझा मीच केला होता.

'यालाच म्हणतात प्रेम'चे चित्रीकरण खूप रेंगाळले. दुसरा टप्पा होता कोल्हापूरचा जयप्रभा स्टुडिओ.

स्टुडिओचे स्वच्छ आवार व तेथील शिस्तबद्ध वातावरण मला खूप आवडले. श्री. भालजी पेंढारकर तेथे ओझरते दिसले. पण तेव्हा त्यांचा परिचय घडला नाही.

सुमारे आठवडाभर शूटिंग होते. पुन्हा पूर्ण रात्री. या वेळी नीलम या कोल्हापूरच्या अभिनेत्रीचा परिचय घडला. तो अजूनही टिकलाय. एक प्रसंग होता— मी उमाच्या थोबाडीत मारतो. मारण्याचे नाटक मला जमले नाही. खरोखर चपराक मारली. बिचारी खूप वेळ रडत होती. तिचे पालक माझ्यावर रुष्ट होते. अरुण सरनाईक अत्यंत सौजन्याने वागला. त्याच्या अभिनयाबद्दल मला नेहमी आदर वाटत होता. रंगभूमीवर व चित्रपटातसुद्धा. वस्तुतः मी त्याचा चाहता बनलो. त्याच्या अपघाती मृत्यूची वार्ता पुढे मी मॉस्कोत असताना जेव्हा समजली, तेव्हा कित्येक दिवसपर्यंत मी अस्वस्थ होतो.

कोल्हापूरच्या चित्रीकरणावेळी दिग्दर्शक माधव वेलणकरांनी मला आश्चर्याचा धक्का दिला. तोवर 'रसरंग' मधून माझा लेख प्रसिद्ध होऊन आला होता. एक दिवस ते सेटवर म्हणाले, "तुमच्या काही प्रसंगांचं संवादलेखन तुम्ही लिहाल ?" मूळ लेखक श्री. फाटक यांची त्यांनी संमती घेतली असावी. मूळ लेखनाचा पसारा जरा कात्री चालवून आवरायचा होता. मी तसाच सेटवर लिहीत बसलो. लेखन माझ्या हातून सहजगत्या घडते. तब्बल दोन वर्षांच्या काळानंतर चित्रपटाचे चित्रीकरण पूर्ण झाले. दरम्यान लेखन व नाटकांमध्ये किरकोळ भूमिका असा उद्योग होता.

अखेर मुंबईतील मॅजेस्टिक चित्रपटगृहात 'यालाच म्हणतात प्रेम' प्रदर्शित झाला. मी प्रीमियरसाठी एकटाच गेलो होतो. चित्रपटाच्या पूर्वार्धात मला काम नव्हते. म्हणून इंटरवलच्या वेळी जागीरदार थट्टेने म्हणाले, "काय रे, तुझं नाव नुसतंच वाचलं ! चेहरा पडद्यावर अजून दिसलाच नाही ! !" श्रेयनामावलीत नवा चेहरा अनिल असे लिहिले होते.

उत्तरार्ध सुरू झाला आणि माझे नष्टचर्य सुरू झाले. वाईट छायाचित्रणामुळे पडद्यावर मी भयाण दिसत होतो. प्रेक्षक मला हसू लागले. थिएटरमधून मी कसाबसा निसटलो. सबंध चित्रपट तेव्हा कधी बघितलाच नाही.

'चित्रपट दुपारी तीन वाजता लागला आणि साडेतीन वाजता पडला' असे खवचट वाक्य बाबूराव गोखले नेहमी म्हणत. 'यालाच म्हणतात प्रेम'च्या

संदर्भात हे वाक्य खरे ठरले ! उत्तम चित्रपट कलाकार होण्याच्या माझ्या आशा पहिल्या सलामीत धुळीला मिळाल्या होत्या. त्या कोवळ्या वयात ते अपयश पचविणे फार कठीण गेले. मी मुंबईहून लगोलग पुण्याला आलो. पुण्यातही चित्रपटाच्या अपयशाची पुनरावृत्ती. पण खचलो नाही. फर्गसनच्या लेडीज होस्टेलच्या एका एकांकिकेचे दिग्दर्शन हौसेने पत्करले. सुंदर मुलींच्या सहवासात बरे वाटायचे. चित्रपटाच्या अपयशाच्या दुःखावर त्या मुलींच्या सहवासात हळुवार फुंकरी बसल्या. पुढे पुढे त्यांच्यापैकी कुणीतरी भेटावी म्हणून मी संध्याकाळच्या वेळी मुद्दाम फर्गसन रस्त्यावर फिरायला जायचो. एखादीचे किंचित स्मित झेलतच आनंदाने तरंगत घरी यायचो.

दरम्यान पद्माकर गोवईकर मराठी चित्रपटात नट म्हणून आला. तो लेखकच. त्याला व मला 'किर्लोस्कर' मासिकाने प्रश्नावली धाडली. 'सिनेमात जायचंय ?' असे शीर्षक होते. मी व त्याने परखडपणे लेख लिहून दिले. मी लिहिले, 'मराठी चित्रपटात मानधन फार कमी देतात. स्वतःच्या कपड्यांना इस्त्रीसाठी पैसे देणेसुद्धा परवडत नाही. सुशिक्षित तरुणांसाठी चित्रपट हा व्यवसाय नव्हे.' कधी नव्हे ते 'किर्लोस्कर' मासिक मराठी चित्रपट व्यावसायिकांनी वाचले. आमच्यावर बहिष्कार टाकायचा असे म्हणे ठरले.

पण दोन-तीन वर्षांनंतर मला आणखी एक मराठी चित्रपट मिळाला. फक्त मराठी नव्हे, मराठी-भोजपुरी असा द्विभाषिक होता. दत्ता धर्माधिकारींचे साहाय्यक-दिग्दर्शक दत्ता केशव यांनी जुन्या ओळखीला स्मरून मला खलनायकाची भूमिका दिली. त्या विनोदी चित्रपटाचे नाव होते 'अति शहाणा त्याचा.' या चित्रपटाचे नायक राजा गोसावी व शरद तळवलकर होते. नायिका रत्ना होती. शिवाय लक्ष्मीछाया.

ह्या चित्रपटाचे निर्माते लाल नावाचे एक सिंधी गृहस्थ. मोठा नमुनेदार माणूस होता. चुटके, विनोदी कथा सांगायची त्यांना फार आवड.

पुन्हा पूर्ण रात्रीचे शूटिंग वाट्याला आले. लाल यांनी मोबदला तीनशे रुपये ठरवला ! मी कुरकुरलो. ते म्हणाले, "तुमचे हीरो हजार रुपयांत कबूल करतात, तर तू कालचा पोरगा कुरकुरतोस !" हे ऐकून माझी बोलती बंद.

'अति शहाणा'च्या शूटिंगवेळी एक संकट माझ्यावर आले. एक-दोन प्रसंगांमध्ये एका अल्सेशिअन कुत्र्याबरोबर काम करायचे होते. लहानपणापासून

मला कुत्र्यांची जबरदस्त भीती ! आता आली पंचाईत. शेवटी प्रसंग कसेबसे निभावून नेले.

चित्रपटाच्या उत्कट बिंदूचे चित्रीकरण मुंबईबाहेर वेस्टर्न हायवेवर होते. राजा गोसावी मोटार चालवतात. त्या मोटारीच्या टपावर बांधलेल्या शिडीला मी लोंबकळत असतो. राजा गोसावींनी एकदम ब्रेक लावला. शिडी तुटली आणि मी मोटारीच्या पुढच्या मडगार्डपाशी कोसळलो. हा शेवटचा शॉट होता. चाकाखाली सापडलो असतो. ह्या प्रसंगाबाबत लाल साहेबांनी एक फालतू जोक मारला.

ह्या चित्रपटाची बिदागी मोठ्या मजेशीरपणे मिळायची. दहा, वीस रुपये अशा हप्त्यांनी. शेवटी लाल साहेबांनी कुर्ल्याच्या बँकेचा पंचवीस रुपयांचा चेक दिला. आता कुर्ल्याला मी कसा जाणार ? त्यांनी स्वतःच्या सुरेख लाल रंगाच्या स्पोर्ट कारमध्ये मला बसवले व थेट कुर्ल्यापर्यंत ते घेऊन गेले. नंतर परत अंधेरीला त्यांनी मला सोडले. येता-जाता त्यांच्या आगामी 'बिरबल' चित्रपटातील विनोदी प्रसंग ऐकण्याची शिक्षा मिळाली. पण पुढे त्यांनी भलेपणाने हिंदी चित्रसृष्टीतील ख्यातनाम दिग्दर्शक रवीन्द्र दवे यांच्याशी माझा परिचय करून दिला. पुढे पाच वर्षांनंतर रवींद्र दवे यांनी 'रोड टू सिक्किम' या स्वतःच्या हिंदी चित्रपटात मला हेराची भूमिका दिली. ह्या चित्रपटात फक्त एक दिवसाचे शूटिंग केले. अवघ्या एका प्रसंगाचे चित्रण झाले. विख्यात अभिनेत्री ललिता पवार यांच्याबरोबरचा प्रसंग होता. एकही रीटेक न होता चित्रण पार पडले. हा चित्रपट मी कधीही पाहिला नाही. देवकुमार नावाचा नवा हिंदी नायक या चित्रपटामार्फत चित्रव्यवसायात आला.

*

## नाट्य-निकेतनच्या रौप्यमहोत्सवी वर्षात 'भटाला दिली ओसरी'

दोन चित्रपटांच्या अनुभवानंतर मी व्यावसायिक नाटकाची निर्मिती केली. एम. ई. एस. कॉलेजातील नाटकातील माझा सहकारी कलावंत दामोदर कानिटकर याने नाटकाचे लेखन करण्याचा प्रयत्न केला. नाटकाचे नाव 'थोडं कडू थोडं गोड.' त्या नाटकात मला वाव असलेली भूमिका होती. नाटक व्यावसायिक रंगभूमीवर आणण्याचे मी ठरविले. राजा नेने, माई भिडे यांच्यासारखे नामवंत कलावंत परिचयाचे होते. थोड्या आर्थिक भांडवलासाठी श्री. सहस्रबुद्धे नावाचे गृहस्थ पाठीशी उभे राहिले. दामू कानिटकरलाही भूमिका दिली. पुण्याच्या प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशनच्या 'प्रेमा तुझा रंग कसा' मधल्या बब्बडच्या भूमिकेमुळे गाजलेल्या भारती मराठेला एक भूमिका देऊ केली. भारती शाळेच्या दिवसांपासून ओळखीची होती. ती हौशी रंगभूमीवरची कलावंत होती. त्या वेळी आर्थिक प्राप्ती व्हावी म्हणून ती माझ्या नाटकात काम करायला कबूल झाली. अंगाचा बांधा लट्ठ असूनही तिचा चेहरा गोड होता. गाणारा गळा होता. अभिनय छान करायची. आमची पूर्वीची मैत्री या नाटकामुळे दृढ बनली.

दोन-तीन महिन्यांच्या तालमींनंतर नाटक बसत आले. 'श्री स्टार्स' मध्ये असताना बाबूराव गोखले नाटकाच्या निर्मितीचा खर्च कमी कसे करायचे हे मी पूर्वीच बारकाईने टिपून ठेवले होते. आमच्या नाटकाचा मी शक्यतो कमी खर्च ठेवला. १९६५ साल संपत आले होते. सुटीच्या दिवशी पुण्याच्या भरत नाट्य मंदिरात दुपारी तीन वाजता नाटकाचा पहिला खेळ ठरविला. पहिला प्रयोग

चांगला झाला. उत्पन्नाच्या दृष्टीने बेतास बात गेला. माझी अवखळ भूमिका प्रेक्षकांना आवडली.

पण नशिबाने माशी शिंकली. तिसऱ्या प्रयोगाच्या दरम्यान भारत-पाकिस्तान युद्ध सुरू झाले. पुण्यात प्रकाशबंदी जाहीर झाली. आमच्या प्रयोगाची तिकीटविक्री फक्त दोन रुपये होती ! 'अपरिहार्य कारणा'ची पाटी थिएटरवर लावली. सर्व कलाकारांना प्रयोग रद्द झाल्याचे कळविले. भारतीला रिक्षात बसवून बंडगार्डनकडे निघून गेलो. तिथल्या पुलावर शांतपणे तिच्याशी बोलत बसलो.

युद्धाच्या आपत्तीमुळे नाटक थांबले. थोडा आर्थिक फटका बसला. श्री. सहस्रबुद्धे यांना नंतर कर्जफेडीचा मी वायदा केला. माणूस बिचारा सज्जन.

मी पुन्हा उभारी घेतली. इतर संस्थांच्या नाटकांमध्ये मी कामे करू लागलो. 'थोडं कडू थोडं गोड'च्या एका प्रयोगाला ज्योत्स्नाबाई भोळे आल्या होत्या. त्यांना माझे काम आवडले होते. त्यांनी मो. ग. रांगणेकरांपाशी माझी शिफारस केली. श्री. रांगणेकर त्या वेळी नाट्य निकेतनचे रौप्यमहोत्सवी वर्ष साजरे करण्याच्या गडबडीत होते. नाट्य निकेतनची पूर्वीची सर्व गाजलेली नाटके पुन्हा रंगभूमीवर आणण्याचे त्यांनी ठरविले. 'कुलवधू', 'राणीचा बाग', 'भटाला दिली ओसरी' ह्या नाटकांमध्ये पूर्वीचे कलावंत काम करायला आले. पण 'भटाला दिली ओसरी' मध्ये प्रभाकर पणशीकर आले नव्हते. त्यांनी पूर्वी गाजवलेली कवीची भूमिका रांगणेकरांनी मला देऊ केली.

मुंबईत गिरगावातील नाट्य निकेतनच्या कचेरीत मी तालमीसाठी उभा राहिलो. खुद्द रांगणेकर तालमी घेत होते. व्यावसायिक नाटकात काम करण्याचा आनंद प्रथमच अनुभवत होतो. मराठी रंगभूमीच्या इतिहासात नावाजलेल्या नाट्यसंस्थेच्या व नामवंत नाटककारांच्या नाटकात काम करत होतो. नाट्य व्यवसाय पत्करल्याचे चीज झाले असे वाटले. 'भटाला'चे प्रयोग पुण्या-मुंबईत झाले. प्रयोग छान रंगत होता. पण आरडाओरडा करताना माझा आवाज कमी पडत होता.

प्रयोग सुरू होण्यापूर्वी श्री. रांगणेकर कोटावर मोत्यांचे पेंड लावून थिएटरबाहेर उभे राहायचे. प्रॉम्टिंगसाठी स्वतः विंगेत धावपळ करायचे. त्यांच्या मार्गदर्शनाखाली खूप शिकायला मिळाले. त्यांच्या मिस्कील सहवासात आनंद

मिळायचा. चाळीस रुपये मला नाईट मिळायची.

नाट्य निकेतनने कोल्हापूर-सांगली व मिरज दौरा काढला. त्या वेळी 'कुलवधू'च्या प्रयोगाला मी विंगेत बसून राहायचो. 'बोला अमृत बोला' हे पद सुरू होताच अंगावर रोमांच उभे राहायचे. रंगभूमीच्या वैभवशाली इतिहासात मन रंगायचे. ज्या कलाकारांनी इतिहास घडवला त्यांचा अभिनय 'याचि देही याचि डोळा पाहिला' म्हणून मनात धन्य भावना दाटायची.

सुखाचे दिवस लवकर संपतात असे म्हणतात. 'भटाला दिली ओसरी'चे फार प्रयोग झाले नाहीत. त्यानंतर मुंबईतील दुसऱ्या नाटक कंपनीने मला कधी काम दिले नाही. दरम्यान आशा नावाच्या तिशीतील घटस्फोटितेशी माझा परिचय घडला. गौरवर्णी, कुरळ्या केसांची, पारदर्शी बदामी डोळ्यांची आशा मला एकदम आवडली. ती माझ्यापेक्षा सहा वर्षांनी मोठी होती. पाहता पाहता आम्ही झपाट्याने एकमेकांमध्ये मनाने गुरफटलो.

माझा शाळूसोबती विद्याधर गाडगीळ याच्या अंधेरीतील लल्लूभाई पार्कमधील एका छोट्या अपार्टमेंटमध्ये त्याच्यासह मी राहत होतो. विद्याधर नाट्यदिग्दर्शक श्री. भालबा केळकर यांचा भाचा होता. त्याच्या थोरल्या भावाने त्याला अपार्टमेंट बांधून दिले होते. फिल्म इन्स्टिट्यूटमध्ये विद्याधरने एडिटिंगचा डिप्लोमा पूर्ण केला होता. तो चित्रपटक्षेत्रात उमेदवारी करायचा. साहित्याची त्याला छान जाण होती. कधी कधी छानदार वाक्ये बोलायचा. 'आपली मोटार रस्त्याच्या कोपऱ्याला उभी करावी आणि मगच लोकांना सांगावे की, चालणे आवश्यक आहे, तेव्हा लोक तुमचे बोलणे मान्य करतील.' अशा तऱ्हेने बोलायचा. वरळीच्या रॅमनार्द फिल्म लॅबच्या प्रवेशदालनात त्याच्याबरोबर बसून मी वेळ काढायचो. उरल्या वेळी टेलिफोन ऑपरेटरची नोकरी करणाऱ्या आशाला फोन करायचो. संध्याकाळी तिच्यासह फोर्ट, मरीन ड्राईव्ह, कुलाबा या भागांमध्ये पायी फिरायचो. माझी कफल्लक अवस्था ध्यानात घेऊन बिचारी कॉफीचे खर्च सोसायची. माझे जीवन अधांतरी बनले. त्याला नेमकी दिशा गवसेना. दुपारी जेवताना रात्रीच्या जेवणाची भ्रांत असायची. कधी आशा, कधी दुसरे मित्र उसने पैसे देत. पण कधीही उपाशी राहिलो नाही. उडपी, पंजाबी हॉटेले अन्नदाते होते. कधी अंधेरीचे उजाला रेस्तराँ, कधी पत्र्याच्या शेडमधील कँटीन. कधी मटण-मसाला, तर कधी दाल फ्राय.

असा मामला चालायचा. ब्रेकफास्ट नसायचा.

विद्याधर आरेच्या बाटलीतून दूध तसेच कच्चे प्यायचा. मी त्याचे अनुकरण केले. मग एक दिवस मला दूध बाधले. तेव्हापासून नुसते दूध पिणे मी बंद केले. अंधेरीत आसपास इंडियन एअरलाईन्सचे पायलट राहायचे. त्यांच्यात पुण्याचा माझा मित्र अरुण गोडबोले राहत होता. वैमानिकाचे खडतर प्रशिक्षण त्याने नुकतेच पूर्ण केले होते. त्याने व त्याच्या मित्रांनी पहिल्या पगाराचा आनंद आम्हाला बियर पाजून साजरा केला. बस्स ! त्या अवघड काळात माझे मद्यप्राशन तेवढेच ठरले. दुःख झाले म्हणून दारू पिणाऱ्यांपैकी मी नव्हे. दारू आनंदी मनःस्थितीत प्यावी असे मला वाटते. अर्थात मद्यप्राशनाची चैन परवडण्यासारखी नव्हती. कोका कोला पिऊन विद्याधरबरोबर संध्याकाळच्या गप्पा रंगायच्या. स्वप्ने रंगविण्याचा तो काळ होता.

आशाशी सहजीवनाच्या योजना मी मांडायचो. तिला पहिल्या लग्नाची सात-आठ वर्षांची मुलगी होती. कधी कधी ती माझ्या स्वप्नांमध्ये रमायची. पण लगेच बिचकून भानावर यायची, माघार घ्यायची. मला केवळ मैत्रीवर समाधान होत नव्हते.

त्याचे कारण बाविशीत मी सेक्सचा अनुभव घेतला होता. पुण्यात एका वडीलधाऱ्या मित्राने वेश्येकडे मला नेले होते. नंतर सुमी नावाची हौशी अभिनेत्री भेटली. तिच्याशी दोन महिने भरपूर आनंद लुटला. प्रभात स्टुडिओशेजारच्या उघड्या मैदानात, मित्राच्या खोलीत, मित्राच्या बंद मोटारीतील मागच्या सीटवर वगैरे. एक दिवस सुमीने गनोरियाचा प्रसाद दिला. मग एका मित्राने धावाधाव करून डॉक्टरकडे नेऊन उपचार केले. लौकरच त्या व्याधीतून मुक्त झालो. मनात धास्ती राहिली. वेश्यांकडे जाण्यासारखी आर्थिक सुस्थिती नव्हती.

अशा दिवसांमध्ये रवींद्र भट मुंबईत भेटला. कॉलेज जीवनातील तो मित्र होता. त्याने लिहिलेल्या 'अवघी दुमदुमली पंढरी' ह्या संगीत नाटकात भूमिका करण्याची मला संधी आली. तत्पूर्वी तो आणि त्याचा भाऊ गणेश भट, 'ते माझे घर' ह्या चित्रपटाच्या निर्मितीत पोळले होते. रवींद्राने प्रथम स्वतः करीत असलेली भूमिका मला देऊ केली. भट बंधू त्या अवघड काळात मला देवासारखे भेटले. जयराम व जयमाला हे शिलेदार पती-पत्नी त्या नाटकात

काम करणार होते. संगीत दिग्दर्शक वसंत देसाई होते. तालमीच्या दिवसांमध्ये वसंत देसाईंच्या पेडर रोडवरील निवासस्थानी जाण्याचा योग आला. या नाटकाच्या निमित्ताने विमलाशी घनदाट मैत्री झाली.

'पंढरी'चा पहिला दौरा आर्थिकदृष्ट्या यशस्वी ठरला नाही. निर्माता म्हणून रवींद्र नावाला होता. पण बोलवित्या धन्यांच्या मॅनेजरने नाईटचे पैसे दिले नव्हते. मात्र गोव्याचा दौरा उत्पन्नाच्या दृष्टीने उत्तम ठरला. गोव्याचे प्रेक्षक संगीतप्रेमी. शिलेदार पती-पत्नींच्या गाण्यांवर ते खूष झाले. रवींद्रची गीतरचना छान होती. पण पैसे मिळत असूनही मॅनेजर महाशय गप्पच. पूर्वीची थकबाकी त्यांनी दिली नाही. गोव्यातील वेगवेगळ्या गावांमध्ये दिवसा प्रवास करायचा. रात्री उशिरा नाटक सुरू करायचे. नाटकानंतर डॉक्टर ब्रँडी प्यायची व जेवायचे. मग पहाटे हळूच विमलाच्या खोलीत जायचे आणि तिच्याशी आनंद लुटायचा असा कार्यक्रम बनला. ती विवाहित होती. दोन मुलींची आई होती. संसारात असुखी होती. माझ्यापेक्षा दहा वर्षांनी मोठी होती. तिने ऑपरेशन करून घेतले असल्यामुळे गर्भधारणेचा धोका नव्हता. मी मनसोक्त आनंद घेत होतो. पण हे नाते त्या दौऱ्यापुरतेच संपले.

शेवटचा प्रयोग करण्यासाठी आम्ही कारवारला गेलो. कारवारचा प्रयोग संपल्यानंतर कंपनी मुंबईला जाणार होती. हॉटेलमध्ये रवींद्र म्हणाला, "अन्या, तुझं जे काही येणं आहे ते आजच वसूल कर त्या मॅनेजरकडून. पुढं पैसे बुडण्याचा धोका आहे." त्या दिवशी प्रयोग 'हाऊसफुल्ल' होता. थिएटरवर जाताच मी मॅनेजरपाशी पूर्वीच्या थकबाकीची मागणी केली. तो टाळाटाळ करू लागला. "मेक-अप करणार नाही, आज मी नाटकात काम करणार नाही." मी धमकी घातली. मग मॅनेजर ताळ्यावर आला. 'पहिला अंक संपल्यानंतर पैसे देतो' असे म्हणू लागला. मी थोडासा धोका पत्करला. पहिल्या अंकानंतर आयुष्यात प्रथमच एक हजारपेक्षा जास्त रक्कम हातात पडली. फक्त माझे एकट्याचे पैसे वसूल झाले असे नंतर कळले.

हा नोव्हेंबर १९६६चा सुमार होता. आता माझ्या डोक्यात विचार येऊ लागले. एव्हाना पंचविशीत आलो. अभिनय आणि लेखन यांच्यावर चांगला चरितार्थ जमणार नाही. केवळ लेखनावर दादांचे चांगले भागत नव्हते हे मी पाहत होतो. अभिनय क्षेत्रात गेल्या आठ वर्षांच्या काळात माझा विशेष उजेड

पडला नव्हता. तेव्हा मुक्त जीवनपद्धती थांबवून एखादी चांगली नोकरी घ्यावी असे मनाने ठरविले. चांगल्या पगाराची नोकरी पत्करावी, मगच अभिनय व लेखन क्षेत्रांमध्ये लुडबूड करावी. त्या क्षेत्रात भाव वाढेल. केवळ त्या दोन क्षेत्रांवर दुपारचे व संध्याकाळचे जेवण अवलंबून ठेवणे योग्य नव्हते असे माझा अनुभव बोलत होता. फार चैनीचे नव्हे, पण छानदार रीतीने जगावे, कुणाचे ओशाळे असू नये अशी धारणा मनात बसली.

दरम्यान दादांना क्षयाची बाधा झाली. त्यातच वाईट म्हणजे ताईचा मधुमेह बळावला. अशा परिस्थितीत मी बेकार होतो. दादांच्या नावे लेखन करीत होतो. नव्या वर्षाचा शेवटचा दिवस छान साजरा करावा असे त्या वेळी तीव्रपणे वाटायचे. शिंदेसुद्धा या वेळी चुकून कफल्लक बनले होते. त्यांच्याजवळच्या तुटपुंज्या पैशांवर आम्ही 'लकी'त चहा पिऊन नववर्षाची पूर्वसंध्या साजरी केली.

नोकरीचा शोध मी सुरू केला. कोणतीही नोकरी करायला तयार होतो. मन निराशेच्या टोकाला जायचे. आत्मघाताचे विचार येत. एकूण प्रथमपासून मृत्यूविषयी आकर्षण वाटायचे. पुण्यातील प्रतिभा ॲडव्हर्टायझर्सकडे मी चाचपून पाहिले. मुंबईत 'शिल्पी'मध्ये अच्युत बर्व्यांना जाऊन भेटलो. नोकरीचे काही जमेना.

तेवढ्यात जर्मन टी. व्ही. वर छायालेखक म्हणून काम करणारा विजय परूळकर आला. हा धडाडीचा मराठी तरुण चार वर्षांपूर्वी पुण्याच्या फिल्म इन्स्टिट्यूटमध्ये मला भेटला होता. डिप्लोमा पूर्ण करण्यापूर्वीच पश्चिम जर्मनीच्या टी. व्ही. च्या लोकांनी त्याला नोकरीवर घेतले होते. असा तो जात असताना त्याची मी धावती मुलाखत घेतली व 'नवे जग' मासिकात परिचय छापला होता. ती ओळख आठवून दरम्यानच्या काळात विएतनामला किमान वीस वेळा चकरा मारून महाशय मला भेटायला आले. त्याच्यापाशी समृद्ध अनुभव होते. त्याने सांगितलेल्या एका अनुभवाचे शब्दांकन करून नमुन्यादाखल लेख बनवून त्याच्याबरोबरच्या फोटोंना घेऊन सा. 'माणूस'च्या श्री. ग. माजगावकरांना तडक भेटलो. माजगावकरांना लेख व फोटो आवडले. त्यांनी आणखी लेखांची मागणी केली. पण विजयला सवड नव्हती. तो दिल्लीत राहत होता. मग मी दिल्लीला जायचे असे ठरले. माजगावकरांनी प्रवासखर्च

मंजूर केला. विजयने मला त्याच्या घरातच मुक्काम टाकण्याचे निमंत्रण दिले. दिल्लीला जायला मिळणार म्हणून मी ते काम स्वीकारले.

'राजधानी'च्या सुशीतल डब्यातून बाहेर पडताच दिल्ली स्टेशनवर भेटायला आलेल्या विजयने त्याच दिवशी जर्मन टी. व्ही. ची नोकरी सोडली असे समजले. तरीसुद्धा त्याच्या घरात आम्ही आमची बैठक मांडली. सकाळी त्याने सांगायचे आणि दुपारी मी लिहायचे असा क्रम होता. आठ दिवसांत आठ लेख तयार झाले. लेखनाचा वेग जबरदस्त होता. 'विएतनामच्या भूमीवर', 'विएतनामच्या पाण्यात', 'विएतनामच्या आकाशात' अशी मालिका तयार झाली. माझे गिचमिड अक्षर पाहताच विजय मोठ्यांदा ओरडला, "हात्तिच्या, म्हणून तुझं लेखन प्रसिद्ध होतंय ! आम्ही च्या मारी कोरीव अक्षर काढून मासिकांकडे लेखन पाठवत होतो. पण नेहमी साभार परत !"

विजयच्या साहाय्याने दिल्ली दूरदर्शन केंद्र बघायला मिळाले. परूळकर कुटुंबाचा निरोप घेऊन पुण्याला परतलो. लेखांचा गठ्ठा माजगावकरांच्या हवाली केला. पण त्या वेगात त्यांनी लेख प्रसिद्ध केले नाहीत. शिवाय शब्दांकन ही संकल्पना वाचकांमध्ये तेवढी रुजली नव्हती. कारण लेख पुढे प्रकाशित झाल्यानंतर अनेकांना ते अनुवाद वाटले.

दरम्यान दादांना मुंबईतील 'सोविएत देश'च्या कचेरीतून नोकरीचे आमंत्रण आले. मुंबईत राहणे त्यांना जमण्यासारखे नव्हते. 'सोविएत देश'च्या संपादक मंडळातील श्री. रंगनाथ कुलकर्णी व तेथील मॅनेजर श्री. श्रीनिवास कोर्लेकर दादांचे स्नेही होते. मी पटकन म्हणालो, "मी करतो ही नोकरी. तुम्ही त्यांच्यापाशी माझी शिफारस करा." दादांनी तसे पत्र लिहिले. नाटकांचे नादी रंगनाथ मला आधीपासून ओळखत होते. 'मनोहर' मधील लेखांमार्फत कोर्लेकर ओळखत होते. दोघांनी काही हरकत घेतली नाही. व्हाईस-कॉन्सल आर. जी. अकुलोव यांच्या मुलाखतीसाठी त्यांनी तात्काळ मला पाचारण केले. मी नट होणार नाही ह्याची दादांना खंत वाटली. खरे स्वप्नाळू होते. कला प्रांतात मी काय काय पाहिले होते हे त्यांना माहीत असते तर ? त्यांची भाबडी स्वप्ने त्यांच्यापाशीच राहिली. मी नोकरीत अडकत होतो हे पाहून त्यांना मनोमन वाईट वाटत होते. पण नोकरीत प्रवेश करण्यासाठी मी उत्सुक होतो. पुणे सोडायला अधीर होतो. मुंबई मला बोलावत होती. नव्या जीवनाच्या वाटा फुटत होत्या. *

# रशियाच्या नोकरीला आरंभ

## रशियाच्या नोकरीला आरंभ

एक मार्च १९६७ रोजी मी पुणे सोडले. २ मार्चला मुंबईतील सोविएत वकिलातीच्या माहिती शाखेच्या कचेरीत म्हणजेच 'सोविएत देश' पाक्षिकाच्या ब्रीच कँडीजवळच्या बंगलेवजा कचेरीत गेलो. कचेरीप्रमुखांशी ओळख करायला म्हणून रंगनाथ कुलकर्णी सोबतीला होते. सहा फूट उंचीचे धिप्पाड दाढीवाले रोस्तीस्लाव गावरिलोविच अकुलोव रशियन हेलातील इंग्रजी सौम्य स्वरात बोलत होते. माझ्याबद्दल त्यांना आधीच सर्व माहिती ज्ञात असावी. औपचारिक वाक्यानंतर निरोपादाखल ते मला म्हणाले, "तू उद्यापासून कामावर रुजू हो."

दुसरा मजला उतरून खाली आलो तेव्हा कुठे मला रंगनाथांकडून समजले : महिना सातशे रुपये पगारावर द्वितीय श्रेणीचा अनुवादक म्हणून माझी नेमणूक झाली होती !

त्या क्षणापासून माझ्या जीवनाला विलक्षण वेग आला. इंग्रजीतून मराठीत अनुवाद करणे म्हणजे माझ्या दृष्टीने हातचा मळ. पण इंग्रजीतून रिपोर्टिंग करण्याचा नवा अनुभव होता. कुरानोव नावाच्या नंबर दोनच्या रशियन अधिकाऱ्याने मुद्देसूद बातमी लिहावी म्हणून मला समज दिली. एकूण सांभाळायला रंगनाथ कुलकर्णी होतेच. लौकरच कामात जम बसला. मी कधी कामचुकार वागत नाही. भरपूर काम करतो. रशियनांनी माझ्या कष्टांचे चीज केले. तीन महिन्यांच्या प्रोबेशन पीरियडनंतर मी कायम झालो.

दरम्यान अंधेरीला विद्याधरकडे पथारी होती. अंधेरीपासून ब्रीच कँडीपर्यंत

रोजच्या रोज जाणे-येणे मला त्रासदायक वाटू लागले. शिवाय आता विद्याधर चमत्कारिक वागू लागला. तेव्हा मी नवी जागा शोधायच्या उद्योगास लागलो. एका वीक-एन्डला पुण्यात अनिल केळकर भेटला. तो म्हणाला की, त्याच्या मुंबईच्या मामांची बदली दिल्लीला झाली होती. मामा-मामी वांद्र्याला पाली हिलच्या पायथ्याशी एक बेडरूमच्या अपार्टमेंटमध्ये राहत होते. त्यांना भाडे माफक होते. त्यातच शंभर रुपयांची भर मिळावी अशी त्यांची रास्त अपेक्षा होती.

मी ताबडतोब पाली हिलच्या पायथ्याशी गेलो. अनिलचे मामा कबूल झाले. नाट्य-चित्रसृष्टीबाहेर पडल्यानंतर जागेबद्दलचे माझे स्वप्न तात्काळ साकार झाले. हिंदी चित्रसृष्टीतील माणसे राहत असलेल्या पाली हिलच्या आसपास राहावे अशी फार दिवसांपासून माझी इच्छा होती. अडीचशे रुपये मी भाडे कबूल केले. अपार्टमेंट सुंदर प्रशस्त होते. जीवनाकडे पाहण्याचा माझा दृष्टिकोन ७० मि.मी.चा आहे. शक्य असेल तर भरघोस जगावे.

पुण्याला 'मनोहर' मासिकातर्फे एक समारंभ होता. आमच्या कचेरीतर्फे प्रतिनिधी म्हणून, एस.पी. कॉलेजच्या रमाबाई हॉलमधील समारंभात, मी आलो होतो. समारंभाशेवटी भारती जवळ आली. निरोप घेताना दुसऱ्या दिवशी भेटण्याचा वायदा करून गेली.

'थोडं कडू' नंतरच्या कडवट अनुभवानंतर मुंबईत घडलेल्या अशा कटु प्रसंगांनंतर ती मला प्रथमच भेटत होती.

हकीगत अशी होती— त्या नाटकाच्या प्रथम प्रयोगाला संगीत-दिग्दर्शक श्री. राम कदम यांना मी बोलाविले होते. नाटकात भारतीला गाणी होती. रामभाऊंना तिचा आवाज आवडला. काही दिवसांनंतर त्यांनी तिला पार्श्वगायनाची संधी दिली. रेकॉर्डिंगसाठी मुंबईला राजकमल स्टुडिओत जाणे आवश्यक होते. मी तिच्याबरोबर सोबत म्हणून जायला तयार झालो. ती माझ्या येण्याबद्दल विशेष उत्सुक नव्हती.

कारण बंड गार्डनवरच्या गप्पांमध्ये तिने मनमोकळेपणाने सांगून टाकले होते की, नाटककार विजय तेंडुलकरांच्या ती प्रेमात पडली होती. दोघांच्या वयात खूप फरक असूनही तिचे त्यांच्याशी लैंगिक संबंध होते. तेंडुलकरांना स्वतःच्या जीवनातील 'पहिला पुरुष' म्हणून तिने स्वेच्छेने निवडले होते. ते ऐकताना मला

ह्या गोष्टीत वावगे काहीच दिसले नाही.

पण मुंबईत राजकमल स्टुडिओवर मी थोडा हिरमुसलो. तो काळ माझा पडतीचा आणि एकाकीपणाचा होता. ती पार्श्वगायिका म्हणून नावारूपाला यावी अशी माझी मनोमन इच्छा होती. पण या प्रेमिकेने आपल्या प्रियकराला स्टुडिओवर भेटण्यासाठी आधीच निमंत्रित केले होते. मीच आयत्या वेळी तडमडलो होतो. रेकॉर्डिंग संपले तेव्हा आम्ही दोघे स्टुडिओबाहेर उभे होतो. लौकरच विजय तेंडुलकर केसांचा ऐटबाज तुरा काढून टॅक्सीतून आले. माझ्याशी जुजबी बोलल्यानंतर दोघे टॅक्सीत बसून निघून गेली. उदास मनाने मी विद्याधरकडे गेलो. कोका कोल्यात आम्ही ती संध्याकाळ बुडवली !

आता परिस्थिती वेगळी होती. छान पगाराची नोकरी व प्रशस्त अपार्टमेंट माझ्यापाशी होते. माझे वय २७ होते. तेव्हा लग्नेच्छु तरुणींसाठी लायक नवरा होतो.

गोड बोलून भारतीने माझ्याकडून मुंबईचे निमंत्रण घेतलेच.

मुंबईत लवकरच ती माझ्याकडे थडकली. काही दिवसांनंतर तिने लग्नाचा प्रस्ताव मांडला.

एव्हाना तिच्या ध्यानात आले असावे. केवळ तिच्यासाठी म्हणून विजय तेंडुलकर स्वतःच्या बायको-मुलांचा त्याग करणार नव्हते. चोरट्या संबंधांमधून वाफ लवकर जाते. भारतीला मुळात त्यात थ्रिल वाटत होते. ऊठसूट ज्याला-त्याला ती हे गुपित सांगायची. तिने या वेळी मला पटवायला आरंभ केला.

मीही विचार केला. नोकरी आणि घर असे सुरळित जीवन माझ्या वाट्याला आले होते. हॉटेलांमध्ये जेवायचा कंटाळा आला होता. वेश्यांकडे जायचा कंटाळा आला होता. खिशात पैसे खेळू लागल्यानंतर मुंबईतील कुलाबा, ग्रँट रोड, खारचा लिंकिंग रोड येथील वेश्यांचे अड्डे मी एव्हाना पालथे घातले होते. त्या विषयावर चक्क प्रबंध लिहिला असता !

भारतीच्या अभिनयगुणांबद्दल व गायनाबद्दल मला कौतुक होते. शिवाय एम.ए.ला ती सुवर्णपदक विजेती होती. आता चोरट्या लैंगिक संबंधांबाबत बोलायचे तर त्याबाबत ती प्रामाणिक होती. तिचे वर्तन आपल्याकडील सामाजिक चौकटीत बसत नसेल. तिचा लठ्ठपणा तिच्या लग्नाआड येत असावा.

अशा समविचारी, कलावंत मैत्रिणीबरोबर सहजीवन सुरू करण्यास काय हरकत होती ? योनिशुचितेवर माझा विश्वास नव्हता. अजून आशाचा निर्णय पक्का होत नव्हता. तिच्या मुलीच्या लहरींनुसार ती मला झोके द्यायची. शेवटी वडिलांना चिठ्ठी लिहून ती चिठ्ठी भारतीपाशी मी दिली. त्याच्यात लिहिले होते, 'भारती मराठेला आरती हवालदार करण्याचा निश्चय केला आहे.'

दादा एकदम खूष झाले. वस्तुतः माझा बाप जगावेगळा होता. आर्थिक परिस्थिती चांगली नसूनही त्यांनी माझ्यापासून पैशांची मदत अपेक्षिली नाही. पहिल्या पगारानंतर मी ताईला साडी वगैरे घेतली. पण त्यानंतर काही नाही. मी फर्स्टक्लासमधून प्रवास करावा असे दादांना वाटायचे.

३ नोव्हेंबर १९६७ रोजी मी आणि भारती मराठेने पुण्यात नोंदणी पद्धतीने विवाह केला. फॉर्म वगैरे आधी आणून ठेवण्याची कामे भारतीनेच उरकली. दोन्हीकडच्या वडीलधाऱ्यांनी स्वागत समारंभ आयोजित केला. पुण्यातील साहित्य-वृत्तपत्रीय क्षेत्रांतील बरीच मंडळी होती. भारतीची आई म्हणजे कवयित्री-गायिका संजीवनी मराठे. त्यांच्या गाण्यांचा मी चाहता होतो.

चित्रपटात दाखवितात तशी लग्नानंतर पहिली रात्र आमच्याबाबत घडली नाही.

मुंबईतील पाली हिलच्या पायथ्याशी आमचा नवा संसार सुरू झाला. तेव्हा मला साक्षात्कार घडला की, समोर कॉफी पिणारी तुमची मैत्रीण तुम्हाला उत्तम समजून घेते आणि ज्या क्षणी ती तुमची बायको बनते, त्या क्षणापासून तिची समंजसता एकदम नाहीशी होते ! त्या सहीनंतर एकदम पालट घडतो. प्रथम मिठाचा खडा भारतीने टाकला. उत्कट शृंगारानंतर ती रडू लागली. 'विजय तेंडुलकरांची आठवण येते' म्हणाली. आता काय करणार ? बरोबरच्या सामानातून तिने तेंडुलकरांच्या प्रेमपत्रांचा व 'महाराष्ट्र टाईम्स'मधील त्यांच्या 'कोवळी उन्हे'च्या लेखांचा भारा आणला. ते पाहून माझ्यातील पुरुष खवळला. गोष्टी पुढे चिघळत गेल्या. मी दिवसभर ऑफिसच्या कामात गुंतून राहायचो. त्या वेळी घरात तिच्या रिकाम्या मनात सैतानाचे नाच चालायचे. माझे आणि आशाचे प्रेमप्रकरण चालूच होते अशी तिने समजूत करून घेतली. प्रत्यक्षात तसे काहीच नव्हते. मी आशाचे साधे चुंबनही घेतलेले नव्हते !

मग भारतीची आई होण्याची घाई चालू झाली. विलक्षण मतलबी,

आक्रस्ताळी. माझ्या ध्यानात आले, राजरोसपणे मातृत्व प्राप्त करून घेण्यासाठी तिने हा आटापिटा केला. मला एवढ्यात मूल नको होते. माझी आर्थिक स्थिरस्थावर झाली नव्हती. आर्थिक टंचाईपायी माझे लहानपण दुःखी गेले होते. आणखी एका जीवाला वेदनांचे वाटेकरी कशाला करायचे ? बालसंगोपन हे माझे जीवितकार्य नव्हते, अशी स्पष्ट माझी विचारधारा होती. शिवाय भारती माझ्याशी पूर्णतः रमत नव्हती हे मी पाहत होतो. तिचे मन पुनःपुन्हा तिच्या प्रियकराकडे ओढ घेत होते. अखेर तिने स्वतःचे म्हणणे खरे केले. अनिच्छेने मी बाप बनलो. डॉक्टरांनी सल्ला दिला, 'मातृत्वानंतर ती मानसिकरीत्या शांत होईल. तुम्ही तिला आई बनवा.'

पण नंतर ती शांत बनली नाही. संशयापायी संध्याकाळी घरात धिंगाणे घालायची. मला स्वास्थ्य लाभेना. तिकडे पुण्यात ताई सारखी आजारी. त्यातच दादांच्या लिव्हरवर डाग आलाय असे डॉक्टरांकडून ओझरते ऐकले. या मनस्तापांमध्ये मला एक विचित्र व्याधी जडली. शौचानंतर रक्त पडू लागले. आधीच माझी पचनक्रिया चांगली नव्हती. नाटकांच्या दौऱ्यांमुळे ती आणखी बिघडली होती. भारतीनेच पुण्याच्या एका वैद्यांना मला दाखविले. त्यांनी भस्मे दिली. माझे तिखट खाणे बंद केले. चार-पाच वर्षे त्यांचे उपचार घेतले. पुढे रक्त पडणे थांबले. पण तिखट अजूनपर्यंत खाऊ शकत नाही.

वर्षभरात अशांतता होती. नेमक्या त्याच वेळी सा. 'माणूस'मध्ये विएतनामवरील लेख प्रसिद्ध होऊ लागले. 'सोविएत देश' कचेरीतील कम्युनिस्टांनी कावकाव केली की, ते लेख म्हणे अमेरिकाधार्जिणे होते ! सुदैवाने तो मामला तेवढ्यावरच थांबला. पण निष्कारण मानसिक ताण वाढला.

मधल्या काळात एक छान गोष्ट घडली. अत्रे थिएटर्समध्ये 'पराचा कावळा' या नाटकात मला काम मिळाले. बाहेर दौऱ्यांचा प्रश्न नव्हता. मुंबईतच प्रयोग म्हणून ते काम स्वीकारले. शिरीष पै दिग्दर्शिका होत्या. त्यामुळे त्यांचा चांगला परिचय घडला.

आचार्य अत्र्यांसारख्या आदरणीय डोंगराएवढ्या लेखकाला जवळून पाहायला मिळाले. शिवाय हृदयनाथ मंगेशकर यांची ओळख झाली.

एकदा शिरीषताईंच्या 'सोन्याची खाण' नाटकात एक कलाकार आला नाही. त्यांनी मला त्या छोट्या भूमिकेत उभे केले. अवघे एक वाक्य असून ते मी

चुकलो. तरीसुद्धा त्यांनी शंभर किंवा पंचाहत्तर रुपये नाईट दिली.

त्याच सुमाराला मला नाटकात काम करण्याचा विलक्षण वीट आला होता. एक दिवस 'पराचा कावळा'चा प्रयोग चालू होता. पहिल्या अंकानंतर मला कोरड्या ओकाऱ्यांची जाणीव झाली. दुसऱ्या अंकात नक्कल बोलण्याचा कंटाळा आला. पुनःपुन्हा तेच ते संवाद बोलण्याचा कंटाळा येऊ लागला. नाट्यसृष्टीला कायमचा रामराम करण्याचा निश्चय मी केला. त्या माध्यमाची मजा गेली. कलेचा आनंद देणारे चित्रपटाचे माध्यम होते.

४ नोव्हेंबर १९६८ रोजी जुईचा जन्म झाला. प्रत्यक्ष पिता बनल्यानंतर पितृत्वाच्या अनोळखी भावनेने मी गुरफटलो. मूल जन्माला येणे म्हणजे किमान एकवीस वर्षांची जबाबदारी. मुलाबाबत माझी पूर्वीची निर्विकारता नाहीशी झाली. मी जास्त हळवा बनलो. भारतीशी प्रत्येक संघर्षानंतर मी जुईचा जास्त विचार करायचो. पुढचे पाऊल टाकायला कचरत होतो.

आणखी वर्ष दीडवर्ष मी त्या ओढाताणीत पार पाडले. भारतीशी विभक्त होण्याचा मी निर्णय घेतला. त्या वेळी ती डॉक्टरेटसाठी प्रबंध लिहीत होती. तिला युनिव्हर्सिटी ग्रॅन्टस् कमिशनची स्कॉलरशिप होती. गोडीगुलाबीने मी तिचे मन वळविले. जुईसह पुण्याला तिने आईकडे राहावे असे मी सुचविले. अखेर ती कबूल झाली.

दादर स्टेशनवर जेव्हा मी दोघींना पोचवायला गेलो तेव्हा भारतीशी इतःपर सहजीवन अशक्य होते हे मला ठामपणे कळून चुकले होते. विचारांची संदिग्धता फार काळ लांबविणे माझ्या स्वभावातच नाही. जे काही करतो चुकीचे वा बरोबर ठाम वागतो. अर्थात त्याचे परिणाम भोगावे लागतातच !

एवढ्या हौसेने सजवलेला पाली हिलचा फ्लॅट आता मला भकास वाटू लागला. खाण्यापिण्याचे हाल सुरू झाले. अजूनपर्यंत मला स्वयंपाक करता येत नाही. त्यामुळे रेस्तराँमध्ये बेसुमार खर्च झाला. जेवण बनवणारी स्वयंपाकीण ठेवण्याचा कधी विचार आलाच नाही. ह्या गोष्टीचे आज मला आश्चर्य वाटते. शेवटी मी फ्लॅट सोडण्याचा निश्चय केला. ऑफिसच्या आसपास पेइंग गेस्ट म्हणून जागा शोधू लागलो. जाण्या-येण्यात वेळ वाया घालविणे मला मंजूर नव्हते.

दोन-तीन महिन्यांत ताडदेवमध्ये सोनावाला बिल्डिंगच्या चौथ्या

मजल्यावर एका गुजराती कुटुंबात पेईंग गेस्ट म्हणून एक खोली महिना दोनशे रुपये भाड्याने मी घेतली. व्यवहारचतुर लोकांच्या दृष्टीने हा मी प्रचंड मूर्खपणा केला होता. अशा चुका घडताना आयुष्य पुढे सरकत जाते. एका जागी थांबत नाही.

ताडदेवची जागा तशी चांगली नव्हती. माझ्या कचेरीतील सहकारी कर्मचारी बाईंच्या ओळखीने वरळी सी फेसपाशी व्हीनस को. ऑप. सोसायटीतील एका सिंधी कुटुंबात एक खोली मिळाली. तेथे नाट्यसृष्टीतील नामवंत नट माझा मित्र श्रीकांत मोघे माझ्याबरोबर राहायला आला. दोन मित्रांचे धडाकेबाज आयुष्य चालू झाले. ऑफिस सुटल्यानंतर हाजी अलीपासून समुद्र किनाऱ्याने मी चालत चालत घरी यायचो. अशा दूरच्या चालण्यांमध्ये मला नव्या नव्या कल्पना सुचतात. माहिती शाखेच्या कामात मी एव्हाना मुरलो होतो. आता थेट मॉस्कोला भरारी घ्यावी असे मनाने घेतले. कचेरीत लोकवाङ्मय गृहाचा विक्रेता मॉस्कोच्या 'प्रोग्रेस पब्लिशर्स'ची इंग्रजी पुस्तके विकायला आणायचा. त्या पुस्तकांवरच्या दुसऱ्या पानावर मी अनुवादकाचे नाव वाचायचो. एक दिवस मनात आले की, 'प्रोग्रेस'च्या मराठी पुस्तकावर आपले नाव छापले जावे.

ताबडतोब अकुलोव यांच्यापाशी गेलो आणि कल्पना बोलून दाखविली. ते म्हणाले की, 'प्रोग्रेस'मध्ये मराठी विभाग अजून सुरू झाला नव्हता. मॉस्कोत त्यांच्याकडे मराठी अनुवादक नव्हता. मी त्यांना विनंती केली की, त्यांनी 'प्रोग्रेस'कडे माझी शिफारस करावी. तोपर्यंत भरपूर काम करून मी त्यांची मर्जी संपादन केली होती. शिवाय लवकरच त्यांची भारतात मुदत संपणार होती. 'प्रोग्रेस'मध्ये माझी शिफारस करण्याचे त्यांनी वचन दिले. अर्थात ह्या गोष्टीला काही काळ लागणार होता.

कॅडेल रोडवर राहणाऱ्या गजानन जागीरदार यांच्या घरापाशी आता मी जवळ राहत होतो. फोनवरून मी त्यांच्याशी संपर्क साधला होता. संध्याकाळच्या वेळांना मी त्यांना भेटायचो. जुईच्या ओढीने पुण्याला मधून मधून चकरा मारायचो. शिंद्यांना भेटायचो. त्यांच्या घराजवळच श्रीकांतने आई-वडिलांसाठी जागा भाड्याने घेतली होती. तेथे त्याचा धाकटा भाऊ सुधीर आला होता. सुधीर साहित्य-सिनेमा क्षेत्रात काम करण्याच्या उमेदीने पुण्यात आला होता. त्याच्या

जोडीने त्याचा मित्रपरिवार आमच्या परिचयाचा बनला. ते सारे शिंद्यांना कोल्हापुरी पद्धतीने 'सरकार' म्हणून हाका मारायचे. पुढे मी रशियाला गेल्यानंतर सुधीर आणि शिंदे यांचा स्नेह खूपच दृढ बनला. सुधीरच्या 'निरंकुशाची रोजनिशी' पुस्तकात शिंद्यांबद्दल एक हृद्य लेख आहे.

जागीरदारांकडच्या भेटीगाठी फलदायी ठरल्या. ते फिल्म इन्स्टिट्यूटच्या प्राचार्यपदातून मोकळे झाले तेव्हा मी त्यांच्या पाठीशी आत्मचरित्र लिहिण्याचा लकडा लावला होता. 'रुपेरी पडदा आणि रुपेरी केस' असे नाव सुचविले. आता त्यांनी लेखनाला आरंभ केला. 'सुबह होती है शाम होती है' या शीर्षकाने त्यांनी हिंदीतून लेखन केले. पुढे नाटककार वसु भगत याने 'संध्याकाळ' या नावाने मराठी रूपांतर केले. पण त्या आत्मचरित्रात जागीरदार पूर्ण मोकळे नाहीत. बिचकत, घाबरत त्यांनी हे लेखन केले. नंतर त्यांनी 'पाऊलखुणा' लिहिले. तेसुद्धा जमले नाही.

जागीरदारांनी मराठी चित्रपट निर्माण करण्याचे ठरविले. फिल्म फिनान्स कॉर्पोरेशनकडून कर्ज मंजूर होण्यासाठी आधी पटकथा-संवादाची चोपडी तयार करायला पाहिजे होती. वसु केवळ लेखनावर जगत होता. त्याला ताबडतोब पैसे हवे होते. जागीरदारांच्या मनात होते की, ग. रा. कामतांकडून लेखन घ्यावे. पण कामत हिंदी चित्रपटांच्या कामात फार गुंतले होते. अशा रीतीने लेखनाचे काम माझ्यापाशी आले.

पटकथा-संवाद-लेखनाची माझी ही पहिलीच वेळ होती. मला पैशांची आत्ता गरज नव्हती. कारण 'सोविएत देश'मध्ये पगार मिळत होता. माझे पूर्वीचे आडाखे अचूक ठरले. 'घेतलं शिंगावर' या नाटकावर चित्रपट बेतायचा होता. मूळ कथानक एकाच सेटवर चित्रित करायचे. त्याला पूरक प्रसंग बाह्यचित्रणाचे. अशी आम्ही विभागणी केली.

देहू रोडला जागीरदारांच्या मेहुण्यांच्या घरात आम्ही लेखनाला आरंभ केला. लिहिता लिहिता मला नाव सुचले— 'दोन्ही घरचा पाहुणा.'

*

# दोन्ही घरचा पाहुणा

दोन्ही घरचा पाहुणा

आयुष्यात काही गोष्टी अचानक आणि पटकन यशस्वी होतात. 'दोन्ही घरचा पाहुणा' बाबत असेच घडले.

शनिवार-रविवार ह्या सुटीच्या दिवशी जागीरदार मला मोटारीत घालून खंडाळ्याला, लोणावळ्याला घेऊन जात. त्यांचा थाट खास हिंदी चित्रसृष्टीचा होता. ड्रायव्हर सांगाती असायचा. रमची अर्धी बाटली, काचेचे दोन पेले, पाण्याचा फ्लास्क असा सरंजाम असायचा. वाटेत हुक्की आली तर रस्त्याच्या कडेला मोटार थांबवायची व मद्यपान सुरू. त्यांच्याबरोबर मद्यपानाची बैठक छान व्हायची. जुन्या आठवणी सांगायचे.

तसे त्यांचे वागणे शिस्तबद्ध होते. काम भरपूर करायचे. सकाळी ब्रेकफास्टनंतर मी लेखनाला बसायचो. नवनवे प्रसंग सुचवायचो. त्यांचे संवाद भराभरा लिहायचो. पात्रे आपोआप माझ्या कानात बोलायची. माझ्या ठायीची ही दैवी देणगी जागीरदारांमुळे मला समजली. ते संवाद मी त्यांना वाचून दाखवायचो. ते मनपसंतीची मान डोलावत. दोन महिन्यांच्या अवधीत आम्ही लेखनाचे काम संपविले.

कामाच्या दिवशी ऑफिसनंतर मी जागीरदारांच्या घरी जायचो. संध्याकाळी पटकथेची चर्चा व्हायची. कधी जागीरदारांचे मित्र सिनेनट के. एन. सिंगसाहेब येताना स्वतःसाठी स्वतःची छोटी बाटली घेऊन यायचे. एक दिवस या गोष्टीबद्दल मी जागीरदारांना विचारले. त्या दोन मित्रांचा प्रघात तसाच होता. जागीरदारसुद्धा स्वतःची बाटली सिंगसाहेबांकडे घेऊन जायचे. कुणी कुणावर

बोजा ठरू नये असा सुज्ञ विचार त्यांनी केला. कारण रोज संध्याकाळी दारू प्यायची दोघांना सवय होती.

हळूहळू जागीरदारांच्या घरात मी रुळू लागलो. वहिनी कधी कधी जेवायला बसवायच्या. त्यांचा मुलगा अशोक माझा मित्र बनला. जागीरदारांना मी 'पपा' म्हणून केव्हा संबोधू लागलो हे आठवत नाही.

सहा महिन्यांचा काळ लोटला. फिल्म फिनान्स कॉर्पोरेशनने कर्ज मंजूर केले अशी एक दिवस बातमी आली. त्यानंतर पपा अचानक मला म्हणाले, "अरे, नायकाची भूमिका तूच कर ! विनोदी कामं करणं तुझा पिंड आहे !" माझी अवस्था तेव्हा 'आंधळा मागतो एक डोळा...' अशी होती.

पैसे एकरकमी मिळणार असल्यामुळे शूटिंग सलग महिनाभर करण्याचे ठरले. माझ्या दृष्टीने ही गोष्ट सोपी होती. मी तात्काळ एक महिन्याची वार्षिक रजा घेतली. हळूहळू पात्रयोजना पक्की होऊ लागली.

एका भूमिकेसाठी श्रीकांत मोघे पक्का ठरला. त्याची बायको आशा पोतदार नक्की केली. नायिकेची भूमिका 'प्रीती परी तुजवरती' फेम पुष्पा भोसले ऊर्फ दर्शना हिला देण्यात आली. नायिकेच्या बापाची भूमिका खुद्द पपांनी करायची होती. पण त्यांच्या प्रकृतीला ते काम सोसले नसते. तेव्हा विद्याधर गाडगीळची मला आठवण झाली. शाळेतील नाटकात आम्ही एकत्र कामे केली होती. अकाली टक्कल पडल्यामुळे तो वयस्क भासायचा. ठणठणीत ओरडून त्याने ती भूमिका पार पाडली. साहाय्यक दिग्दर्शक व संकलक अशीही कामे त्याला मिळाली. व. पु. काळे, रंगनाथ कुलकर्णी आणि अशोक सराफ यांनी 'दोन्ही घरचा पाहुणा' मार्फत रजतपटावर प्रथम पदार्पण केले. शिवाय पारशी रंगभूमीवरील कलावंत दिनशा दाजी यांचेही चित्रसृष्टीत हे पहिले पाऊल होते. चित्रपटात एकही गाणे न ठेवण्याचा प्रयोग आम्ही केला.

शूटिंगचे दिवस साक्षात मंतरलेले दिवस होते. अगदी पहिल्या दिवशी चांदीवलीच्या आऊटडोअर स्टुडिओत चित्रीकरणाला सुरुवात झाली. पहाटे पाचपासून माझी झोप उडाली. सारखा संडासला धावत होतो. अखेर पहिला शॉट ओ.के. झाला. आत्तापर्यंत अनुभव असा आहे की, चित्रीकरणात माझे रीटेक क्वचित घडायचे. माझ्यासाठी कच्ची फिल्म कधी वाया जायची नाही. संवाद माझेच होते म्हणून चपखलपणे तोंडात बसले. धडाधड शॉट देत होतो. पपा खूष

व्हायचे.

आऊटडोअरचे वीस दिवस पूर्ण केल्यानंतर आम्ही मेहबूब स्टुडिओत चित्रीकरण करू लागलो. पाहुणा कलाकार म्हणून शशी कपूरला बोलवावे असे पटकथा लिहिताना आम्ही ठरविले होते. हिंदीतील मोठे नट-नटी आपल्या परिचयाचे आहेत, अशी थाप नायक मारतो. ही कल्पना मूळ माझी होती. प्रत्यक्ष चित्रीकरणात संजीवकुमारचा समावेश केला. पपांच्या ओळखीने संजीवकुमारला बोलावणे शक्य झाले. त्याने पैसे अजिबात घेतले नाहीत. 'मराठी जेवण द्या' एवढेच तो म्हणाला.

संजीवकुमारच्या सहज अभिनयापुढे उभे राहताना माझी फे फे उडाली. त्याने संवादाचे कागद हाती घेतले. अजून तेथे शशी कपूरचे नाव होते. मी वरमलो. तो नुसता हसला. प्रत्यक्ष चित्रणावेळी तो खूप रमला. त्याने पदरची वाक्ये घातली. प्रसंग खूप खुलवला.

हॉलीवुडचा दिग्दर्शक आल्फ्रेड हिचकॉक त्याच्या प्रत्येक चित्रपटात कुठे ना कुठेतरी दिसतो. त्याचप्रमाणे 'दोन्ही घरचा' मध्ये पपांना दाखवावे अशी कल्पना मी सुचविली. जुहू हॉटेलात कॉफी पिताना नायक नायिकेला थापा मारत असतो असा प्रसंग मी तयार केला. संजीवकुमार बालपणीचा मित्र आहे अशी तो थाप मारतो त्याच क्षणी जागीरदार समोर येतात. नायक त्यांना 'हलो' असे सलगीने अभिवादन करतो. कुणीतरी चाहता असावा असे वाटून जागीरदार थंडपणे प्रतिसाद देतात असा भाग आम्ही चित्रित केला. काही विघ्नांसहित एकूण चित्रीकरण पार पडले. चित्रपटनिर्मिती पूर्णपणे सुरळित कधीच पार पडत नाही. प्रकाशयोजनेत आख्खा दिवस खर्चून चित्रित केलेला एक फार मोठा अवघड शॉट, लॅबमध्ये प्रोसेस करताना ऐन वेळी वीज गेली म्हणून वाया गेला. पुन्हा एक दिवस चित्रीकरण करावे लागले. मध्येच पपा अतिश्रमांपायी आजारी पडले. नेमक्या शूटिंगच्या वेळी दर्शनाच्या चेहऱ्यावर यौवनपीटिका भरपूर उमटल्या. तिच्या चेहऱ्याची समीपदृश्ये शक्यतो टाळली.

आता वितरणाची व्यवस्था करायला हवी होती. निर्माते-दिग्दर्शक कमलाकर तोरणे यांनी 'पाहुणा' वितरणासाठी घेतला.

थिएटरमध्ये प्रदर्शनासाठी सुमारे दीड वर्षाचा काळ गेला. दरम्यान प्रसिद्धीची योजना मी करायचो. पोस्टरवर नाव लिहिताना दोन किल्ल्या दाखवा

अशी मी सूचना केली. 'माणूस'च्या दिवाळी अंकात शूटिंगची दिवसवार साद्यंत हकीगत छापून दिली. कलानिर्मितीचे धुंद दिवस होते.

अखेर स्वप्न साकार झाले. मुंबईतील मेट्रो सिनेमा थिएटरमध्ये 'पाहुणा' प्रदर्शित झाला. त्यापूर्वी मराठी चित्रपट तेथे क्वचित प्रदर्शित व्हायचे. तोरण्यांनी धाडस केले. ज्या मेट्रो सिनेमावर ग्रेगरी पेक, कॅरी ग्रँट यांचे चेहरे झळकायचे तेथे माझा चेहरा झळकला. माझी पंजाबी मैत्रीण मिनू हिला थिएटरवरचे पोस्टर दाखवायला म्हणून गेलो. तिला माझे फार कौतुक होते.

अनिल कृष्ण हे नाव पपांनी मला दिले. उद्घाटनाचा दिवस धाकधुकीत गेला. रात्रीच्या खेळाला यश निश्चित झाले. एका रात्रीत मी यशस्वी नट बनलो. लोकांना माझे काम आवडले. पण मुंबईच्या पत्रकारांनी परीक्षणे लिहिताना विशेष कौतुक केले नाही. प्रीमियरचा खेळ संपल्यावर जागीरदार, श्रीकांत आणि मी गाडीवरची पावभाजी खायला गेलो. मग पपांकडे मद्यपान घडले. तेव्हापासून आमचे त्रिकुट बनले. चित्रपट संपल्यानंतर मिनूने अभिनंदन केले. मराठी विशेष येत नसतानाही ती पूर्ण चित्रपटभर बसली.

मला पूर्ण सुख देणारी, आनंद देणारी मिनू ही एकमेव भारतीय स्त्री ठरली. एकदा माझ्या खोलीवर तिला बोलावले तेव्हा ती मोकळेपणाने म्हणाली, "हे बघ, मी तुझ्याबरोबर झोपेन. काही काळपर्यंत आपले संबंध राहतील. पण एक दिवस मी ते थांबवीन. नंतर तू तक्रार करू नकोस. भांडू नकोस. कारण विचारू नकोस." मिनू दोन वेळा घटस्फोटिता होती. दोन मुलांची माता होती. माझ्यापेक्षा दोन वर्षांनी मोठी होती. उंच्यापुऱ्या, भरदार बांध्याच्या मिनूने मला अमाप रतिसुख दिले. गरम रक्ताची स्त्री काय चीज असते हे मला समजले. तीन-चार महिन्यांनंतर आमचे संबंध बिनतक्रार थांबले. लौकरच ती कायमचे वास्तव्य करण्यासाठी परदेशी निघून गेली.

'पाहुणा' मेट्रोमध्ये दोन आठवडे 'हाऊसफुल्ल' चालला. नंतर पुण्यावर स्वारी. पुण्यात 'नटराज' थिएटर ठरले. पुण्यातील पहिल्या खेळापूर्वी एक दिवस आधी पुण्यात आलो. मुंबईच्या आनंदावर घरातील उदास वातावरणाने पाणी ओतले. ताई खूप आजारी होती. दादांचे चित्त थाऱ्यावर नव्हते. मी व पपा स्वस्ति हॉटेलवर उतरलो होतो. श्रीकांत त्याच्या घरी उतरला. आदल्या रात्री सर्व पुणेभर मी एकटा फिरत राहिलो. ठिकठिकाणची आमच्या चित्रपटाची पोस्टर्स

न्याहाळली.

उद्घाटनाच्या दिवशी मनात धाकधूक होती. पुण्याचा प्रेक्षक मुंबईच्या प्रेक्षकापेक्षा चोखंदळ. दुपारचा पहिला खेळ हिंगणे स्त्री-शिक्षण संस्थेच्या मदतीसाठी आम्ही दिला. पण खेळ 'हाऊसफुल्ल' नव्हता. संध्याकाळी भाग्य उजळले. तिथपासून चित्रपटाने एकदम उठाव घेतला. अपेक्षित जागी प्रेक्षक दाद देत होते. थिएटर हंशाने सारखे उसळत होते.

प्रीमियरला ताई येऊ शकली नाही. दादा असेच आले होते सैरभैर मनाने. भारती छोट्या जुईला घेऊन आली होती.

रात्री १२ वाजता हॉटेलवर गेलो. तेथे आशा पोतदार माझ्याकडे सचिंत मुद्रेने बघत होती. भारती तिच्याबरोबर चेहरा फुगवून बसली होती. संध्याकाळी हॉटेलवर माझ्या नावे मुंबईहून आशाचा शुभेच्छादर्शक फोन आला होता. झाले ! आमच्या बायकोचा मत्सर पेटला. आता मात्र मी चिडलो. भांडण जोरात पेटले. आत्मकेंद्री, कुचकट भारतीने आम्हा सर्वांच्या आनंदावर विरजण पाडले. त्या तमाशानंतर झोपेचे खोबरे झाले. इतक्या वर्षांच्या धडपडीनंतर यशाचा आनंद मिळत नव्हता. इन-मीन नातेवाईक कळत-नकळत त्या आनंदाला नासवत होते. हा माझ्या प्राक्तनाचा भाग असावा. मला मित्र नेहमी आनंद देतात, मदत करतात.

पुण्यात 'पाहुणा' नटराजमध्ये तब्बल आठ आठवडे तुडुंब चालला. अधून-मधून मी पुण्यात येत होतो. रस्त्यावर मला पाहून माणसे थांबायची. रेस्तराँमध्ये बसलो असताना सहीसाठी तरुणी धावत यायच्या. थोडक्यात 'स्टारपदा'चा आनंद मी उपभोगत होतो.

पुणे विद्यापीठाच्या परिसरात राहणाऱ्या एका रशियन शिक्षिकेचा परिचय 'सोविएत देश' मध्ये लिहिण्यासाठी मी तिची भेट घेतली. पहिल्या भेटीत ती माझ्या मनात भरली. एल्झा घटस्फोटिता होती. तिला मुले नव्हती. माझ्यापेक्षा ती दोन वर्षांनी मोठी होती. भारत-सोविएत सांस्कृतिक देव-घेवीच्या कार्यक्रमानुसार दोन-तीन वर्षांसाठी भारतात आली होती. त्यापूर्वी तिने कंबोडियात तीन वर्षे रशियन भाषा शिकवण्याचे काम केले होते. मूळ मॉस्कोच्या लुमुंबा विद्यापीठात ती अध्यापिका होती.

जुईला भेटण्यासाठी मी एक दिवस पुण्याला आलो. तेवढ्यात समजले की,

भारती जुईला अलिबागला घेऊन गेली होती. भारतीची पुणे-अलिबाग अशी नाचानाच चालू होती. पुण्यातील डेक्कन कॉलेजात आणि अलिबागमधील कॉलेजात तिला अध्यापनाच्या उत्तम नोकऱ्या मिळाल्या होत्या. पण दोन्ही ठिकाणी प्रमुख अधिकाऱ्यांशी मतभेद झाल्यामुळे पुढे तिच्या त्या नोकऱ्या टिकल्या नाहीत. जुई नसल्यामुळे माझा हिरमोड झाला. वेळ घालविण्याच्या उद्देशाने एल्झाच्या अपार्टमेंटकडे गेलो. गप्पा मारल्यानंतर तिला 'पाहुण्या'च्या संध्याकाळच्या खेळाला बोलावले. आधी इंग्रजीतून सारांशाने कथा सांगितली. ती आली. चित्रपटगृहात प्रेक्षकांचे हंशे उसळत होते. खेळ संपल्यानंतर गर्दीतून वाट काढत तिच्यासह रिक्षातून 'जवाहर' हॉटेलकडे गेलो. तिथल्या बारमध्ये बसलो. तास-दोन तास मद्यपान केले. सारे वेटर एव्हाना मला ओळखत होते. त्यामुळे खास सर्व्हिस सुरू होती. तेथेच भोजन मागविले.

एव्हाना एल्झा लाडात आली होती. ओठांना मुरड घालून मांजरीसारखी माझ्या खांद्यावर गाल घासत होती. पुढची हालचाल मी त्वरेने केली. वेटरला खुणावून जवळ बोलाविले. वरती रिकाम्या खोलीची पृच्छा केली. वेटर तात्काळ होकार घेऊन आला. सुमारे तासाभरानंतर जवाहर हॉटेलच्या अत्युच्च मजल्यावरच्या उत्तम खोलीत रशियन आणि मराठी चीत्कार व हुंकार घुमू लागले.

पहाटे लौकर उठून एल्झासह रिक्षातून पुणे स्टेशनकडे गेलो. तेथूनच तिचा निरोप घेतला व मुंबईकडे निघालो. तेव्हापासून एक छान शारीरिक-मानसिक सुखाची मैत्री सुरू झाली. वीक-एन्डला पुण्यात यायचे, एल्झाचा सुरेख पाहुणचार अनुभवायचा. तिच्याकडेच दोन दिवस राहायचे. रशियन स्त्री ही उत्तम गृहिणी असते या वस्तुस्थितीची प्रचीती मला आली.

सुखाचे दिवस लवकर सरतात. १९७१चे बांगला देश युद्ध सुरू झाले. पुण्यातील प्रकाशबंदीमुळे 'पाहुण्या'चे खेळ थांबले. नाईलाजाने चित्रपट काढून घ्यावा लागला. लेखक आणि नट म्हणून माझा जरासा जम बसू लागला होता. पण तेवढ्यात नशीब आडवे आले.

तरीसुद्धा पपा जागीरदार आणि मी स्वस्थ बसलो नव्हतो. नव्या चित्रपटाच्या पटकथा-संवादाचे काम चालू झाले होते. एका इंग्रजी कादंबरीवर कथानक रचले. कार्ल्याच्या हॉलीडे कँपमध्ये आम्ही मुक्काम टाकला.

न्याहरीनंतर दुपारी एकपर्यंत लेखन. मग दोन पेग जिन आणि लाईम ज्यूस कॉर्डियल यांचे प्राशन. जेवणानंतर दोन तास वामकुक्षी. मग पुन्हा साडेतीन ते सहा लेखन. सूर्यास्तावेळी तासभर पायी फिरायचे. संध्याकाळी सात वाजता ग्लासात बर्फासह रम चमकायची. त्या वेळी दिवसभराच्या लेखनावर चर्चा. रात्री नवाला जेवण आणि साडेदहा वाजता बिछाना गाठायचा. शिस्तशीर कार्यक्रम.

अशा रीतीने दोन महिन्यांच्या अवधीत 'आधी होता वाघ्या'ची चोपडी तयार झाली. नोकरी चालू ठेवूनही फक्त फावल्या वेळात मी हे करत होतो. शनिवार-रविवार हे सुटीचे दिवस असायचे. कधी एखादी कॅज्युअल लीव्ह घ्यायची. कधी खोटी सिक लीव्ह: कारण कचेरीतील जुनी कम्युनिस्ट खोडे महिनेन् महिने सर्रास खोट्या सिक लीव्ह घ्यायची हे माझ्या ध्यानात आले होते. तेव्हा मी वेळ 'सत्कारणी' लावत होतो.

एकदा पपांच्या सूचनेनुसार त्यांना सांगाती घेऊन डेक्कन कॉलेजातील भारतीच्या बंगल्यावर लेखनासाठी गेलो. रात्री नेहमीप्रमाणे भारतीने आक्रस्ताळी नाटक केले. बिचारे पपा हवालदिल झाले. तेव्हापासून भारतीशी कायदेशीर घटस्फोट घ्यायचा असा प्रस्ताव मी तिच्यासमोर मांडला. दुखऱ्या जागेवर शस्त्रक्रिया उत्तम उपाय ठरते. काही वेळा भारतीला चांगले वागायचे झटके यायचे. तिने पटकन संमती दिली. एवढेच नव्हे, आम्हा दोघांसाठी एकच वकील शोधला. तिचीच एक घटस्फोटिता मैत्रीण आमची सामायिक वकील बनली. त्यामुळे फी निम्मी पडली. घटस्फोटाचा अर्ज पुण्याच्या कोर्टात दाखल केला. कारण होते— एकमेकांचे स्वभाव पटत नव्हते. कोणतीही चिखलफेक नव्हती. भारतीशी शरीरसंबंध मी केव्हाच सोडला होता. विसंवादी वैवाहिक जीवनात तीन पायांच्या शर्यतीसारखी फरफट होते.

*

## वेधकाळ

'दोन्ही घरचा पाहुणा' महाराष्ट्र सरकारचा पारितोषिक विजेता ठरला. पपांना उत्कृष्ट निर्माता व दिग्दर्शक अशी दोन पारितोषिके मिळाली. पण बांगला देश युद्धाच्या दरम्यान त्याचे पुण्यातील प्रदर्शन खंडित झाले. युद्ध संपल्यानंतर पुण्यात पुन्हा ताबडतोब चित्रपट लावला नाही. महाराष्ट्रातील इतर गावी पुण्या-मुंबईसारखा त्याला प्रतिसाद मिळाला नाही. राहत्या घरांच्या जागेची टंचाई ही कथानकातील समस्या मुंबई-पुण्याची जिव्हाळ्याची समस्या होती. वितरकांचे पैसे एव्हाना वसूल झाले होते. त्यामुळे त्यांचे स्वारस्य कमी झाले होते. पपांचे पैसे मात्र पूर्ण वसूल झाले नव्हते.

'इम्पेक'मार्फत चित्रपट रशियाला विकण्याचा प्रयत्न केला. पण त्याआधीच रशियाने 'मुंबईचा जावई' खरेदी केला होता. मग म्हणे पेरू देशाने स्वारस्य दाखविले. पण तोही व्यवहार जमला नसावा.

मराठी चित्रपटसृष्टीत मा. विनायक व अत्रे यांनी विनोदी चित्रपटांच्या एका दर्जेदार परंपरेचा पायंडा घातला. नंतर माडगूळकर, परांजपे, फडके या त्रयीने 'लाखाची गोष्ट', 'पेडगावचे शहाणे' हे उत्तम चित्रपट सादर केले. 'दोन्ही घरचा पाहुणा' हा बऱ्याच काळानंतर वेगळ्या जातीचा मराठी विनोदी चित्रपट पडद्यावर आला. सुजाण, सुसंस्कृत मराठी प्रेक्षकाला तो पसंत पडला.

पण नंतर एकाही मराठी निर्मात्याने वा दिग्दर्शकाने चित्रपटात अभिनय करण्यासाठी मला बोलाविले नाही. एकदा दादा कोंडके व वसंत सबनीस 'आधी होता वाघ्या'चे पटकथा-संवाद ऐकायला आले. पण मामला जमला नाही.

मुंबई दूरदर्शनने 'पाहुणा' दाखवला. पण तरीही अजून मला नवा चित्रपट मिळाला नव्हता. पपांना पैशाअभावी नवी निर्मिती शक्य नव्हती. तोवर मी नोकरीच्या उद्योगात. मॉस्कोतील 'प्रगती प्रकाशना'च्या निमंत्रणाची वाट पाहत होतो. पुण्याला एल्झाकडे चकरा मारत होतो.

एकदा तिला महाबळेश्वरला दोन दिवसांसाठी नेले. ती खूप खुलली. नंतर मॉस्कोला सुटीवर गेली.

ती परत आल्यानंतर मात्र काहीतरी गडबड झाली. बहुधा दुसऱ्या रशियन शिक्षिकेने वरिष्ठांकडे तिच्याबद्दल कागाळी केली. एल्झा माझ्याशी मोकळी वागेना. एकदम तिची जयपूरला बदली झाली. विशेष न बोलता कुढ्या मनाने ती निघून गेली. हे रहस्य कधीच उलगडले नाही. फक्त सत्य एवढेच की, त्यानंतर आमची भेट कधी घडली नाही. काही काळ मी बेचैन बनलो. रितेपणा खायला यायचा. संध्याकाळी वरळी सी फेसवर खूप फिरायचो. मग एक दिवस सुचले की, नुकत्याच साप्ताहिक बनलेल्या 'मनोहर' मध्ये नियमितपणे एक प्रकट चिंतनपर सदर लिहावे. त्या सदराचे नाव 'ये बंबई है मेरी जान !' ताबडतोब दत्ता सराफांना कल्पना कळविली. त्यांचा होकार आला.

दोन-तीन महिन्यांत 'बंबई' सदर चांगले आकाराला आले. त्याच्या खाली मी ओ'नील हे नाव घेत होतो. मग उत्साहाने नाट्य समीक्षणाचे 'तिसरी घंटा' सदर सुरू झाले. पाच-सहा महिन्यांत एक नवा प्रदीर्घ लेखाचा विषय सुचला. कॅबरे नर्तिकांविषयी. त्याचे शीर्षक होते : 'कुलाब्याच्या दांडीपासून ते जुहूच्या किनाऱ्यापर्यंत.' सराफांना विषय फार आवडला. छायाचित्रकार राजदत्त यांना त्यांनी माझ्या साथीला दिले. वेगवेगळ्या रेस्तराँमधून, नाईट क्लबांमधून नाचणाऱ्या नर्तिकांचे कार्यक्रम मी आणि राजदत्तांनी पाहिले. नंतर त्या नर्तिकांना प्रत्यक्ष भेटून मुलाखती घेतल्या. अशा रीतीने आठ-दहा पानांचा सचित्र लेख तयार झाला. सराफांनी त्याची जाहिरात आधीपासूनच दणकून सुरू केली होती. परिणामी लेखाचा अंक नेहमीपेक्षा दहा पटींनी जास्त खपला !

माझ्या सृजनाला उधाण आले. झपाटल्याप्रमाणे मी काम करत होतो. 'मनोहर'साठी खास लेख तयार करत होतो. मुलाखती घेत होतो. कचेरीतील सहकारी कौतुकाने लेख वाचत होते. रंगनाथ केव्हाच नोकरी सोडून गेले होते. मी नोकरीत अडकल्यानंतर त्यांना 'जिप्सी' भावनेची बाधा वर्षभरात झाली.

धाडकन चांगल्या पगाराची नोकरी सोडून गेले आणि 'गाढवाची कहाणी'चे एकपात्री प्रयोग करू लागले.

१९७३ च्या फेब्रुवारीत कचेरीतील नवे व्हाईसकॉन्सल त्रापेझनिकोव माझ्यापाशी कुजबुजले : 'लौकरच मॉस्कोहून प्रगती प्रकाशनचं तुला निमंत्रण येतंय. कुणालाही बोलू नकोस.'

त्यापूर्वी औरंगाबादेत 'इस्कस' कॉन्फरन्स भरली होती. त्रापेझनिकोवांबरोबर कॉन्फरन्स कव्हर करायला मी गेलो होतो. त्या वेळी माझ्या लेखनावर ते खूप खूष झाले होते. इतरांशी फटकून वागणारा हा माणूस माझ्याशी खूप प्रेमळ वागायचा. 'कम्सामोलस्काया प्रावदा' चा वार्ताहर जेव्हा मुंबईत आला, तेव्हा त्रापेझनिकोवनी स्वतःच्या अपार्टमेंटमध्ये त्याच्याशी माझी मुलाखत घडविली.

मॉस्कोत जाण्यापूर्वीच एक उमदा नट, पत्रकार, लेखक म्हणून 'कम्सामोलस्काया प्रावदा'मध्ये माझी प्रचंड मुलाखत फोटोंसह छापून आली. पण जाण्याची बातमी गुप्त ठेवण्यात आली होती. कारण कम्युनिस्ट जुनी खोडे अडचण आणण्याचा संभव होता. वस्तुतः 'प्रगती प्रकाशन'मध्ये इतर भारतीय भाषांचे विभाग केव्हाच सुरू झाले होते. फक्त मराठी लोकांनी एकमताने मराठी अनुवादकाची निवड केली नव्हती. तसे काही अनुवाद भारतातून पाठवत. पण नियमितपणे अनुवाद करणारा माणूस मॉस्कोत नव्हता. अखेर राजकारणापासून खूप दूर असणाऱ्या माझ्यासारख्या बिगर कम्युनिस्ट कलावंताची, पत्रकाराची पहिला मराठी अनुवादक म्हणून प्रगती प्रकाशनाने निवड केली होती. माझा हवाला दिला होता 'सोविएत देश' कचेरीने. म्हणजेच नोवोस्ती प्रेस एजन्सीने. तिला रशियनमध्ये APN असे नाव आहे.'अगेन्त्स्वा पिचाती नोवोस्ती.'

रशियासारखा बंद देश पाहायला मिळणार, शिवाय पहिला मराठी अनुवादक म्हणून मी इतिहासात दाखल होणार, या विचारांनी मोहरलो होतो.

तेवढ्यात आनंददायी घटना घडली. ३ एप्रिलला मला घटस्फोट मिळाला. मी विवाहबंधनातून कायदेशीर मुक्त झालो. या वेळी भारतीला चांगुलपणाचा झटका आला. कोर्टात न्यायाधीशांनी पोटगीबाबत प्रश्न विचारला तेव्हा तिने माझ्यापाशी पोटगी मागितली नाही. "बाप स्वतःच मुलीसाठी थोडेफार पैसे देईल अशी मला खात्री आहे." असे ती म्हणाली. तिचे म्हणणे खरे होते.

जुईसाठी आवश्यक तो खर्च मी करीन असा विश्वास तोपावेतो मी निर्माण केला होता. तेव्हापासून १९८९ च्या मे महिन्यापर्यंत, जुई बी.ए. होईपर्यंत मी नियमितपणे पैसे पाठवत होतो. अर्थात कोर्टाने जुईचा ताबा तिच्या आईपाशी ठेवला.

अस्वस्थ मनाने मुंबईला मी परतलो. वैवाहिक जीवनाचा पहिला प्रयोग फसला होता. दुसऱ्या कुणा स्त्रीखातर किंवा दुसरे लग्न करण्याच्या तीव्र इच्छेपायी मी हा घटस्फोट घेतला नव्हता. भारतीने शांततामय सहजीवन अशक्य करून टाकले होते म्हणूनच ही कृती करावी लागली.

त्यानंतर माझ्या कला जीवनाला एक नवे क्षेत्र लाभले. मुंबई दूरदर्शनवर 'प्रतिभा आणि प्रतिमा' नावाचा कार्यक्रम होऊ लागला. श्रीकांत मोघेने अभिनेत्री सुलोचनाबाई यांची मुलाखत त्या कार्यक्रमासाठी घेतली. मी एकूण कार्यक्रमाचा अंदाज घेतला. मुलाखत घेणाऱ्याने कमी बोलले पाहिजे. नेमके प्रश्न विचारावेत. ज्या व्यक्तीची मुलाखत घेतली जाते तिला भरपूर बोलू द्यावे. श्रीकांतच्या कार्यक्रमाच्या शूटिंगच्या निमित्ताने मी दूरदर्शनच्या स्टुडिओत गेलो होतो. त्या भेटीमधून दोन फलनिष्पत्ती घडल्या. गजानन जागीरदारांची व मामा पेंडसे यांची 'प्रतिभा आणि प्रतिमा'साठी मुलाखती घेण्याची कामगिरी दूरदर्शनने माझ्यावर सोपवली. श्रीकांतमुळे सुलोचनाबाईंची ओळख झाली. तो त्यांना दिदी म्हणायचा. लवकरच अधिक परिचयानंतर मीही दिदी म्हणू लागलो.

मामा पेंडसे यांची मुलाखत फार यशस्वी ठरली. ती दोनदा दाखवली गेली. मला हे नवे माध्यम आवडले. शिवाय दूरदर्शनच्या याकूब सईदने एका नाटिकेत मला नायकाची भूमिका दिली. हा मामला फार अवघड होता. त्या वेळी रीटेकची सोय नव्हती. त्यामुळे मनावर ताण फार पडायचा. नाटिका यथातथाच झाली.

मध्यंतरीचे दोन-तीन महिने धामधुमीचे गेले. दिदीशी व तिच्या कुटुंबियांशी आणि परिचितांशी माझी ओळख झपाट्याने वाढत गेली. रायगड येथे आम्ही सहल आयोजित केली. श्रीकांत, सुधीर, चारुदत्त सरपोतदार, शरद भिडे होते. दिदीची मुलगी कांचन होती. शब्द तोंडात घोळवून त्यांचा मधुर उच्चार करणाऱ्या, लांबसडक केसांच्या, उंच्यापुऱ्या कांचनशी मैत्री जमली. मी आणि श्रीकांत तिची भरपूर थट्टा करत होतो. कांचनशी परिचय कसा वाढत

गेला याची साद्यंत हकीगत तिने तिच्या 'नाथ हा माझा' पुस्तकात लिहिली आहे. मनमोकळ्या स्नेहाबद्दल आयुष्यात लाभलेले हे भरघोस समाधान. एक सुसंस्कृत, सुविद्य स्त्री स्नेही बनली. स्त्रियांबाबत जरी मी उनाड वागायचो तरी माझी स्वतःची एक शिस्त आहे. एक लक्ष्मणरेषा आहे. ती पाळतो म्हणून मी अजूनपर्यंत ताठ मानेने वावरतो.

प्रकृती आणखी बिघडल्यामुळे ताई मुंबईतील तिच्या धाकट्या भावाकडे राहायला आली होती. माझ्या धाकट्या मामाकडे आईसुद्धा होती. मामाने व त्याच्या बायकोने ताईची जबाबदारी स्वीकारली. माझ्या आतेबहिणीनेच मामाशी लग्न केले. म्हणून ती माझी मामी बनली. तिला घरात बेबी म्हणतात. या जोडप्याने खूप कष्ट करून ताईची शुश्रूषा तिच्या जीवनाच्या अखेरीपर्यंत केली. कारण माझी अस्थिर जीवन परिस्थिती होती. दादा पुण्यात स्वतःच्या दुखण्यात गुरफटले होते. माझ्यापेक्षा पाच वर्षांनी लहान असलेला माझा धाकटा भाऊ अभय, जेमतेम नोकरी करत होता. तेव्हा ताईचा बोजा मामाच्या कुटुंबावर पडला.

मला मॉस्कोचे वेध लागले होते. पूर्वतयारी म्हणून कॉलरा व देवी यांची इंजेक्शने घेतली होती. हात दुखत असताना त्याच दिवशी योगायोगाने नंदाशी ओळख झाली. नंदा मराठी मध्यमवर्गीय कुटुंबातील होती. पदव्युत्तर अभ्यासक्रम पूर्ण करीत होती. कविता लिहायची, गाणी म्हणायची. माझ्या लेखनाची, अभिनयाची चाहती होती. जुहूचा किनारा, वरळी सी फेस, वांद्र्याचा बँड स्टँड ही भेटींची संकेत स्थळे बनली. मी खराखुरा प्रेमात पडत होतो. आत्तापर्यंतच्या स्त्रिया वयाने माझ्यापेक्षा मोठ्या होत्या. नंदा माझ्यापेक्षा दहा वर्षांनी लहान होती. मैत्रीने वेग धरला. एखाद्या कॉलेज-युवकाचा उत्साह माझ्यात संचारला. कोवळ्या भावनांना धुमारे फुटत होते.

मे महिन्याच्या दरम्यान श्रीकांतला लेखनाची सुरसुरी आली. कथा व्यवस्थित लिहून झाल्यानंतर तिला पटकथा-संवादाचे रूप द्यायचे ठरले. पपांनी गाडी काढली. एका शनिवारी आम्ही थेट खंडाळा हॉटेल गाठले. आचार्य अत्र्यांबरोबर पूर्वी पपा या हॉटेलात राहिले होते.

लेखनाला आरंभ झाला. चित्रपटाचे नाव ठरले : 'रातराणी.' ती एक उत्कट प्रेमकथा होती. प्रसंगामागून प्रसंग सुचत होते. पपांची आणि माझी विचारधारा पूर्ण जुळत होती. महिनाभराच्या अवधीत आम्ही लेखन पूर्ण केले. या वेळी

खर्चाचा भार श्रीकांतने उचलला. पटकथा-संवादाचे चोपडे मी त्याच्या हवाली केले. मध्यंतरी पुण्याच्या वाटेवर असलेली दिदी कांचनसह भेटून गेली. तिच्या मनातील योजनांची अर्थातच मला तेव्हा कल्पना नव्हती. माझे नेहमीसारखे मोकळे-ढाकळे वागणे चालू होते.

जून महिना आला. या वेळचा माझा वाढदिवस अविस्मरणीय ठरला. जवळ येणाऱ्या नंदाने माझ्या वाढदिवसानिमित्त स्वतःचे कौमार्य मला अर्पण केले. अनपेक्षित आनंदापायी मी बधिर बनलो. परदेशगमन उंबरठ्यावर ठेपलेले. साप्ताहिक 'मनोहर'मधून सदरांची लोकप्रियता उसळत होती. दूरदर्शनवर 'प्रतिभा आणि प्रतिमा'साठी निळू फुले यांची मुलाखत मुक्रर केली होती.

त्यातच दिदीने मद्रासला जाण्याचा बेत केला. तिचे तेथे शूटिंग होते. तिने सोबत मला आणि कांचनला घेतले. मी आयुष्यात प्रथमच विमान प्रवास केला. विमानात सीटचा पट्टा मला बांधता येईना. कांचनने न हसता मदत केली.

मद्रासमधील 'सवेरा' हॉटेलात आम्ही उतरलो होतो. दोन-चार दिवसांच्या मुक्कामात कांचनशी भरपूर गप्पा मारल्या. तिने तिच्या काशिनाथ घाणेकरांच्या प्रेमाबद्दल खूप मोकळेपणाने सांगितले. मी तिचा हितचिंतक मित्र म्हणून ऐकत होतो. आम्हा दोघांमध्ये मैत्रीचे एक छान नाते जमले. अजूनपर्यंत ते टिकलेय. त्यात राग, मत्सर या भावनांना थारा नाही. मी कांचनशी लग्न करावे असे पुढे दिदीने फार तीव्रतेने प्रयत्न केले. पण ती कल्पना मला रुचतच नव्हती. माझ्या प्रामाणिक नकारामुळे दिदीला वाईट वाटले. स्वभावाने आम्ही एकमेकांना अनुरूप नव्हतो. दिदी समजूतदार असल्यामुळे तिने मनात कडवट भावना ठेवली नाही. आमचे स्नेहसंबंध या क्षणापर्यंत अबाधित राहिले आहेत.

मद्रासहून परत येण्यापूर्वी आम्ही एक दिवसासाठी पाँडिचेरीला गेलो. अरविंदाश्रमाला भेट दिली.

त्या वेळी मी श्रद्धाळू नव्हतो. आश्रमापेक्षा 'ऑरोव्हिल' आवडले. त्या 'उषानगरी'चा प्रकल्प मला फार आवडला. उतार वयात तेथे राहायला जावे असे वाटले. काही वेळा माझ्या मनात विरक्ती निर्माण होते. ऐन उमेदीतही ही विरक्ती कधी कधी यायची. शांत-निवांत जगावे असे वाटायचे. पण 'ऑरोव्हिल' येथे राहणे फार खर्चाचे होते. पावसाळी हवेत विमान प्रवासाची 'मजा' अनुभवून

मुंबईला परतलो. दिदीने 'रातराणी'चे वाचन चित्रपट अभिनेत्री आशा पारेखकडे ठरविले. धो धो पावसातून आम्ही आशा पारेखच्या जुहू येथील बंगल्यावर गेलो. पटकथेतील एका भावुक प्रसंगी आशा पारेखच्या टपोऱ्या डोळयांमध्ये पाणी तरळले. तिला मराठी उत्तम समजत होते.

'रातराणी'चे वाचन नंतर चित्र-अभिनेत्री लीना चंदावरकरच्या घरी झाले. मी, पपा आणि श्रीकांत गेलो होतो. वाचन मात्र श्रीकांतने केले. दुर्दैवाने 'रातराणी' पडद्यावर कधी येऊ शकली नाही. नंतर श्रीकांतने आणि पपांनी खूप प्रयत्न केले. पण व्यर्थ !

मॉस्कोला जाण्याचा दिवस ठरला. २५ जुलै १९७३. दूरदर्शनवर निळू फुले यांच्या मुलाखतीचे चित्रण त्याआधी करून घेतले. प्रत्यक्ष टी. व्ही. च्या पडद्यावर मी ती पाहू शकलो नाही. प्रक्षेपणापूर्वीच मी देश सोडला होता. त्याच वेळी सुभाष भेंडे यांची 'अदेशी' कादंबरी वाचनात आली. चित्रपटासाठी ती कादंबरी त्या दृष्टीने मला फार आवडली. भविष्यकाळात कादंबरीच्या नायकाच्या मनाची तगमग माझ्याच वाट्याला येणार होती.

जाण्यापूर्वी ताईला भेटायला गेलो. ती सुन्न बसून होती. मधुमेह व रक्तदाब या विकारांनी तिला ग्रासले होते. ती विशेष हिंडा-फिरायची नाही. थोडा वेळ तिच्यापाशी बसलो. अचानक मला मिठी मारत ओरडली, 'अनिल, जाऊ नकोस ना !' तशा स्थितीत मन घट्ट करायला फार प्रयास पडले. बहुतेक ताई यापुढे जिवंत दिसणार नाही असे आतील आवाज बोलला.

माझ्या कचेरीतील फक्त एका सहकाऱ्याला माझ्या प्रयाणाची माहिती होती. श्री. प्रफुल्लकुमार मोकाशी यांनी मुंबई मराठी पत्रकार संघात माझ्यासाठी निरोप समारंभ आयोजित केला. त्या समारंभाला श्री. नारायण आठवले ऊर्फ अनिरुद्ध पुनर्वसु यांनी शुभेच्छा व्यक्त केल्या. दादांना मी तेथे घेऊन गेलो होतो. दादांची मुद्रा धन्य, कृतार्थ दिसत होती. किमान पाच वर्षे राहीन असे मी म्हणालो. अद्यापपर्यंत करार मला माहीत नव्हता. प्रगती प्रकाशन ही सरकारी संस्था होती. सोविएत सरकारसारखे बलाढ्य सरकार मला निमंत्रित करीत होते. राहण्याच्या अपार्टमेंटची सोय होईल हे मात्र मला आधी ठाऊक होते. पगार वगैरे किती ह्याचा पत्ता नव्हता. काहींनी रशियन हिवाळ्याबद्दल चिंता व्यक्त केली. पण जेथे २६ कोटी लोक जिवंत राहतात, तेथे मी राहू शकेन असा आत्मविश्वास मनात

होता. एका दृष्टीने ही अज्ञातात घेतलेली उडी होती.

दिदीने आदल्या रात्री निरोपाचे जेवण स्वतःच्या सायनच्या घरी ठरविले. तिच्या घरच्या माणसांव्यतिरिक्त श्रीकांत, चारुदत्त सरपोतदार, शरद भिडे ही मंडळी होती.

पहाटे आमच्या स्वाऱ्या सांताक्रूझ विमानतळाकडे निघाल्या. दोन सुटकेसेस, एक छोटी हँडबॅग एवढेच माझे सामान होते. दिदीला पाहताच विमानतळावरच्या लोकांनी V.I.P. लाऊंज उघडला. मी 'एअर इंडिया'नेच जाणार असा आग्रह धरलेला होता. त्या वेळी मुंबई, दिल्ली, तेहरान, मॉस्को असा मार्ग जात होता. विमानतळावर निरोप द्यायला दादा, मामा व बेबी आले होते. दादांनी माझ्या हाती एक रुपया ठेवला. पासपोर्ट कंट्रोलकडे जाण्यापूर्वी कोरड्या ओकारीची भावना झाली. ह्या कोरड्या ओकाऱ्यांचा मी वेळीच छडा लावला असता तर भविष्यकाळातील एक मोठा अनर्थ वाचला असता. पण मला डॉक्टरांचे एकूण वावडे. ताईचे आजार काढून आधीच आम्ही बेजार होतो. नंतर रशियातील वैद्यकीय सेवेची भयंकर अवस्था पाहिल्यानंतर पूर्ण तपासणी करणे राहून गेले. काही क्षण जीव नुसता घुसमटायचा. बाकी प्रकृती ठीक होती. मोठा आजार मला ठाऊक नव्हता. फक्त पोटाची तक्रार चालायची. जरासे मन अस्वस्थ झाल्यानंतर पचनक्रिया गडबडायची. मी तसाच उन्मना अवस्थेत विमानाकडे गेलो.

तेहराननंतर विमानात फक्त चार-पाच प्रवासी उरले. एकूण सात-आठ तासांनंतर मॉस्कोच्या शेरेमेत्येवो विमानतळावर मी उतरलो. विमान उतरण्यापूर्वी पावसाची हलकी सर पडून गेली होती. तेथील उन्हाळ्याचे दिवस असूनसुद्धा हवेत गारवा होता. विमानाच्या शिडीवर उभा राहिलो, तेव्हा अंगातून जोरात शिरशिरी गेली. कचेरीतून मला घेण्यासाठी कुणीतरी येतील अशी खात्री होती. इद्रावस्तुईत्ये (नमस्ते), स्पसिबा (धन्यवाद), दस्विदानिया (पुन्हा भेटू) एवढ्या रशियन शब्दांची माझ्यापाशी शिदोरी होती. रशियन अक्षरांची ओळख होती. मी रशियन लिपी वाचू शकत होतो. 'शिवास रीगल' व्हिस्कीची अर्धी बाटली व 'ओल्ड मंक' ह्या भारतीय रमची बाटली सांगाती होती.

कस्टम ऑफिसरने मला सांगितले की, मला भेटायला माणसे आलेली होती. ग्रेगरी पेकसारखा उंचापुरा पुरुष आला होता. हा वादिम नोविकोव. 'प्रगती

प्रकाशन'च्या विदेश विभागाचा प्रमुख. त्याच्याबरोबर हसऱ्या मुद्रेची चष्मेवाली बाई होती. ती हिंदी बोलत होती. गुजराती, मराठी व नेपाळी विभागांची मुख्य होती. खरे तर ती गुजरातीची मुख्य संपादिका होती. ही मूळची आर्मेनियन वंशाची होती. तिचे सुटसुटीत नाव मार्गो होते.

मार्गो व वादिमने काळ्या रंगाच्या वोल्गा मोटारीत मला बसविले. स्वच्छ, हिरव्या झाडांचे, उंच इमारतींचे, प्रशस्त रस्त्यांचे मॉस्को महानगर होते असे प्रथम दृष्टिक्षेपात मला आढळले.

*

# मस्क्वा

मॉस्को हे नाव इंग्रजी उच्चारातील आहे. मूळ रशियन मस्क्वा असे नाव आहे. मस्क्वा नदीच्या तीरावर यूरी दोल्गारुकीने म्हणजे आजानूबाहू यूरीने सातशे वर्षांपूर्वी हे शहर वसविले. आपण ज्याला रशिया म्हणतो त्या देशाचे नाव १९१७ च्या बोल्शेविक क्रांतीनंतर सोविएत समाजसत्तावादी प्रजासत्ताकांचा संघ म्हणजे सोविएत संघ. त्यात रशियन फेडरेशन हे सर्वांत मोठे प्रजासत्ताक. एकूण पंधरा प्रजासत्ताकांचा हा संघ. याचे क्षेत्रफळ भारतापेक्षा सात पटींनी मोठे आहे. लोकसंख्या १९७३ साली अवघी २६ कोटी होती. मस्क्वा, लेनिनग्राद ही रशियन फेडरेशनमधील ऐतिहासिक मोठी शहरे. मस्क्वा सोविएत संघाची राजधानी. लोकसंख्या सुमारे ८० लाख. टॅक्सी, ट्रॉलीबस, बस, ट्राम व मेत्रो म्हणजे भुयारी रेल्वे ही सार्वजनिक वाहतुकीची वाहने. मेत्रोची सुमारे १०५ सुंदर संगमरवरी स्थानके. ही स्थानके जमिनीखालील जणू संगमरवरी प्रासाद. सुंदर झुंबरे लटकलेली. कमालीची स्वच्छता. कुणीही धूम्रपान करीत नाही, थुंकत नाही. गोंगाट नाही. सुरेख निळ्या गाड्या वेगात धावतात. ड्रायव्हरच्या जागी काही महिला दिसतात. सिग्नल देणारी महिलाच. प्रवेशद्वाराशी ऑटोमॅटिक मशिन्सपाशी महिला. सारीकडे बायकाच.

मस्क्वाचे पहिल्या काही दिवसांमध्ये हे असे दर्शन घडले. अर्थात तेथे परीराज्य आहे अशी खुळचट कल्पना नव्हती. त्रापेझनिकोवनी शांतपणे सांगितले होते, "एकूण प्रचारात छापतात ते सर्व खरे नाही. आमच्यात काही लोक असंतुष्ट आहेत. ते कधी कधी बडबडतात." माझ्या घटस्फोटानंतर त्यांनी

मला इशारा दिला, "तुझ्या कचेरीत भरपूर मुली असतील. लहान वयाच्या पोरींपासून सांभाळ. परदेशी माणसाच्या एकदम गळ्यात पडतात. समवयस्क अशी मैत्रीण पाहा." त्यांचा हा सल्ला मी लक्षात ठेवला होता. शिवाय एल्झाच्या ओळखीत मी बरीच माहिती काढून घेतली होती. रशियन तरुणीला प्राप्त कसे करायचे हे मी शिकून घेतले होते. मॉस्कोबाहेरच्या मुलींपासून विशेष सावध राहायला पाहिजे होते. प्रत्येक शहरात राहण्याचा परवाना पद्धत तेथे आहे. इतर शहरांमधल्या मुली किंवा मुले खोट्या विवाहांमार्फत मॉस्कोचा परवाना मिळवतात हेसुद्धा मला माहीत होते.

सुमारे दीड तासानंतर आमची मोटर माझ्या अपार्टमेंटपाशी पोहोचली. अपार्टमेंट प्रकाशनगृहाचे होते. त्यात अत्यावश्यक फर्निचर होते. हाल्तुरिन्स्काया उलीत्सावरच्या म्हणजे हाल्तुरिन रस्त्यावरच्या दोन क्रमांकाच्या घराच्या पाचव्या मजल्यावर तीस क्रमांकाचे अपार्टमेंट माझ्या वाट्याला दिले होते. घराच्या चौदा मजल्यांवर सर्व सोविएत भाडेकरू होते. मी एकटाच परदेशी होतो. मस्क्वात घरांच्या क्रमांकांची एक पद्धत अशी आहे. एका बाजूला सम आकडे म्हणजे– २, ४, ६, ८,... दुसऱ्या बाजूला विषम आकडे म्हणजे– १, ३, ५, ७,... तेव्हा माझे घर रस्त्याच्या आरंभीच होते.

अपार्टमेंट आटोपशीर होते. एक बेडरूम, हॉल, स्वयंपाकघर, संडास, टबसह बाथरूम, बाल्कनी. शिवाय बेडरूमलगत अडगळीची खोली होती. "इथं एखाद्या मुलीला लपवता येईल." मी म्हणालो. वादिम व मार्गो हसली. माझ्या ताब्यात किल्ल्या देत दोघे निघाली. मी त्यांना व्हिस्कीचा पेग घेण्याचा आग्रह केला. मार्गोने नाममात्र ग्लासाला तोंड लावले. वादिमने पाणी न मिसळता खाडकन घोट मारला. ही पिण्याची रशियन पद्धत. निव्वळ मद्याच्या घोटानंतर थोडे पाणी पितात. पण मद्यात काही मिसळत नाहीत. माझ्या ह्या व्हिस्की देण्यामुळे वादिम पुढच्या काळात मित्र बनला. ऑफिसने दिलेल्या सेटलमेंट अलाउन्सपैकी तीनशे रूबल दोघांनी मला दिले. 'दुसऱ्या दिवशी सकाळी नऊ वाजता येईन आणि ऑफिसला घेऊन जाईन' असे सांगून वादिम निघून गेला. मार्गोही त्याच्याबरोबर निघून गेली.

आता मी एकटा बनलो. बाहेर दिवसाचा उजेड भरपूर होता. खिशात पैसे होते. तेव्हा रात्री नऊ वाजता एखाद्या रेस्तराँमध्ये जेवावे असा मी विचार केला.

घड्याळात पाहिले. आठ वाजले होते. विमानातून बाहेर पडण्यापूर्वी घड्याळात मॉस्कोची वेळ लावली होती. मॉस्को वेळ भारतीय वेळेपेक्षा अडीच तास मागे होती. उन्हाळ्याचे दिवस होते म्हणून दिवस फार मोठा असतो. अंधार फार उशिरा पडतो.

अखेर घराबाहेर पडलो. फूटपाथवरून रस्त्यावर पाऊल ठेवणार तोच मोटारीचा हॉर्न जोरात वाजला. एकदम लक्षात आले. इथली वाहतूक वेगळी. सगळ्या मोटारी लेफ्ट हँड ड्राईव्ह. चालत चालत पुढच्या चौकापर्यंत गेलो. तेथे एक रेस्तराँ होते. आतमध्ये काही माणसे बसली होती. पण दारावरच्या माणसाने मला अडविले. 'बंद आहे' असे उर्मटपणे तो बोलला. मुकाट घरी परतलो. घरात पाण्याचे दोन ग्लास होते. खायला काहीच नव्हते. पोटात भुकेचे कावळे ओरडायला लागले. सारी रात्र तशीच भुकेने तळमळत काढली. पहाटे चारलाच दिवस उजाडला. चहा, कॉफीची घरात सोय नव्हती. घराच्या खालचे कॅफेटेरिया नऊनंतर उघडणार होते.

प्रातर्विधी आटोपून वादिमची वाट पाहू लागलो. तो नऊ वाजता आला. मी भुकेला होतो हे सांगायला लाजलो. कदाचित ऑफिसात चहा-कॉफी देतील असे वाटले.

वादिमने मेत्रोचा मार्ग अचूक दाखविला. घरापासून पाच मिनिटे चालल्यानंतर प्रीअब्राझेन्स्काया मेत्रो स्टेशन होते. तेथून सरळ मार्गावर पार्क कुल्तुरी सातवे-आठवे स्टेशन होते. ऑफिस तेथून पाच मिनिटांवर चालण्याच्या अंतरावर होते. म्हणजे ऑफिसला जाणे-येणे सोपे होते.

एका जुनाट दुमजली इमारतीत ऑफिस होते. नंतर काही वर्षांनी आठ मजली भव्य इमारत बनली. भारतीय विभागाचे प्रमुख फ्योद्र फ्योद्रविच अनुक्रियेव यांच्याशी परिचय झाला. अर्नेस्ट हेमिंग्वेसारखा दिसणारा हा दाढीवाला माणूस उमदा होता. त्यांना हिंदी, इंग्रजी भाषा बोलता येत होत्या. पंजाबी भाषेचे ते संपादक होते. मोठ्या प्रेमाने त्यांनी सर्व विभागांमधून मला फिरविले. अनेक बायका व मुली तेथे काम करीत होत्या.

चहा-कॉफीचा अजून पत्ता नव्हता. अनुक्रियेव मला अकाउंट सेक्शनमध्ये घेऊन गेले. माझ्या हाती आणखी तीनशे रूबल देण्यात आले. भुकेने माझे पाय थरथरत होते.

घरासाठी कपबशा वगैरे वस्तू खरेदी करण्यासाठी मदत करण्यासाठी म्हणून अनुक्रियेव यांनी बंगाली विभागातील ल्येना नावाची मुलगी माझ्या सोबतीला दिली. ल्येना मोडके इंग्रजी बोलत होती. अजून मला रशियन भाषा बोलता येत नव्हती. ल्येना बंगालीत कॉपी-लेखक होती. चालता चालता तिची ओळख झाली. तिचे शालेय शिक्षण पूर्ण झाले होते. वय होते अठरा. तिचे आई-वडील भारतात दिल्ली शहरात 'सोविएत देश' कचेरीत काम करीत होते. मॉस्कोपासून दूर एका उपनगरात ती व तिचा मोठा भाऊ आजीबरोबर राहत होते. खरेदी आटोपून ल्येनाला तीन वाजता ऑफिसला परतायचे होते. मी तिला रेस्तराँमध्ये चलण्याचा आग्रह केला. तिने नम्र नकार दिला. माझ्यासाठी म्हणून तिने पाव व सॉसेजेस दुकानातून विकत घेतले. तेवढेच खाणे मला कसेसेच वाटले. मला रीतसर जेवणाची सवय होती. माझा संकोच नडला.

आम्ही ऑफिसात परतलो. तोवर अनुक्रियेव यांनी माझ्या वतीने जेवणाचे एक निमंत्रण स्वीकारले होते.

चार-पाच वर्षांपूर्वी मुंबईत 'नेहरू पारितोषिक' विजेते आले होते. सोविएत लेखक, कवी, चित्रकार यांचा त्या प्रतिनिधी मंडळात समावेश होता. मादाम नतालिया गुसेवा यांच्याशी माझा परिचय घडला. गुसेवा यांनी मॉस्कोतील बालरंगभूमीसाठी 'रामायण' नाटक लिहिले होते. त्या नाटकाच्या प्रयोगाची खुद्द जवाहरलाल नेहरूंनी प्रशंसा केली होती म्हणे. मॉस्कोच्या बाल रंगभूमीने या नाटकाचे पुढे वीस वर्षेपर्यंत प्रयोग केले. त्या नाटकाच्या लेखनाबद्दल मादाम गुसेवा यांना 'नेहरू' पुरस्कार मिळाला होता. पुढील काळात त्यांचा-माझा पत्रव्यवहार चालू होता. अनुक्रियेव यांच्याशी सकाळी मी ह्या गोष्टीचा उल्लेख केला होता. त्यांनी नंतर फोनवरून मादाम गुसेवांशी संपर्क साधला होता. तेव्हा मादाम गुसेवांनी आम्हा दोघांना जेवायला बोलावले होते. माझा जीव भांड्यात पडला. दुपारच्या जेवणाचा प्रश्न सुटला होता. खिशात सहाशे रूबल असूनही गेले सव्वीस तास मी भुकेला होतो. मुंबईत न्याहरीपासून रात्रीच्या जेवणापर्यंत रेस्तराँ वा कॅफेंचा आधार घ्यायचा अशी मला सवय होती. मॉस्कोत तशी दर पावलागणिक सोय नव्हती. शिवाय इथली सेवा वेगळ्या प्रकारची होती. जेवणासाठी रेस्तराँमध्ये जागा मिळविणे फार मोठे दिव्य होते.
खाण्या-पिण्याच्या ह्या अडचणीचा अजूनपर्यंत विचार डोक्याला शिवला

नव्हता.

जाताना टॅक्सीत अनुक्रियेव स्पष्ट म्हणाले: "काम वेळेवर देत जा. आमच्या योजनेचं वेळापत्रक सांभाळ. फार मोठ्या अपेक्षा बाळगू नको. अजून मराठी विभागाची स्थापना व्हायचीय. सुरवातीला अनेक समस्या येतील." त्यांचे म्हणणे खरे होते. मराठी जाणणारी रशियन व्यक्ती नव्हती. शेवटी ग्लादीशेव नावाचे पेन्शनर गृहस्थ मराठीसाठी संपादक नेमले. ग्लादीशेव पूर्वी 'प्रगती प्रकाशन'मध्ये हिंदीचे संपादक होते. १९४४ साली 'तास' वृत्तसंस्थेचे वार्ताहर म्हणून मुंबईत काम करीत होते. त्या वेळी मुंबईतील मुक्कामात त्यांनी मराठीचा अभ्यास केला होता. मराठी मोडके बोलत होते. पण त्यांचे व्याकरण पक्के होते. असे नंतर अनुभवांती माझ्या ध्यानात आले. कॉपी करण्यासाठी झिनैदा इवलेवा हिची नेमणूक झाली. ती पूर्वी हिंदीत कॉपी करण्याचे काम करायची. हिंदी, मराठी, नेपाळी भाषांमध्ये देवनागरी लिपीचा वापर होतो. अनुवादकांनी दिलेला अनुवाद कॉपी करून छापखान्यासाठी द्यायचा असा प्रघात होता. मार्गो मराठीची निमित्तमात्र प्रमुख होती. अनुवादकाला पुस्तक देणे, अनुवाद घेणे, त्याचा मासिक हिशेब ठेवणे अशी तिची कामे होती. प्रकाशनगृहात जगातील चाळीस भाषांचे दोनशे अनुवादक काम करीत होते. भारतीय भाषांचे पस्तीस अनुवादक होते. हिंदी, बंगाली, तामिळी विभाग खूप जुने व मोठे होते. मराठीचा मी पहिला व एकमेव अनुवादक होतो. अर्थात माझ्या दृष्टीने ही अभिमानाची बाब होती. मॉस्कोतच असलेल्या सात नंबरच्या छापखान्यात मराठी पुस्तके छापण्याची सोय होती. अपरिचित लिपी कंपोज करण्याचे कसब तेथील लोकांनी अवगत केले होते. दर्जेदार, चुका कमी असलेली छपाई हे तेथील वैशिष्ट्य होते. श्री. प्रभाकर ऊर्ध्वरेषे यांनी अनुवादिलेले गोर्कीचे 'आई' पुस्तक आधीच प्रसिद्ध झालेले होते. ह्या पुस्तकाच्या नंतर अनेक आवृत्त्या निघाल्या. पुस्तकांची महाराष्ट्रातील वितरण-विक्री व्यवस्था मुंबईतील लोकवाङ्मय गृहाकडे होती. प्रकाशनगृहात एकूण कर्मचारी सुमारे तीन हजार होते. युनेस्कोच्या धर्तीवर प्रकाशनाचे काम चालायचे. चोख योजना वाखाणण्यासारखी होती. अनुक्रियेव यांनी पूर्वी भारतात 'नोवोस्ती वृत्त संस्थे'मार्फत काम केलेले होते. आता 'नोवोस्ती'ने मला 'प्रगती'ला उसना दिले होते. माझा 'प्रगती'शी पहिला करार तीन वर्षांचा होता असे सकाळीच मला

समजले होते. यदाकदाचित मी मुंबईत कायमसाठी म्हणून परतलो तर 'सोविएत देश'मध्ये मला नोकरी परत मिळावी अशी तरतूद त्रापेझनिकोव यांनी केली होती.

मादाम नतालिया गुसेवा यांचे अपार्टमेंट माझ्यासारखेच होते. टेबलावर बशा मांडलेल्या होत्या. वोदका आणि कन्याक यांच्या बाटल्या उभ्या होत्या. त्यांच्याशेजारी खनिज पाण्याच्या बाटल्या होत्या. मद्यासाठी छोटे छोटे कट ग्लासचे चषक होते. गुसेवा यांचे पती पताबेन्को चित्रकार आहेत. दिल्लीतील सोविएत दूतावासात सांस्कृतिक विभाग प्रमुख म्हणून त्यांनी काही वर्षे काम केले होते. त्या काळात नतालिया यांनी रामायण-महाभारताचा अभ्यास केला. तशा व्यवसायाने त्या सोविएत विज्ञान प्रबोधिनीत मानववंश शास्त्रज्ञ आहेत. मॉस्कोतील पुढील वास्तव्यात मी पाहिले की, हे पती-पत्नी सोविएत समाजाला भारताची सांस्कृतिक ओळख करून देण्याचे कार्य निरपेक्षतेने व अव्याहतपणे करीत आहेत. अत्यंत सुसंस्कृत, प्रेमळ जोडपे.

फार भुकेपायी मी विशेष खाऊ शकलो नाही. सलाड उत्तम होते. हे रशियन सलाड आपल्या भारतामधील रेस्तराँमधून हास्यास्पद बनवतात. रशियात वेगळ्याच पद्धतीने करतात. स्मिताना नावाचा आंबट सायीसारखा पदार्थ त्यात वापरतात. त्यामुळे चव वेगळीच येते. पुन्हा भेटण्याचा वायदा करून तेथून निघालो. अनुफ्रियेव सांगाती होते. ते मॉस्कोत राहत नव्हते. मॉस्कोपासून दूर उपनगरात त्यांचा निवास होता. मॉस्कोतसुद्धा जागेची टंचाई होती. माझ्या घराआधी त्री वक्झाल नावाचे स्थळ होते. वक्झाल म्हणजे रेल्वे स्टेशन. मॉस्कोत एकूण नऊ रेल्वे स्टेशने आहेत. चार विमानतळ आहेत. एक आंतरराष्ट्रीय विमानतळ आहे. तर त्या त्री वक्झाल म्हणजे तीन स्टेशने येथे अनुफ्रियेव टॅक्सीतून उतरले. मीटरचे झालेले पैसे त्यांनी चोखपणे दिले. त्या वेळी मॉस्कोत टॅक्सी खूप स्वस्त होती. एका किलोमीटरला दहा कोपेक. पण रिकामी टॅक्सी मिळणे दुरापास्त. रशियन माणसे माझ्यापाशी बढाया मारायची : "आमच्याकडे खनिज पाण्याचा ग्लास पेट्रोलपेक्षा जास्त महाग आहे. पेट्रोल खूप स्वस्त."

दुसऱ्या दिवशी मी माझी गाडी रुळावर आणण्याचा प्रयत्न केला. शेजारच्या इमारतीमधील एका तुर्कमेनी माणसाकडून सार्वजनिक फोन कसा

करायचा हे शिकून घेतले. स्थानिक कॉलला फक्त दोन कोपेकचे नाणे टाकायचे होते. कारण अद्याप माझ्या अपार्टमेंटमध्ये फोन नव्हता. न्याहरीसाठी गोर्की रस्त्यावरच्या इन्टुरिस्ट हॉटेलमध्ये जायचे. मग युक्रेन, नॅशनल, मेत्रापोल अशा रेस्तराँमध्ये जेवायचे असा क्रम बनविला. एकट्याने जेवणे तेथे एक शिक्षा होती. टेबलाशी बसल्यानंतर वेटर वीस-पंचवीस मिनिटांनी ऑर्डर घ्यायला यायचा. प्रत्यक्ष जेवण यायला आणखी अर्धा तास उशीर. मग वेळ काढण्यासाठी प्या कन्याक. परिणामी बिल फार व्हायचे. तसे खाणे स्वस्तात होते. पण पिणे महाग.

तिसऱ्या दिवशी ऑफिसात गेलो. मार्गोने अनुवादासाठी मुलांची चार पुस्तके दिली. आरंभी इंग्रजीमधून मराठीत अनुवाद करायचा. बहुतेक भारतीय अनुवादक प्रथम इंग्रजीतून आपल्या भाषांमध्ये अनुवाद करत. त्यांना रशियन भाषा येत नसे. मायभाषा चांगली यायची. पुढे पुढे भारतीय विद्यार्थ्यांना अनुवादकाच्या नोकऱ्या मिळायच्या. त्यांना रशियन भाषा उत्तम यायची. पण मायभाषेत ते कच्चे. याचे कारण शालेय शिक्षण पूर्ण केल्यानंतर उच्च शिक्षणासाठी ते मॉस्कोला येत असत. शिवाय त्यांना अनुवादाचा अनुभव नसायचा. केवळ दोन भाषा समजतात एवढी शिदोरी साहित्याचा अनुवाद करण्यासाठी पुरी पडत नसते. अनुवादामध्ये मूळ मजकुराचा नेमका आत्मा पकडला पाहिजे. म्हणूनच जाणकार, अनुभवी अनुवादकांची आवश्यकता होती.

मला दिलेल्या पुस्तकांमध्ये एका पुस्तकाचे रशियन नाव होते : 'माशा इ मेदवेद.' म्हणजे 'माशा आणि मेदवेद.' मारीया नावाच्या मुलीची व एका अस्वलाची ती गोष्ट होती. मारीया या नावाचे रशियन लाडके रूप 'माशा' आहे. आता मराठीत 'माशा' कसे लिहायचे ? प्रत्येक भाषेची आपापली वैशिष्ट्ये, आपापले अर्थ असतात. माशा शब्दाचा अर्थ मराठीत वेगळा आहे. अशीच रशियन नावे मराठीत आणण्यास अडचण येते. बोऱ्या (बरीस), ओल्या (ओल्गा), मीषा (मिखायल) इ. तेव्हा त्या पुस्तकाचे शीर्षक दिले : 'मूर्ख अस्वल.'

अवघ्या दहा दिवसांत तीन पुस्तकांचा अनुवाद संपला. 'दिसामाजी काहीतरी लिहावे' या नियमाला अनुसरून मी रोज सकाळी कामाला बसायचो. माझा वेग रशियन लोकांना नकोसा होता. त्यांच्यापाशी योजना लहान होती. माझ्यापाशी रिकामा वेळ भरपूर होता. घराच्या आसपासच्या प्रदेशाची ओळख करून घेण्यास हळूहळू सुरवात केली. प्रीअब्राझेन्स्काया प्रदेश ऐतिहासिक

महत्त्वाचा आहे. घरामागे एक मोठे तळे होते. तळ्याच्या शेजारी एका टेकाडावर चर्च होते. चर्चची इमारत सोळाव्या शतकात बांधलेली ! ह्या चर्चमध्ये पहिल्या प्योत्रने विवाह केला अशी नोंद आहे. पहिल्या प्योत्रला इंग्रजीत नाव आहे पीटर द ग्रेट. हा रशियन झार आपल्या शिवाजी महाराजांचा समकालीन होता. रशियाचे आरमार उभारण्याच्या कामी त्याने फार मोठी कामगिरी केली.

चर्चच्या सभोवती छोटी स्मशानभूमी होती. माझ्या घरापलीकडे दोन घरे सोडून एका रिकाम्या प्लॉटमध्ये अशीच एक जुनी स्मशानभूमी होती. कालांतराने ती रद्द केली व तेथे मुलांना खेळण्यासाठी उद्यान उभारले. आज मॉस्कोतील सर्वसामान्य माणसांसाठी दफनभूमी मॉस्कोबाहेर ४०-५० किलोमीटर अंतरावर आहे. दहनभूमी अशीच दूर अंतरावर आहे. नामवंत कलावंतांसाठी दफनभूमी शहराच्या केंद्रभागी आहे. फार मोठ्या माणसांचे दफन वा रक्षाकलश क्रेमलिन भिंतीपाशी ठेवतात. तेव्हा तेथे मरणानंतर समता नाही.

प्रीअब्राझेन्स्कायाचा बाजार खूप प्रसिद्ध आहे. चार-पाच किलोमीटर पलीकडे गेले तर सकोलनिकी पार्क नावाचा प्रचंड पार्क आहे. वाटेत याऊझा नदी भेटते. याऊझाच्या तीरावरचा रस्ता रम्य आहे. शहराच्या केंद्रभागी जायला हा रस्ता जवळचा वाटतो.

सार्वजनिक वाहतुकीच्या साधनांमधून प्रवास अगदी स्वस्त होता. म्हणून प्रथम प्रथम मी खूप भटकायचो. अवघ्या पाच कोपेकचे तिकीट. कितीही अंतर प्रवास करा. संध्याकाळच्या वेळी लाल चौकात भटकायची मजा यायची. लाल चौकातील लेनिन समाधीत लेनिनच्या शवाचे दर्शन घेणे फार अवघड. त्यासाठी भल्या पहाटे उठा आणि चार-पाच तास रांगेत उभे राहा असे दिव्य करायला हवे होते. अगदी पंढरपूरच्या विठोबाच्या दर्शनाला जावे तसा हा मामला होता. सुमारे दहा वर्षांच्या वास्तव्यानंतर एक दिवस मी खास पाहुणा या नात्याने रांगेत उभे न राहता लेनिन महाराजांच्या शवाचे दर्शन घेतले. समाधीजवळचा पहारा बदलण्याचा सोहळा अनेक वेळा पाहिला. तेथे निश्चल उभे राहणाऱ्या सैनिकांना पुढे पाठदुखीचा आजार जडतो असे ऐकले.

आमच्या ऑफिसच्या जवळच गोर्की पार्क होता. मॉस्कोतील पार्क क्षेत्रफळांच्या दृष्टीने शेकडो हेक्टरचे आहेत. त्यांच्यात सर्व मोसमांमध्ये पायी

फिरणे म्हणजे शुद्ध आनंद.

एकदा ल्येनाने ऑफिसातील दोन-चार मैत्रिणींना बरोबर घेऊन मला जुने व नवे अर्बात दाखविले. अर्बात म्हणजे व्यापारी पेठ. क्रेमलिनपासून जवळच हा भाग आहे. जुन्या अर्बातमध्ये झारकालीन सरदारांची घरे आहेत. आत्ता तेथे फक्त पादचाऱ्यांसाठी म्हणून सुंदर रस्ता बनवलाय. पिरीस्त्रोयकाच्या काळात जुन्या अर्बातमध्ये चित्रकार चित्रे विकतात.

नव्या अर्बातमध्ये वेगवेगळ्या मंत्रालयांच्या वीस-एकवीस मजली इमारती उभ्या आहेत. खालच्या मजल्यांवर वेगवेगळी दुकाने. नव्या अर्बातच्या पुढे गेल्यानंतर युक्रेन हॉटेलची इमारत येते. ही उंच दगडी वास्तू वेगळ्याच प्रकारची आहे. अशा सात वास्तू स्तालीनच्या इमारती म्हणून ओळखतात. दुसऱ्या महायुद्धातील जर्मन कैद्यांकडून म्हणे या इमारती बांधवून घेण्यात आल्या. जगात सर्वांत भव्य करण्याचा स्तालीनचा हव्यास होता. एक प्रकारच्या न्यूनगंडातून हा रशियन अहंगंड निर्माण झाला. 'ग्लास्नस्त'मध्ये हे सारे नाहीसे झाले. जे घडले ते छान झाले.

अशा भ्रमंतीमधून घरासाठी म्हणून मी एकेक वस्तू खरेदी करीत होतो. पैशांना वाटा फुटतात. लौकरच एक दिवस ध्यानात आले की, पैसे संपत आले. पगाराचा दिवस खूप दूर होता. खर्चाचा अंदाजच राहिला नव्हता. कुणापाशी उसने मागायची लाज वाटत होती. इतर भारतीय अनुवादक अजून दुरावा ठेवत होते. कुणीही स्वतःच्या घरी बोलावले नव्हते. मदतीचा हात कुणाचाही पुढे झाला नाही. कचेरीतील रशियन मुली व बायका थोडी थोडी मदत करीत होत्या. मी शहराचा हळू हळू अंदाज घेत होतो.

एका संध्याकाळी लाल चौकात एकटाच फिरत होतो. लेनिन समाधीसमोर उभा राहिलो. तेवढ्यात दोन तरुण माझ्याजवळ आले. माझ्या मनगटावर मुंबईत घेतलेले स्विस ऑटोमॅटिक घड्याळ होते. तरुणांनी घड्याळ विकत मागितले. मी पैशांच्या विवंचनेत होतोच. त्यांना विचारले, "किती देणार ?" त्यांनी जी रक्कम सांगितली ती मी पटकन कबूल केली नाही. जरा मुंबईचा हिसका दाखवायला हवा ना ! थोडी घासाघीस करून दुसऱ्या दिवशी संध्याकाळी त्याच वेळी व त्याच जागी भेटायचे ठरवले.

दुसऱ्या दिवशी आणखी रिकाम्या खिशाने मी लाल चौकात गेलो. खरोखर

ते तरुण माझी वाट पाहत होते. दरम्यान लाल चौकासमोरच्या 'गूम' दुकानात रशियन मनगटी घड्याळांच्या किमतींचा अंदाज मी दिवसभरात घेतला होता. तरुणांनी सांगितलेल्या किमतीत मला नवीन घड्याळ घेता येत होते. शिवाय आणखी दहा दिवस खाण्या-पिण्यापुरते पैसे उरणार होते. म्हणून घड्याळ विकण्याचा मी निश्चय केला होता. विकत घेणारे वाद्यवादक होते. ते खूष आणि मी खूष. आमची ही देवघेव होताना थोडी गर्दी जमली. ते तरुण एकदम गायब झाले. त्यांनी पंचवीस-पंचवीस रूबलच्या नोटा दिल्या होत्या. तोवर मी पंचवीस रूबलची नोट पाहिली नव्हती. म्हणून धाकधुकत्या मनाने 'गूम'मध्ये गेलो. नोट चालल्यानंतर तात्काळ मेत्रापोल हॉटेलकडे जेवणासाठी मोर्चा वळवला. मध्यभागी कारंजे उडणारे मेत्रापोल रेस्तराँ माझे आवडते ठिकाण बनले होते.

जेवणासाठी रोज सकाळ-संध्याकाळी दहा-पंधरा किलोमीटरचा प्रवास करायला लागत होता. कारण घराच्या जवळचे रेस्तराँ चांगले नव्हते. या खाण्याच्या आबाळीमुळे माझे वजन चार-पाच किलोंनी झटकन उतरले. जेवण अत्यंत बेचव होते. विलंब, बेचवपणा कसेबसे वळणी पाडले. सांगतो कुणाला ? नवीन अनुभव पाहिजे होता ना ? त्याची किंमत द्यायला पाहिजे होती.

एक दिवस त्रापेझनिकोव अचानक घरी आले. ते उन्हाळ्याच्या सुटीवर मॉस्कोत आले होते. माझा समाचार घ्यायला आले आणि माझ्यापासून ट्रामच्या चार स्टॉपच्या अंतरावर असलेल्या त्यांच्या घरी जेवायला म्हणून मला घेऊन गेले. त्यांच्या बायकोने माझ्या उतरलेल्या वजनाबाबत चिंता व्यक्त केली. "पोरींबरोबर जास्त मजा करत असेल !" त्रापेझनिकोव डोळे मिचकावत म्हणाले.

मुली हा विषय माझ्या डोक्यात नव्हता. 'नोवोस्ती वृत्तसंस्थे'ची पूष्कीन चौकातील कचेरी मी एव्हाना गाठली होती. सा. 'मनोहर' साठी 'मस्क्वाच्या तीरावर' सदराचा पहिला लेख पाठवायचा होता. अकुलोव यांची भेट घेऊन लेखाचा इंग्रजी तर्जुमा बनवून लेख 'नोवोस्ती'मार्फत मुंबईला 'सोविएत देश' कचेरीकडे पाठवला. नंतर 'सो. देश' कचेरी 'मनोहर' कडे लेख पाठवणार होती. एवढे सव्यापसव्य होते. अर्थात मॉस्कोत मला त्या लेखाबद्दल रूबल मिळाले. पुढे 'मनोहर'ने दादांकडे रुपयांचा मोबदला दिला. एकाच लेखावर दोन मोबदले मिळायचे. शिवाय तिसराही रूबलरूपी मोबदला मिळायचा. कारण त्याच विषयांवर रेडिओ मॉस्कोसाठी भाषणे तयार केली. रेडिओ मॉस्कोला माझे

आगमन समजले होते. माझ्या त्या सर्व भाषणांचे तेथे इतर भारतीय भाषांमधून अनुवाद घडले व कार्यक्रम प्रक्षेपित झाले. त्या वेळी मॉस्को रेडिओवरील मराठी विभागाची रशियन निवेदिका इरीना लेबेदेवा हिची ओळख झाली. शिवाय श्रीपाद अमृत डांगे यांची दुसरी कन्या शैला डांगे यांचाही परिचय घडला. कीरा पताकी व गुलचेहरा या चांगल्या मैत्रिणी बनल्या. कालांतराने शैला डांगे यांचे पती श्री. रझा अली यांची ओळख झाली. पुढील सोळा वर्षांत शैला-रझा या जोडप्याशी उत्तम मैत्री जमली.

दरम्यान अकुलोव यांनी आणखी दोन ओळखी केल्या. 'यूथ रिव्ह्यू'चा संपादक ईगर अलेक्सांद्रोव हा माझा समवयस्क होता. ईगर पुढे छान मित्र बनला. त्याने व मी 'यूथ रिव्ह्यू'मध्ये चार-पाच वर्षे चांगली कामगिरी केली. मी इंग्रजीमधून लेख लिहू लागलो. ईगरमुळे ताश्कंद व मॉस्को चित्रपट महोत्सव पाहायला मिळाले. ताश्कंदमुळे लीपझिग, वार्ना चित्रपट महोत्सवांना हजर राहता आले. ईगरमुळे 'यूथ रिव्ह्यू'ची दुसरी संपादिका मरीना ब्लागोनरावोवा हिची ओळख झाली. मरीनाने व मी बरेच काम केले. ती, ईगर आणि मी असे मित्रांचे छान त्रिकूट बनले. मरीना आता 'डायलॉग' या रशियन-भारतीय मासिकाची कार्यकारी संपादिका आहे.

अकुलोव यांनी दुसरी ओळख करून दिली बरीस व्लासोव यांची. बरीस 'नोवोस्ती'च्या टेलीव्हिजन विभागात काम करीत होते. त्यांनी व मी मॉस्कोच्या पार्श्वभूमीवर अनेक विषयांवर टेली-फिल्म तयार केल्या. अशा रीतीने लेखन, रेडिओवर भाषणे, टेली-फिल्म निर्मिती यांच्यात मी गुरफटलो. शिवाय 'प्रगती' प्रकाशनाचे अनुवादाचे मूळ काम होतेच. हळू हळू रशियन भाषा बोलण्यात मी प्रगती केली. अर्थात आरंभी बराच त्रास झाला. मला प्रकाशनगृहातर्फे रशियन भाषा शिकवणारी शिक्षिका देण्यात आली. पण जेव्हा व्याकरणाला आरंभ झाला तेव्हा मी तिला रजा दिली. आठवड्यातून दोन दिवस एकेक तास अभ्यास चालायचा. मी माझ्या पद्धतीने डायरेक्ट मेथडने शिकलो. चिकाटी, स्मरणशक्तीचा वापर यांच्यामुळे रशियन भाषा मला अवगत झाली. अर्थात मोठे श्रेय जाते ते रशियन माणसांच्या उदार स्वभावाला. परदेशी माणूस जेव्हा रशियन बोलतो तेव्हा रशियन माणसे त्याचे कौतुक करतात. परदेशी माणसाने जरी चुका केल्या तरीही तू चुकलास असे ती कधीही म्हणत नाहीत. चुकलेला

शब्द पुन्हा योग्य रीतीने उच्चारतात. त्यामुळे आपण जर नीट लक्ष दिले तर आपली रशियन भाषा चटकन सुधारते.

ईगर, मरीना यांना इंग्रजी भाषा उत्तम येत होती. गुल तर हिंदी छान बोलायची. ती उझ्बेक आहे.

महिनाभरात मॉस्कोत किंचित जम बसला. पण अन्नासाठी दाही दिशांना धावावे लागत होते.

*

# तमारा

एक महिन्यानंतर मार्गो व अनुक्रियेव यांना माझ्या कामसू स्वभावाची खात्री पटली होती. एक दिवस कचेरीत मी आलो तेव्हा मार्गो हसत म्हणाली, "अनिलजी, एक सुंदर तरुणी तुमची वाट पाहतेय." घरातील फर्निचर पुरविणाऱ्या विभागाची प्रमुख तमारा ग्रीगोरेवना फ्रोलोवा हिची मार्गोने ओळख करून दिली. रशियात स्त्रीला आदरार्थी संबोधायचे तेव्हा तिच्या नावासह तिच्या पित्याचे नाव घेतले पाहिजे. रशियन भाषेत मराठीप्रमाणेच 'तू' व 'तुम्ही' हा फरक आहे. रशियन स्त्रिया जरी विमुक्त असल्या तरी दूरान्वयाने पुरुषाचे वर्चस्व मानतात. लग्नानंतर कोणते आडनाव घ्यावे ह्याचे स्त्रीला स्वातंत्र्य असते. तरीही ती कायम बापाचे नाव लावते. उदा. तमारा मूळची इवानोवा होती. लग्नानंतर फ्रोलोवा बनली. तरीही ती कायम तमारा ग्रीगोरेवना अशी संबोधली जायची. तिच्या पित्याचे नाव ग्रीगोरी असे आहे.

मला आणखी फर्निचर हवे काय अशी तमाराने पृच्छा केली. ती माझ्यावर आषक बनली होती असे तिची नजर बोलत होती. माझे वय तेव्हा बत्तीस होते. ती पस्तीशीच्या सुमाराला दिसत होती. दुसऱ्या दिवशी माझ्या अपार्टमेंटला प्रत्यक्ष येऊन पाहणी करीन असे ती म्हणाली. दरम्यान मार्गोच्या हिंदीतून कोपरखळ्या चालू होत्या. मार्गोबेन माझी खरोखर हितचिंतक बनली. कुणीही एकाकी राहू नये. स्त्रीला पुरुषाची किंवा पुरुषाला स्त्रीची सोबत असावी असा एकूण सोविएत समाजाचा निकोप दृष्टिकोन दिसला. उगीच संस्कृती संरक्षणाबाबत शिरा ताणताना कुणी आढळले नाही.

माझ्याबद्दलची संपूर्ण माहिती वाचूनच तमारा माझ्याकडे आली होती. योगायोग म्हणजे मंत्रालयातील इंजिनिअर इकॉनॉमिस्टच्या नोकरीला कंटाळून ती नुकतीच 'प्रगती'मध्ये आली होती. फर्निचर पुरविणे हे काम, तिचा मूळ व्यवसाय नव्हता. ती घटस्फोटिता होती. तिला दहा-बारा वर्षांची एक मुलगी होती. मुलगी तमाराच्या आईकडे राहत होती. तमाराच्या व मुलीच्या नावावर एक बेडरूमचा स्वतंत्र फ्लॅट मॉस्कोत होता. माझा आतील आवाज बोलला, 'आजवर दिवास्वप्नांमध्ये जिला पाहत होतास तीच ही सोनेरी केसांची तुझी साथीदारीण !' पूर्वी पुण्यात असताना एल्झाकडून मला समजले होते की, जेव्हा एखादी रशियन तरुणी रेस्तराँमध्ये संध्याकाळच्या जेवणाचे निमंत्रण स्वीकारते, तेव्हा ती जवळजवळ निम्मी तुमचीच होते. जेवण संपल्यानंतर रात्र तुमच्या घरी किंवा तिच्या घरी छान साजरी होऊ शकते.

मी या विधानाची सत्यता पडताळून घेण्याचा प्रयत्न केला. तमाराला संध्याकाळी रेस्तराँमध्ये जेवायला बोलावले. तिने मान्य केले. लाल चौकापाशी प्लोशात्स रेवाल्यूत्सियी मेत्रो स्टेशनपाशी अनेक टेलिफोनच्या बूथपाशी सहा वाजता भेटण्याचा संकेत ठरला. तेथून मेत्रापोल हॉटेल जवळच होते. म्हणून हे संकेतस्थळ माझ्या दृष्टीने सोयीचे होते.

मी पावणेसहालाच टेलिफोन्सपाशी पोहोचलो. सव्वासहापर्यंत तमाराचा पत्ता नव्हता. मी मनाशी म्हटले, 'गुंगारा दिला असावा.' प्रेमाच्या खेळामध्ये हारजीत चालतेच. सातपर्यंत वाट पाहून मी जागचा हललो. स्टेशनच्या दुसऱ्या बाजूला आलो. तो काय ! तेथेही टेलिफोनचे बूथ रांगेने उभे ! ! मॉस्कोतील बव्हंश मेत्रो स्टेशनना दोन प्रवेशद्वारे असतात हे माझ्या लक्षात आले नव्हते. माझा घोटाळा झाला होता. मी चुकीच्या दाराशी उभा होतो. अखेर मेत्रापोलमध्ये त्या रात्री एकटाच जेवलो.

दुसऱ्या दिवशी सकाळी तमाराला कचेरीत फोन केला. तिने समजूतदारपणे माझा घोटाळा स्वीकारला. पुन्हा संध्याकाळी माझ्याच घरी येण्याचे आश्वासन दिले.

संध्याकाळी तमारा खरोखरच आली. तिच्या हातातील वस्तू पाहून मी चकित झालो. एका हातातील पिशवीत गोठवलेली कोंबडी, लोण्याचे पाकीट व तवा होता. दुसऱ्या हातात केरसुणी व फरशी पुसण्याचा ब्रश होता.

"मी पटकन कोंबडी फ्राय बनवते." ती म्हणाली. "आज आपण घरातच जेवू." त्यानंतर तिने भराभर केर काढायला आरंभ केला. मी कौतुकमिश्रित आनंदाने पाहत होतो. जेवणाच्या जोडीला अर्थात कन्याक होती. नव्या घरातील माझे ते पहिले जेवण होते. माझ्याकडे टी. व्ही. नव्हता. रेडिओ नव्हता.

जेवणानंतर मी तमाराला रशियनमध्ये म्हणालो, "या खचु तिब्या." म्हणजे 'तू मला हवीस.' त्यावर हसून ती म्हणाली, "इतक्या लौकर !" मग मी, "आयुष्य तसं आहे." ती उत्तरली, "तसं असेल तर ठीक आहे."

त्या रात्री तमाराने मला सांगितले, "मी तुझीच होईन. मला जप. गर्भपात शक्यतो टाळू या. तू मला आवडलास." मी तिला म्हणालो, "तू अर्थातच मला आवडलीस. मी तुला खूप जपीन. मुलांची जबाबदारी मलाही नको. कारण तुला एक मुलगी आहे आणि मलाही एक मुलगी आहे. आपण एकमेकांच्या संगतीत छान राहू." तमारा माझ्यापेक्षा तीन वर्षांनी मोठी होती. ती मॉस्कोवासी होती. म्हणून मी निश्चिंत झालो, पण घराची किल्ली देण्याची घाई मी केली नाही. तसा मी सावध वागत होतो. ल्येना वगैरे कोवळ्या वयाच्या मुली गळ्यात पडण्याचा प्रयत्न करीत होत्या. हे मी पाहत होतो. घाई करण्याचा प्रश्न नव्हता.

हळूहळू तमाराशी मैत्री वाढत होती. एका संध्याकाळी मस्क्वा नदीच्या तरंगत्या रेस्तराँला दाखवायला ती मला घेऊन गेली. त्या रेस्तराँमध्ये जिप्सी गायक व वादक होते. रशियन माणसे संध्याकाळी केवळ खाण्यासाठी जात नाहीत, तर थोडेसे मद्य प्यावे व संगीताचा आस्वाद घ्यावा आणि भरपूर नाचावे एवढ्यासाठी रेस्तराँत जातात. ह्या प्रकारात तीन-चार तास सहज जातात. म्हणून पूर्वी मला एकट्याला कंटाळा यायचा. आता तमाराच्या संगतीत वेळ भुर्ररदिशी जायचा.

जिप्सी वेटरने आणलेला मासा ताजा नव्हता. त्याची व तमाराची एकदम बाचाबाची झाली. वेटरने तिचे मनगट पकडले व अपशब्द उच्चारले. माझे डोके तापले. मी ताडकन उठलो. तेवढ्यात सुव्यवस्था राखणारे द्रुझनिकी धावले. दंडाला लाल पट्टी बांधलेले 'द्रुझनिकी' संध्याकाळच्या वेळांना एका गटाने फिरतात. ते पोलिस नव्हेत. एखाद्या कचेरीतील वा कारखान्यातील कर्मचारी वा कामगार असतात. तीन-चार तास गस्त घातल्याबद्दल त्यांना सुटीचा एखादा दिवस जास्त मिळतो म्हणे. थोड्या तणातणीनंतर काही न खाताच बिलाचे पैसे

फेकून मी तमारासह रेस्तराँबाहेर पडलो. नाही तर त्यांनी तिला अटक केली असती. ती वेश्या आहे असा वेटरने आरोप केला होता. नंतर नंतर ध्यानात आले की, चांगल्या स्त्रियांना रेस्तराँमध्ये संध्याकाळचे जाणे इष्ट नव्हते.

घडलेल्या प्रकाराला न्याय मिळावा असे डोक्यात बसले होते. ईगरला फोन करून मी त्याला हकीकत सांगितली. त्यानेही अकुलोवना सांगितले. मग अकुलोवनी ईगरला माझ्या सांगाती रेस्तराँच्या मॅनेजरकडे धाडले. मॅनेजरला ईगरने जाब विचारला. मग मॅनेजर गयावया करू लागला. त्याने बिलाचे पैसे परत दिले. शिवाय लाच म्हणून कन्याकचे दोन छोटे चषक मागवले. त्याने माफी मागितल्यानंतर माझे समाधान झाले. कन्याक न पिता, पैसे परत घेऊन आम्ही तेथून बाहेर पडलो. खरे म्हणजे तमारालाच बरोबर न्यायची माझी इच्छा होती, पण घाबरून ती आली नाही. नंतर अकुलोवनी मला समजून सांगितले, "अशा स्थळी जाणं शक्यतो टाळ. त्यापेक्षा कुठंही संघर्ष करू नको." बंदिस्त जीवनाची एक झलक मिळाली. परदेशी माणसाबरोबर फिरणारी स्त्री म्हणजे बदचाल असा लोकांमध्ये समज होता. आली पंचाईत !

तमारा देखणी होती. सोनेरी केशसंभार, सरळ, नाजूक नासिका, राखी, पारदर्शी डोळे, प्रमाणबद्ध बांधा. तिच्याबरोबर वावरताना छान वाटायचे. बॉल डान्समध्ये किंवा जिप्सी नृत्यात ती पटाईत होती. तिच्या मदतीने मी कॉकेशिअन जिप्सी नाच शिकलो. वॉल्तझ मात्र मला जमायचा नाही. गिरक्या घेताना चक्कर यायची.

हळूहळू तिने तिच्या घरी मला नेले. मग आईची व मुलीची ओळख करून दिली. मॉस्कोच्या नवोगिरीयेवा विभागात तिचे अपार्टमेंट होते. फोन व फर्निचरसह सुसज्ज होते. तिला नीटनेटके राहायची आवड दिसली. कपड्यांचा तिला भारी षौक. तऱ्हेतऱ्हेचे बूट किंवा सँडल वापरायची. स्वयंपाक झटपट बनवायची. मूळ स्वभावाने जीवनप्रेमी, आनंदी होती. माझी मद्यासक्ती पाहून नव्या अर्बातमधील एका तळघरातील 'झिगुली' नावाचा बिअर बार तिने मला दाखविला. बिअरच्या खूप मोठ्या मगमधून बिअर प्यायची आणि बशीभर उकडलेले झिंगे सोलून खायचे असा तेथे रिवाज होता.

सप्टेंबरमधील कोवळ्या उन्हाच्या मोसमाला रशियामध्ये 'बाबे लेता' असे म्हणतात. म्हणजे बायकांचा उन्हाळा. हा काळ उन्हाळयाच्या अखेरी व

शरदाच्या आरंभापूर्वी असतो. फार रम्य हवा असते. तमाराच्या घराजवळ काही अंतरावर जिप्सी तळी होती. त्या तळ्यांपाशी पॉपलर वृक्षांची मोठी राई होती. तमारा मूळची निसर्गप्रेमी. झाडांमधून बागडत पक्ष्यांबरोबर बोलायची. कुत्री व मांजरे यांच्याशी एकतर्फी गप्पा मारायला तिला आवडायचे. तमारा या नावाचा अर्थ मानी ताठ ताम्र वृक्ष. कॉकेशसमधल्या जॉर्जिया राज्यात तमारा नावाची एक सुंदर राणी होऊन गेली. शोता रूस्तावेली हा तिचा प्रधान होता. शोता फार मोठा कवी होता, तमाराचा प्रेमिक होता. तमारा-शोताची जोडी फार प्रसिद्ध आहे. माझी तमारा खरोखर राणीसारखी सुंदर, डौलदार वागायची, पण मला मात्र काव्याचे वावडे. कविता वाचायचा मला कंटाळा. कवितेचा अनुवाद करणे तर दूरच. 'प्रगती' मध्ये कवितेच्या अनुवादाबाबत मी आधीच हात वर केले होते. कारण रशियन लोकांना काव्यासंबंधी विलक्षण ममत्व. पूष्कीन, लेर्मेन्तोव, येसेनिन, ब्लोक हे रशियन कवी अनेकांना मुखोद्‌गत असतात. नव्या पिढीतील येवगेनी येवतुशेन्को अनेक तरुणींचा प्यारा आहे.

एका दुपारी जिप्सी तळ्यापासच्या राईत तमाराने मला सांगाती नेले. राईच्या मध्यभागी जमिनीत एक छोटा खळगा ती खणू लागली. त्यावर तिने काटक्या पसरल्या. जाळ पेटवला. काड्यांवर टोचलेले मांसाचे तुकडे भाजायला आरंभ केला. या उद्योगाला शाश्लिक बनविणे असे म्हणतात. बरोबर नेलेल्या वोदकाच्या घोटांबरोबर शाश्लिक छान चवदार लागले. मग तमारा गाऊ लागली. "योल्की पाल्की लेस गुस्तोय, खोदित अनिल खलस्तोय." ह्या गाण्याचा अनुवाद सांगण्यात मजा नाही. "झाडांनी गर्द राई छान फुललीय ...... बिचारा ब्रह्मचारी अनिल एकटा फिरतोय..." वगैरे.

तमाराबरोबरचे प्रणयाराधन खूप रंगात चालू असताना शरदाच्या पानगळीनंतर पहिला हिमवर्षाव झाला. रशियाचा निसर्ग वारंवार रूपे बदलतो. उन्हाळ्यातील हिरवीगार पालवी हळूहळू तांबूस पिवळी बनते. मग शुभ्र बर्फाच्या पार्श्वभूमीवर झाडांच्या तुरकाट्या दिसतात. पहिल्या हिमवर्षावाच्या अपूर्वाईने मी तीन-चार तास पायी फिरलो. अर्थातच त्या उनाडक्या बाधल्या.

मला किंचित सर्दी झाली. मग तमाराने माझ्यावर रशियन उपचार चालू केले. टबात गरम पाणी भरले. त्या पाण्यात मोहरीच्या पेस्टचा लगदा मिसळला आणि मला त्या पाण्यात बसविले. चांगली खसखसून मला आंघोळ घातली.

नंतर काळ्या चहाबरोबर रानफळांचा मुरंबा खायला दिला. चांगला घाम आल्यानंतर उबदार बिछान्यात झोपविले. पांढऱ्या स्वच्छ चादरींच्या बिछान्यात झोपायला छान वाटले. शिवाय पांढऱ्या खोळीत घातलेली मऊ मऊ दुलई पांघरली. नंतर जेवणापूर्वी शंभर ग्राम वोदका प्यायला दिली. रशियात वोदकाचे विविध उपयोग करतात. पाठ वा पाय दुखत असताना दुखऱ्या भागावर वोदका चोळतात. वोदकाचा अँटीसेप्टिक म्हणूनही वापर करतात. शिवाय मद्य म्हणून वोदका पितात. गहू, तांदूळ, साखरकंद, बटाटे यांच्यापासून वोदका बनवतात. रशियन माणसे ती तशीच कोरी पितात. वोदकाच्या घोटामागोमाग मिनरल पाण्याचा घोट घेतात. काही लोक काळा पाव हुंगतात. त्यामुळे वोदका चढत नाही म्हणे. रशियन घरात पाहुण्यासमोर पाव, सॉसेज इत्यादी खाद्यपदार्थांबरोबर वोदकाची बाटली व चषक ठेवतात. अस्सल पिणारा माणूस बाटली संपल्याविना टेबलापासून उठत नाही. मद्याचे व्यसन सबंध देशाला आहे.

शरदाच्या पावसात भिजल्यानंतर तमाराने माझ्यावर असेच उपचार केले. मात्र त्या वेळी आंघोळीपूर्वी भोजाच्या फांद्यांनी माझ्या अंगावर फटके मारले. सौनामध्ये मसाजपूर्वी अशा फांद्या मारतात. त्यामुळे शरीरात रक्ताभिसरण चांगले होते.

अशा सरबराईने माझी प्रकृती सुधारली. मला बाळसे चढले. घराला घरपण लाभले. आमचे सहजीवन छान सुरू झाले. त्यापूर्वी मी वादिमला म्हटले, "तुमच्या देशात मी काम करायला आलोय. तुमचे कायदे मोडायची माझी इच्छा नाही. कायदेशीर लग्न न करता मी आणि तमारा एकत्र राहिलो तर काही हरकत आहे ?" वादिम हसून म्हणाला, "खुशाल रहा. अशा जोडप्यांना आमच्याकडे नागरी नवरा-बायको म्हणतात. जर दोघं खूष असतील, तर दुसऱ्यांचा काय संबंध ? परदेशी माणसाला इथं लग्न करायला खूप कटकटी असतात. त्यापेक्षा तू तसाच सुखानं रहा." एवढा खुलासा मला पुरेसा होता. मलाही लग्न करण्याची तातडी नव्हती.

शनिवार-रविवार ह्या सुटीच्या दिवशी ईगर आमच्याकडे जेवायला यायचा. दर वेळी एका नव्या मैत्रिणीला घेऊन यायचा. त्याची दोन लग्ने झाली होती. दोन घटस्फोट झाल्यानंतर नवनव्या मैत्रिणींबरोबर फिरायचा. दाढी वाढविल्यानंतर ईगर चेखोवच्या नाटकांमधल्या व्यक्तिरेखेप्रमाणे दिसतो. सौम्य

वागणाऱ्या ईगरला तरुणी फार आवडायच्या, पण योग्य साथीदारणीच्या निवडीत दर वेळी तो अपेशी ठरायचा. आमचे 'यूथ रिव्ह्यू' मधले लेखन चालू होते.

ऑक्टोबर क्रांतीचा वर्धापन दिन जवळ येत होता. १९१७ साली लेनिनग्रादमध्ये ज्या स्थळी क्रांती घडली, त्या स्थळांना प्रत्यक्ष भेट द्यावी असे मला वाटले. 'यूथ रिव्ह्यू' व 'मनोहर' साठी लेखांचा विषय ठरला. ईगरला माझी कल्पना पसंत पडली. त्याने वरिष्ठांना ती कल्पना सांगितली. 'नोवोस्ती'ने माझा लेनिनग्रादचा चार दिवसांचा दौरा मंजूर केला. ईगरने आगगाडीची तिकिटे व हॉटेलमधली खोली वगैरेंची व्यवस्था आधी केली. माझ्या व त्याच्या खर्चाची सोय झाली. म्हणून तमाराला व इरीना नावाच्या ईगरच्या मैत्रिणीला बरोबर न्यायचे असे ईगरने व मी ठरविले. अर्थात आमच्या मैत्रिणींचा खर्च आम्ही सोसणार होतो. रशियन क्रांतीचा पाळणा म्हणून ओळखल्या जाणाऱ्या लेनिनग्रादला ऐन क्रांतिदिनाच्या सुमाराला पाहण्याचा योग जमणार होता.

आमच्या आयुष्यात एखादी गोष्ट सहज घडत नाही. सोविएत संघात परदेशी माणसाच्या संचारस्वातंत्र्यावर फार बंधने आहेत. प्रत्येक शहरासाठी व्हिसा घ्यावा लागतो. मग त्यासाठी आधी अर्ज-विनंत्या करा. मनात आले तर सूटकेस घेऊन ताडकन पुण्याहून मुंबईला जायची आपली सवय, पण तेथे तसे नाही. आमच्यासाठी तशी व्यवस्था करणारा वादिमचा विदेश विभाग होता. तीन-चार दिवसांत वादिमने लेनिनग्रादचा व्हिसा मिळवून दिला. भारतीय पासपोर्टवरील जो तपशील होता, त्याची रशियनमध्ये नक्कल लिहिलेली एक निळी पुस्तिका आमच्या ऑफिसने मला दिली होती. मॉस्कोत राहण्याचा तो परवाना होता. आतील एका कोऱ्या पानावर शिक्क्यावर लेनिनग्रादचा परवाना होता. तेथील पोलिस खाते असे शिक्के देते. तुम्ही ज्या मुदतीत दुसऱ्या शहरात राहणार असाल त्या मुदतीचा व शहराच्या नावाचा उल्लेख शिक्क्यावर केलेला असतो. ह्या परवान्याविना आगगाडीचे वा विमानाचे तिकीट मिळत नाही. हॉटेलात खोली मिळत नाही. दर पावलाला डॉक्युमेंट विचारला जायचा. प्रथम प्रथम हा मामला त्रासदायक वाटला. पुढे सवय झाली. परदेशी माणसाला दुसऱ्या शहरात कुणा सोविएत नागरिकाच्या घरी पोलिसांच्या पूर्व परवानगीविना राहता येत नाही. म्हणून हॉटेलातच राहावे लागते.

ईगर, वादिमच्या मदतीने प्रवासाची व्यवस्था झटपट झाली. मॉस्कोपासून लेनिनग्राद उत्तर दिशेला ६०० कि. मी. अंतरावर आहे. 'लाल बाण' नावाच्या अतिवेगवान आणि आरामशीर डब्यांच्या आगगाडीची तिकिटे ईगरने पैदा केली होती. सर्वसामान्य नागरिकांना या गाडीची तिकिटे सहज मिळत नाहीत. रात्री अकरा वाजता 'लाल बाण'च्या सुंदर कूपेमध्ये मी तमारासह बसलो. ईगर पाठोपाठ येणाऱ्या दुसऱ्या आगगाडीत त्याच्या मैत्रिणीसह बसला. मॉस्कोबाहेर प्रवासाला जाण्याची माझी पहिली खेप. अवघ्या चार महिन्यांच्या अवधीत मी हे साध्य केले होते.

*

# लेनिनग्राद

सहा-सात तासांच्या प्रवासानंतर लेनिनग्रादमध्ये आम्ही पोहोचलो. ॲस्टोरिया हॉटेलात राहण्याची व्यवस्था होती. ईगरने माझ्यासाठी स्वीट राखला होता. त्याच्यासाठी तसाच स्वीट. आमच्या मैत्रिणींसाठी साध्या खोल्या होत्या.

मी परदेशी असल्याबद्दल एक नवी भानगड उद्‌भवली. माझ्या स्वीटचे भाडे होते दिवसाला ३५ रूबल्स. पण ईगरसाठी फक्त ६ रूबल. मैत्रिणींच्या खोल्यांना जेमतेम ४ रूबल होते. म्हणजे मी परदेशी असण्याचा भुर्दंड होता. मला हे नवीनच होते. ईगरलासुद्धा नवीन होते. मुकाटपणे त्याने आमची नावे नोंदवली. आजच्या काळाच्या मानाने त्या वेळी हॉटेलच्या खोल्यांचे भाडे खूप स्वस्त होते. आजघटकेला सोविएत संघात परदेशी माणसाला एका साध्या खोलीचे रोज शंभर डॉलर द्यावे लागतात. तेव्हा महागाई किती प्रमाणात वाढली आहे पहा. सध्या परदेशी माणसाकडून रूबल हे चलन घेतच नाहीत.

'ॲस्टोरिया' हॉटेलला ऐतिहासिक महत्त्व होते. ह्या हॉटेलात रशियन कवी येसेनिन ह्याने म्हणे आत्महत्या केली होती. त्याच्या स्मृत्यर्थ त्याच्या एका गीताची धून रोजच्या रोज रेस्तराँचा बॅंड वाजवत होता. दुसऱ्या महायुद्धात लेनिनग्राद जेव्हा काबीज होईल तेव्हा ॲस्टोरियात एक मोठी पार्टी करण्याचा हिटलरचा म्हणे इरादा होता.

लेनिनग्राद ह्या ऐतिहासिक शहराचे मूळ नाव पीटरबुर्ग होते. नंतर पेत्रोग्राद. क्रांतीनंतर लेनिनग्राद. तेव्हा शहरांची नावे बदलण्याची प्रथा

आपल्याप्रमाणेच रशियात आहे. दुसऱ्या महायुद्धात लेनिनग्रादला हिटलरी फौजांनी नऊशे दिवस वेढा घातला. सोविएत फौजांनी मोठ्या शर्थीने शहर लढविले. त्या काळात अगणित मनुष्यहानी आणि वित्तहानी झाली. शेवटी लेनिनग्राद शरण आले नाही. धारातीर्थी पडलेल्यांचे दफन पिस्कारोवस्कोये दफनभूमीत केले. एकेक थडगे पाच पाच हजार लोकांचे सामुदायिक आहे. मानवसंहाराची आकडेवारी ऐकून अंगावर काटा उभा राहतो. उद्ध्वस्त झालेल्या ऐतिहासिक इमारतींचा जीर्णोद्धार पाहिल्यानंतर मन थक्क होते. आमच्या गाईड मुलीला मी विचारले, "तुम्ही झारशाही केव्हाच नष्ट केली. मग तिची आठवण देणाऱ्या वास्तूंचा जीर्णोद्धार का केला ?" त्यावर ती उत्तरली, "आमचं आमच्या इतिहासाशी वैर नाही. भावी काळात असे राजवाडे उभारणं शक्य नाही. तेव्हा गतवैभवाची साक्ष देणाऱ्या वास्तूंना नव्या पिढ्यांनी पाहिलं पाहिजे असं आमच्या नेत्यांना वाटतं." तिच्या ह्या उत्तराने माझे समाधान झाले नाही.

हेमंत प्रासादातील हर्मिताज म्युझियम पाहताना पाय शिणले. शिवाय मला चित्रकलेमध्ये काही समजत नाही. म्युझियम पाहण्याची मला हौस नाही. जिवंत माणसांना भेटण्यात जास्त मौज असते, पण ईगरखातर मी फिरत होतो. रशियन साम्राज्य सतराव्या शतकापासून किती वैभवशाली होते ह्याची वेगवेगळे प्रासाद पाहून कल्पना आली. चर्चमधील सोन्याने मढवलेल्या वेदी पाहून आश्चर्य वाटले. क्रांतीच्या वेळी धर्मस्थानांचा विध्वंस घडला नाही.

एक आश्चर्य आहे. सेंट आयझॅक कॅथेड्रलची वास्तू युद्धकाळात शाबूत राहिली. बॉंबवर्षावांमध्ये, तोफांच्या भडिमारामध्ये हे कॅथेड्रल सुरक्षित राहिले. फक्त त्याच्या खांबांचे काही ठिकाणी कपचे गेलेत.

ढगाळ, सर्द हवेत लेनिनग्रादमधून तीन दिवसपर्यंत फिरत होतो. लेनिनग्राद विद्यापीठाच्या प्राच्य विद्याविभागात मराठी भाषा शिकविणाऱ्या मादाम कतेनिना यांना भेटलो. त्यांच्याबद्दल पूर्वी आचार्य अत्र्यांनी एका लेखात लिहिले होते. कात्यायनी असा उल्लेख होता, पण कतेनिना फक्त इंग्रजीतून बोलत होत्या. मराठी बोलू शकत नव्हत्या. मला आश्चर्य वाटले. ध्वनीशिवाय भाषा कशी शिकवणार ? कशी शिकणार ? त्यांचेच विद्यार्थी पुढे 'प्रगती' प्रकाशन' मध्ये काम करायला आले. त्यांनाही मराठी बोलता येत नव्हते, पण व्याकरण पक्के

होते.

मराठी जाणणाऱ्या आणखी एका रशियन महिलेची भेट झाली. नीना क्रास्नोदेम्बस्काया. या बाईंनी आणखी काही वर्षांनंतर अरुण साधूंच्या 'मुंबई दिनांक'चा रशियन अनुवाद केला. 'द्येन बाम्बेया' हे त्याचे नाव. 'प्रगती प्रकाशना'ने हे पुस्तक छापले. पहिल्या आवृत्तीच्या ३० हजार प्रती होत्या एवढे मला आठवते. मराठी पुस्तकाचा रशियनमध्ये पद्धतशीर अनुवाद हा प्रथमच घडला. सोविएत विज्ञान प्रबोधिनीच्या प्राच्य विद्या संस्थेने छापलेल्या प्रातिनिधिक कथासंग्रहांमध्ये अरविंद गोखले, व्यंकटेश माडगूळकर यांच्या काही कथांचे सामान्य अनुवाद झालेत, पण क्रास्नोदेम्बस्कायांचा अनुवाद छान झाला. अनुवादाबाबत सोविएत संघात एक वैशिष्ट्य आहे. ज्या माणसाची जी मातृभाषा असते फक्त त्याच्याकडूनच त्या भाषेतील दुसऱ्या भाषेतून अनुवाद करून घेतात. म्हणजे मराठी अनुवाद फक्त मराठी माणसाकडून. मराठी जाणणाऱ्या रशियन व्यक्तीकडून फक्त रशियन अनुवाद स्वीकारतात, मराठी अनुवाद नव्हे. मराठी चांगले जाणणारे फार कमी रशियन लोक आहेत. माझी संपादिका तात्याना वेर्बित्सस्काया हिने कथांचा अनुवाद करण्याचे फुटकळ प्रयत्न केले. व्लादीमीर लाम्शूकोव या गृहस्थाला मराठी वाङ्मयाचा इतिहास तोंडपाठ आहे. खरा अभ्यासू माणूस आहे, पण पुढे पुढे करण्याचा त्याचा स्वभाव नाही. म्हणून इरा लेबेदेवा, इरा ग्लूश्कोवा या रशियन महिला मराठीच्या तुटपुंज्या ज्ञानावरसुद्धा पुणे-मुंबईत प्रसिद्ध बनल्या. खूप कष्ट करून मराठीवर प्रभुत्व साध्य करणारी मॉस्कोची तात्याना पेचनिकोवा ही रशियन तरुणी—रशियन बाल रंगभूमीवरच्या 'रामायण' नाटकात रामाची भूमिका करणाऱ्या गेन्नादी पेचनिकोव या नटाची ही मुलगी. तात्यानाला इंग्रजी व मराठी या भाषा उत्तम येतात. ती सध्या 'प्रगती' प्रकाशनात मराठी विभागात संपादिका आहे.

लेनिनग्रादचा धागा इथे परत जोडतो. क्रांतीचा पहिला इशारा देणाऱ्या 'आवरोरा' युद्धनौकेला आम्ही भेट दिली. 'आवरोरा'ला म्युझियमचे रूप देण्यात आले आहे. शिवाय क्रांतीचे मुख्य ठाणे स्मोल्नी पाहिले. एका संध्याकाळी कीरोव थिएटरमध्ये 'दॉन कीखोत' बॅले नाट्याचा देखणा प्रयोग पाहिला. बॅले नाट्य ह्या कलाप्रकारात सोविएत कलाकारांनी जगात श्रेष्ठत्व सिद्ध केले आहे. आपल्याला बॅलेमधले बारकावे जरी समजत नसले तरी पाहायला प्रसन्न वाटते.

सोविएत संघात जेव्हा तुम्ही 'सरकारी पाहुणे' असता तेव्हा तुमची चंगळ असते. उत्तम हॉटेलांमध्ये उत्तम खोल्या मिळतात. रेस्तराँमध्ये छान जेवण मिळते. अर्थात सर्व्हिस तशीच उशिरा असते. थिएटरांमध्ये बॅलेच्या खेळांना उत्तम आसने मिळतात, पण जेव्हा तुम्ही फक्त एकटे हौशी प्रवासी म्हणून येता, तेव्हा मेलात ! दर पावलाला अडचणी पार कराव्या लागतात. पुढे पुढे हे कटू अनुभव अनेक वेळा मी अनुभवलेत.

पहिल्या तीन संध्याकाळी ईगरच्या लेनिनग्रादमधील मित्र-मैत्रिणींसमवेत आमच्या हॉटेलच्या रेस्तराँमध्ये भरपूर खाणे-पिणे व नाचणे घडले. सवयीनुसार मी काही खर्च केला. कारण हा कामाचा भाग नव्हता.

मॉस्कोला परत जाण्याचा दिवस उजाडला. तमारा आणि ईगरची मैत्रीण आदल्या दिवशीच मॉस्कोला निघून गेल्या होत्या. सकाळी दहा वाजता घाबऱ्याघुबऱ्या चेहऱ्याने ईगर माझ्यापाशी आला. हॉटेलचे भाडे देण्यासाठी पैसे कमी पडत होते. 'नोवोस्ती'ने अपुरे पैसे दिले होते. माझ्या 'जादा'भाड्याने घोटाळा केला होता. अर्थात मॉस्कोत गेल्यानंतर काही दिवसांनी तो निपटता आला असता. नोकरशाहीमध्ये असे नेहमी घडते,.पण त्याच क्षणाला सर्व पैसे भरायचे होते. माझ्यापासचे बरेच रूबल्स खर्च होऊन गेले होते. ईगर तर कंगाल. त्याने भराभरा मित्रांना व मैत्रिणींना फोन जोडले. एक बरे आहे की, सोविएत संघात स्थानिक टेलिफोन कॉल फुकट आहेत. तासभर घामाघूम अवस्था होती. शेवटी लारीसा फोनवर भेटली. तिने आम्हा दोघांना तिच्या घरी बोलावले. लारीसा एका संध्याकाळी आमच्याबरोबर जेवली, नाचली होती. तिला भारताबद्दल विलक्षण प्रेम वाटायचे. माझ्यासारखा भारतीय माणूस तिच्या घरी आला म्हणून तिने व तिच्या वडिलांनी अगत्यपूर्वक स्वागत केले. छानदार वाईन पाजली आणि चवदार जेवण दिले. आम्ही त्यांचा निरोप घेतला. रस्त्यावर येताच ईगरने 'हुश्श' केले. लारीसाने हळूच त्याच्यापाशी पैसे दिले होते. पुढे काही दिवसांनंतर ऑफिसातून पैसे मिळाल्यानंतर ईगरने तिला मनिऑर्डरमार्फत पैसे परत केले.

खरे म्हणजे लेनिनग्रादच्या श्वेतरात्री पाहायला पाहिजेत. बावीस जूनला सर्वांत मोठा दिवस असतो. त्याच्या आसपासच्या सुमाराला लेनिनग्रादमध्ये गेले पाहिजे. रात्री चक्क दिवसासारखा उजेड असतो. ह्या श्वेतरात्री पाहण्याचा

योग अद्याप आला नाही, पण उन्हाळ्याच्या मोसमात लेनिनग्रादला एकदा गेलो होतो. त्या वेळी भव्य प्रासादांच्या समोरील कारंजांचे सौंदर्य पाहायला मिळाले.

१९८२ च्या सुमाराला आमच्या प्रकाशनगृहाने आम्हा भारतीय अनुवादकांसाठी लेनिनग्रादची चार दिवसांची सहल आयोजित केली.

भारतीय अनुवादक आपल्या बायको-मुलांसह त्या सहलीला आले. या वेळी लेनिनग्रादमधील स्टेशनजवळच्या सामान्य दर्जाच्या हॉटेलात राहायची सोय केलेली होती. अशा हॉटेलांमध्ये सर्वसामान्य सोविएत नागरिक अत्यंत स्वस्तात राहतात. मात्र हॉटेल स्वच्छ होते.

या वेळी सोविएत-भारत सांस्कृतिक संघाच्या लेनिनग्राद शाखेने आमचा पाहुणचार केला. पीटरहॉफ येथील भव्य राजवाड्यासमोरच्या थुई थुई उडणाऱ्या कारंजांना पाहून डोळे धन्य झाले. रशियाला पश्चिमेची खिडकी उघडून देणाऱ्या झार पहिल्या प्योत्रने हे शहर त्या काळात सुंदर उभारले. पूष्कीन, गोगोल ह्या श्रेष्ठ रशियन साहित्यिकांच्या कलाकृतींमध्ये लेनिनग्राद अमर झाले आहे. लेनिनग्रादमधील पूल पाहण्यासारखे आहेत. विशेष म्हणजे रात्रीच्या वेळी पूल उचलतात तेव्हाचे दृश्य प्रेक्षणीय असते. लेनिनग्राद या शहराला स्वतःचा चेहरा आहे. इथली माणसे बुद्धिवादी भासतात. पूर्वीच्या पुण्याच्या माणसांसारखी. लेनिनग्राद आणि मुंबई यांच्यात भगिनी नगरीचे नाते आहे. म्हणून लेनिनग्रादमध्ये मुंबई रस्ता आहे.

सोविएत-भारत सांस्कृतिक समाजाने आयोजित केलेल्या परस्परओळखीच्या समारंभाला एका रशियन गृहस्थाने शुद्ध संस्कृतमधून भाषण केले. बाकीच्या लोकांनी स्वतःची ओळख करून दिली. आमचे बोलणे कुणी ऐकायलाच तयार नव्हते. मग आमची ओळख दूर. असे अनेक वेळा घडले.

लेनिनग्रादचे आकाश अगदी वेगळे दिसते. क्षितिज उत्तर ध्रुवाला टेकले असे भासते. नेवा नदीच्या तीरावर वसलेले लेनिनग्राद प्रेमात पडण्यासारखे शहर आहे.

*

## पहिला रशियन हिवाळा

पाहता पाहता हिवाळा जवळ येऊन ठेपला. नेपोलियन, हिटलर यांच्यासारख्या आक्रमकांचा चक्काचूर करणारा रशियन हिवाळा. सर्व जगाला रशियन हिवाळ्याबद्दल धास्ती वाटते.

हिवाळ्यापूर्वी शरदाचा मोसम अंशतः सुंदर असतो. 'झलतोय ओसिन' असे महाकवी अलेक्सांद्र पूष्कीनने त्याचे वर्णन केले आहे. म्हणजे 'सोनेरी शरद'. त्या वेळी झाडांची पालवी सोनेरी बनते. पाने आधी तांबूस बनतात. उन्हात झाडे पेटल्याचा भास होतो. मग सोनेरी होतात. त्यानंतर चावऱ्या वाऱ्यांसह थंड पाऊस पडतो. मैत्रिणीसह एका छत्रीतून पावसात फिरण्याचा रोमान्स इथे शक्य नाही. फ्ल्यू होण्याचा धोका असतो. फ्ल्यूला रशियनमध्ये 'ग्रीप' म्हणतात. रशियन फ्ल्यूची 'पकड' जबरदस्त असते. रशियन माणसे त्याला फार घाबरतात. जर तापानंतर पाठ वा पाय दुखरे राहतील, तर ते कायम दुखतात. ताप उतरल्यानंतर खूप जपून राहावे लागते. फ्ल्यू झालेल्या माणसाच्या समाचाराला सहसा कुणी जात नाही. संसर्गाची भीती असते. सहकुटुंब सहपरिवार आजारी माणसाला 'पाहायला' जाण्याची पीडादायी भारतीय प्रथा तेथे नाही.

तमाराकडून हळूहळू मला समजले की, प्रकाशन गृहाने मला नियमांपेक्षा जास्त क्षेत्रफळाचे अपार्टमेंट दिले होते. प्रत्यक्ष करारात एका माणसासाठी फक्त एका खोलीसह स्वयंपाकघराच्या अपार्टमेंटची तरतूद होती. इथे तर मला दोन खोल्यांसह स्वयंपाकघर होते. सुमारे २८चौरस मीटर क्षेत्रफळ होते. सोविएत

संघात स्वयंपाकघर, बाथरूम, संडास, बाल्कनी यांची एकूण क्षेत्रफळात मोजदाद करीत नाहीत. ह्या जागेचे भाडे मात्र किरकोळ होते. वीज, गॅस, चोवीस तास गरम पाणी यांचे सर्व मिळून महिना साडेआठ रूबल. ऑक्टोबर ते मे महिन्यापर्यंत सेंट्रल हीटिंग मोफत होते. नंतर फोन मिळाल्यावर त्याचे मासिक भाडे फक्त अडीच रूबल. स्थानिक कॉल फुकट. ऑपरेटरमार्फत मुंबईला कॉल केला तर दर मिनिटाला तीन रूबल. पण कॉल लागेपर्यंत दोन-दोन दिवसांचा अवधी लागायचा. तमाराच्या अपार्टमेंटमधला टेलिफोन दुसऱ्या अपार्टमेंटशी जोडलेला होता. अशा जोड-टेलिफोनचे मासिक भाडे प्रत्येकी दोन रूबल असते. मॉस्कोत राहण्यात ही जमेची बाजू होती. ऑफिसमार्फत जे फर्निचर पुरविले होते, त्याच्या एकूण किमतीच्या एक-दशांश वार्षिक भाडे आकारले जायचे. म्हणजे हजार रूबल किमतीच्या फर्निचरचे वार्षिक भाडे शंभर रूबल. तेसुद्धा तीन-तीन महिन्यांच्या चार हप्त्यांमध्ये. ही फार चांगली सोय होती. कारण सोविएत संघात फर्निचर खूप महाग आहे. शिवाय उपलब्धता अत्यंत कमी. कंत्राटी पद्धतीने काम करणारा माणूस फर्निचर विकत घेण्याचा नस्ता प्रपंच कशाला करील ? मला ही बाब खूप सोयीची वाटली.

आत्तापर्यंत इतर भारतीय अनुवादक गप्प बसले होते. कुणी विशेष बोलायचे नाही, घरी बोलवायचे नाही. हळूहळू हिंदीचे अनुवादक मदनलाल मधू, तामीळचे अनुवादक सोमसुंदरम, उर्दूचे अनुवादक हबीबसाहेब, बंगालीचे नोनी भौमिक यांच्या ओळखी झाल्या. हे सर्वजण १९५७च्या सुमाराला मॉस्कोत 'प्रगती' प्रकाशनात आले होते. मधू पूर्वी कॉलेजात प्राध्यापक होते. रेडिओवर काम करायचे. कविता करणे त्यांचा विशेष गुण. पण माणूस पक्का पंजाबी. गोड बोलून मतलब साधणारा. नोनी भौमिक बंगाली साहित्यात कथालेखक होते. त्यांच्याबद्दल चित्रपट-दिग्दर्शक मृणाल सेन यांनी गौरवोद्गार काढले. हबीबसाहेब फूटपाथवरच्या बर्फावरून पाय घसरून पडले. त्यानंतरच्या झालेल्या दुखण्याने वारले. सोमसुंदरम यांचा संस्कृतचा व्यासंग गाढा. त्यांना रशियन भाषा उत्तम यायची. मेंदूतून रक्तस्त्राव झाल्यानंतर तशाच बेशुद्धावस्थेत अपार्टमेंटमध्ये एकाकी वारले. त्यांना मी सोमशास्त्री म्हणायचा.

मॉस्को रेडिओवर हिंदीचे निवेदक के. के. सिंग यांचा आवाज खरोखर सुंदर आहे. बाकी इतर निवेदकांचे आवाज भयानक आहेत. प्रकाशन गृहातील

अनुवादक व रेडिओवरील निवेदक यांचा मिळून हिंदुस्थानी समाज स्थापन झाला. त्यात सर्वांच्या आपापसात लाथाळ्या चालतात. समाजाच्या पदाधिकाऱ्याच्या जागा प्राप्त करण्यासाठी स्पर्धा चालते. त्याचे कारण भारतीय दूतावासात महत्त्व मिळते. पण समाजाचे कार्य शून्य. करार संपवून जाणाऱ्या अनुवादकाला वा निवेदकाला निरोप समारंभ आयोजित केला जायचा. रेस्तरॉंत रात्रीचा भोजन समारंभ व्हायचा. त्या वेळी कंटाळवाण्या भाषणांची शिक्षा सोसायला लागायची. दारू प्यायल्यानंतर एकेकाचे तारे तुटायचे !

हिवाळ्यात एका संध्याकाळी माझी फजिती झाली. ऑफिसातून पगार घेऊन मी आणि तमारा घरी निघालो होतो. लोकांची गर्दी खच्चून झाली होती. मला गर्दीचे प्रथमपासून वावडे. मग मेत्रोमधून न जाता टॅक्सी करायची. त्या दिवशी टॅक्सी लवकर मिळेना. या धांदलीत थंडीमुळे माझे हात-पाय बधिर झाले. काही सुचेना. शेवटी तमाराने एका घराच्या आडोशाला मला पटकन नेले. माझे दोन्ही हात पकडून स्वतःच्या ब्लाऊजमध्ये खुपसून स्तनांवर धरले. स्तनांच्या ऊबेने हातांचा बधिरपणा कमी झाला. मग घरी आल्यानंतर नळाच्या गरम पाण्याने हात-पाय धुतले. त्या वेळी खूप वेदना झाल्या. ठणा ठणा बोंबललो. योग्य हातमोजे आणि फरचे बूट वापरले पाहिजेत. दोन्ही वस्तूंचा मॉस्कोत कायम तुटवडा. हिवाळ्याची तयारी उन्हाळ्यात सुरू करा असे लोक म्हणायचे. हे व्यावहारिक शहाणपण पहिल्याच वर्षी कसे येणार ? पहिल्या हिवाळ्यात हाल झाले. माझे हात नेहमी गारठतात.

त्यात आणखी वाईट म्हणजे अनुवादासाठी लेनिन यांचे 'काय केले पाहिजे' हे पुस्तक देण्यात आले. लेनिन राजकीय पुढारी म्हणून थोर असतील, पण ते चांगले लेखक नाहीत. मार्क्स, एंगल्स, लेनिन यांच्यात एंगल्स सर्वांत जास्त चांगले लेखक आहेत. राजकीय पुस्तकांचा अनुवाद करण्यात मला रस नव्हता. पण इलाज नव्हता. राजकीय प्रचार हा रशियन सरकारचा मूळ उद्देश होता. पुढे ललित साहित्य मिळावे म्हणून प्रथम राजकीय पुस्तकांचा अनुवाद करावा लागणार होता. नावडत्या पुस्तकाचा अनुवाद करताना मनाला क्लेश व्हायचे. एक प्रकारचे ते आजारपणच. रशियन श्रेष्ठ अभिजात साहित्यकृतींचा अनुवाद मिळविण्यासाठी आधी ही एक प्रकारची तपश्चर्या होती. राजकीय पुस्तकांचे वाळवंट तुडवल्यानंतर ललित साहित्याची हिरवळ भेटणार होती.

पेन्शनर ग्लादीशेव यांनी संपादन करताना माझा शब्द न् शब्द तपासला. अनुवाद तपासल्यानंतर हस्तलिखित छापखान्यात पाठवत. त्यापूर्वी रशियन संपादक बारीक छाननी करायचे. मूळ भाषेचे तोटके ज्ञान असल्यामुळे त्यांना काही शब्द समजत नसत. प्रश्न विचारून विचारून शंकानिरसन करून घेत. ग्लादीशेव जुन्या पठडीतले होते, पण प्रामाणिकपणे बसून काम करायचे. नंतरचे माझे संपादक थातुर मातुर काम करीत. माझी रात्रीची झोप उडाली. बाहेर बर्फामुळे फिरणे कमी झाले. तमाराने दारांच्या व खिडक्यांच्या फटींमध्ये कापूस बसवला. हा एक मोठा उद्योग दरवर्षी असतो. हिवाळ्यापूर्वी दारे-खिडक्या गच्च बंद करायची. जर बारीकशी फट राहिली, तर थंड चावरे वारे घरात घुसते. सर्वसाधारणपणे घरात अठरा अंश सेंटीग्रेड तपमान राखायचे. पण दिवसातून एकदा तरी घराबाहेर मोकळ्या हवेत फिरायला जायचेच असा दंडक आहे. घरातील व ऑफिसातील कोंदूस वातावरणाने अनेकांना डोकेदुखीचा त्रास होतो. त्यातच कुणी धूम्रपान केले तर घरभर तंबाखूचा वास. हिवाळ्यासाठी खिडक्यांवर दोन-दोन प्रकारचे पडदे लावतात. त्यामुळे घरात ऊब राहते. वेळच्या वेळी खाल्ले मात्र पाहिजे. भूक लागल्यानंतर थंडी जास्त वाजते. मांसाहार चांगला ठरतो. पुरुष सोडून मी सर्व काही खात असल्यामुळे प्रश्न नव्हता. बैल, डुक्कर यांचे मांस सर्रास खात होतो. कोंबडी तर नेहमीची. शाकाहारी लोकांची हिवाळ्यात फार पंचाईत. बटाट्याशिवाय दुसरा पदार्थ मिळणार नाही. रशियन घरांमध्ये तऱ्हेतऱ्हेची सूपस् चवदार असतात. दुपारच्या जेवणाला सूप घ्यायचेच. पोटाला ते हितकर असते. संध्याकाळी मात्र सूप घेत नाहीत. माणसाने खावे कसे याबाबत एक रशियन म्हण आहे : 'न्याहरी एकट्यानं खायची. दुपारचं जेवण मित्राबरोबर खायचं. रात्रीचं जेवण शत्रूबरोबर.' म्हणजे न्याहरी भरपूर खा. दुपारी मित आहार घ्या. रात्री मात्र कमी खा. आरोग्य राखण्यासाठी असे खाणे चांगले ठरते. अर्थात सगळे नियम कुणी पाळत नाही. तमारा मात्र हा नियम कटाक्षाने पाळायची. प्रथम प्रथम तिला भात जमायचा नाही. मटण कटलेटबरोबर कोरडा भात खाताना माझी पंचाईत व्हायची. पण जिभेचे चोचले पुरवायला मी तिथे गेलो नव्हतो. खाण्यातील माझा रस केव्हाच गेला होता. पिण्यात रस होता. पण भारतीयांसारखा उगीच पोट जाळत नव्हतो. प्यायल्यानंतर लवकर वेळेवर खात होतो. पिण्याबरोबर शेव,

दाणे वगैरे कचरा खायची सवय कधीच नव्हती. रशियन माणसे दारू पिताना कटाक्षाने खातात. रिकाम्या पोटी पिणारा दारूडा ठरतो.

दिवसभर अनुवादाचे काम करीत मी सारखा घरातच असायचो. एका रविवारी तमाराने माझ्यासाठी घसरपट्ट्या आणल्या. त्यांच्याबरोबरचे खास बूट आणले. त्या सर्व जामानिम्यासह मला घराबाहेरच्या आवारात नेले आणि बर्फावर घसरपट्ट्यांसह चालणे शिकविले. शारीरिक मेहनतीचा मला सराव कमी. प्रथम चालणे जमेना. हातातील काठी आणि घसरपट्टी बांधलेले पाऊल यांचा सुमेळ साधेना. त्या उणे १० अंश सें. ग्रे. तपमानात मला घाम फुटला. तेवढ्यात कुठूनतरी एक भला मोठा अल्सेशिअन कुत्रा भुंकत धावत आला. कुत्र्याच्या बाबतीत मी तर 'लाखाची गोष्ट' चित्रपटातल्या नायकासारखा भित्रा. पाय घसरून मी उताणा पडलो. तशा अवस्थेत कुत्र्याचे मुस्कट अगदी माझ्या तोंडाशी आले. बाप रे ! धाबे दणाणले. 'स्कीईंग'चा उद्योग त्यानंतर मला कधी जमलाच नाही. सर्रकन घसरत जाणे फार अवघड. शिवाय बर्फावर पडताना हात टेकायचे नाहीत, ढुंगणावर पडायचे कसब रशियन लोकांना असते. आपण हात टेकतो म्हणून तर अनेक भारतीयांचे बर्फावर घसरून पडल्यावर हात मोडतात. उणे दहा ते पंधरा अंश सेंटीग्रेड तपमानात पुरेसे गरम कपडे असल्यास ठीक वाटते. शुभ्र, चुरचुरीत, कोरडा बर्फ छान वाटतो. पण उणे चार वा पाच अंश सें. ग्रे. मध्ये बुळबुळीत बर्फ फार धोकेबाज असतो. काही वेळा जमिनीचा वा रस्त्याचा पृष्ठभाग चक्क काचेसारखा बनतो. त्याच्यावरून चालणे मोठी कसोटी. रशियात माणसाने राहणे हीच मोठी परीक्षा आहे. उष्ण कटिबंधात राहणाऱ्या माणसांच्या दृष्टीने हे जीवन अत्यंत खडतर असते. घराबाहेर पडताना दर वेळी ओव्हरकोट, गरम अंतर्वस्त्रे, स्वेटर, केसाळ टोपी, केसाळ ओव्हरकोट, हातमोजे, फरबूट एवढा संरजाम घालायचा. जराशीही हयगय करायची नाही. सर्वांत जास्त पाय सांभाळायचे. पाय गरम राखायचे. थंडी पायांमार्फत वाजते. आपण ह्या गोष्टीला अगदी कंटाळून जातो. रशियन लोकांना ह्या गोष्टी जन्मतः अंगवळणी पडतात. वर्षातून किमान आठ महिने रस्त्यांवर बर्फ, पाणी, चिखल असतो. प्रत्येक मोसमाचा ओव्हरकोट, बूट वेगळा, टोपी वेगळी. प्रत्येक घराच्या दाराशी एक पायपुसणे असते. दाराच्या आत कॉरिडॉरजवळच दुसरे पायपुसणे असते. त्याच्यापाशी पादत्राणे काढायची. भिंतींवरच्या खुंट्यांवर ओव्हरकोट व

मु....७

टोप्या टांगायच्या. मग जवळच ठेवलेल्या सपाता पायांत घालायच्या. काही रशियन बायका दुसऱ्यांच्या घरी जाताना स्वतःच्या सपाता बरोबर घेऊन जातात. दुसऱ्यांच्या सपाता शक्यतो घालू नये असे म्हणतात. बाहेरचे बूट घालून घरात अजिबात फिरायचे नाही. नाटकाच्या किंवा सिनेमाच्या थिएटरवर गेले असताना अशीच थोडीफार कसरत करावी लागते. वॉर्डरोबपाशी ओव्हरकोट, टोपी, मफलर काढून द्यायचे. बायका तर गुडघ्यांपर्यंतचे बूट काढून देतात. मग बरोबर आणलेला सुंदर बूट पायात घालतात. रशियन माणसे नाटकाच्या थिएटरमध्ये खूप सजून नटून जातात. नाटक संपल्यानंतर कोट परत घेण्याचे काम कंटाळवाणे असते. लांबच लांब रांगांमध्ये उभे राहावे लागते. भाड्याची दुर्बीण जर आधी घेतली असेल तर वेगळी रांग असते. तेथे कोट लौकर मिळतात. जाणकार लोक मुद्दाम दुर्बीण भाड्याने घेतात. भाडे अगदी मामुली असते. पन्नास कोपेक. कार्यक्रम पत्रिका आवर्जून विकत घेतात. हा एक शिष्टाचार मानला जातो. म्हणजे हिवाळ्यात नाटकाला जाणे एक प्रकारची शिक्षाच.

नववर्षाचा दिवस उजाडला. सोविएत संघात ख्रिसमस साजरा होत नाही. युरोपात ख्रिसमसचे प्रस्थ फार मोठे. पण निधर्मी राज्यात ह्या सणाला फाटा देतात. धर्मश्रद्ध माणसे गुपचूप चर्चमध्ये जातात. नववर्षाचा दिवस मोठा दणक्यात साजरा करतात. तमाराने रशियन पद्धतीने हा दिवस उत्साहाने साजरा केला. या सुमाराला मॉस्कोतील बाजारांमध्ये फर वृक्षाच्या फांद्या विकत मिळतात. घरोघरी माणसे ह्या फांद्या विकत नेतात. शहराच्या वेगवेगळ्या प्रदेशांमध्ये सार्वजनिक फर वृक्ष सुंदर सजवतात. त्यांच्यावर विजेची रोषणाई होते. क्रेमलिनमधला फर वृक्ष सुंदर सजवतात. काँग्रेस प्रासादात शहरातील युवक-युवती एकत्र जमतात. सुंदर बॉलनृत्य करतात. जर ताजी फांदी नाही मिळाली तर कृत्रिम फर वृक्ष मिळतो. असे छोटे छोटे प्लॅस्टिकचे वृक्ष रंगीबेरंगी दिव्यांसह दुकानांमध्ये विकत मिळतात.

नववर्षाच्या जेवणावेळी घरातील सर्व माणसांनी एकत्र जेवायचे किंवा अगदी जवळच्या मित्र-मैत्रिणींना बोलवतात असा प्रघात आहे. रात्री बाराच्या ठोक्याला शँपेनची बाटली उघडतात. एकच जल्लोष होतो. दारू रात्रभर नदीसारखी वाहत असते. पांढरी, तांबडी वाईन, वोदका, कन्याक आणि अर्थातच शँपेन पितात. रशियन शँपेन फ्रेंच शँपेनच्या तोडीची असते. त्या मानाने रशियन

शँपेन खूप स्वस्त आहे. पूर्वी भारतात असताना शँपेनबद्दल खूप ऐकले होते. अजूनही आपल्याकडे शँपेनचे फार कौतुक आहे. खरं म्हणजे हे आंबट, फेसाळ, नाकाला गुदगुल्या करणारे पेय मला आवडले नाही. जॉर्जियन आणि आर्मेनियन कन्याक उत्तम असतात. फ्रेंच कन्याकचे उगीच स्तोम माजलेय.

नव्या वर्षानिमित्त तमाराची मुलगी तान्या आली. नववी-दहावीत शिकणारी ही मुलगी तावातावाने म्हणाली की, "सोल्झनित्सिन हा देशद्रोही आहे." सरकारी प्रचाराचा हा परिणाम होता, हे माझ्या ध्यानात आले. ईगर त्याच्या एका नव्या मैत्रिणीसह आला. एक गंमत होती. दर आठवड्याला नव्या मैत्रिणीसह आमच्याकडे जेवायला येणाऱ्या ईगरने स्वतःच्या किंवा एखाद्या मैत्रिणीच्या घरी आम्हाला जेवायला बोलावले नाही.

टेलिव्हिजनवर क्रेमलिनच्या घड्याळाने रात्रीचे बारा टोल दिल्यानंतर तमाराने एक छान कल्पना सुचवली. घराजवळच्या चर्चपलीकडील पॉपलर वृक्षांच्या राईत शुभ्र बर्फाच्या सान्निध्यात शँपेन प्यायची असे ती म्हणाली. तात्काळ सारेजण कोट-टोप्यांसह बाहेर निघालो. बाहेरचे तपमान उणे पंधरा अंश सेंटीग्रेड होते. राईमध्ये एका फर वृक्षाभोवती सर्वांनी फेर धरला. गाणी म्हटली. ईगरने फुलबाजा पेटवल्या. रशियनमध्ये त्यांना 'बेंगालस्की अग्नी' म्हणतात. मग शँपेनचे चषक फटाफट घशांमधून रिकामे झाले. ही नवलाई फार मौजेची होती. निसर्गाच्या सान्निध्यात थंड, नीरव वातावरणात मित्र-मैत्रिणींच्या संगतीत मद्यप्राशनाचा आनंद विलक्षण असतो.

मॉस्कोतील कचेऱ्यांमध्ये दुपारी बारापासूनच नवीन वर्ष साजरे करायला प्रारंभ करतात. प्रत्येक विभागातील माणसे एका टेबलावर खाद्यपदार्थ ठेवतात, बाटल्या ठेवतात. ऑफिसात दिवसाढवळ्या मद्यपान चालायचे. कर्मचाऱ्यांचे वाढदिवस, मे-दिन, क्रांती-दिन असे प्रसंग कचेऱ्यांमध्ये धूमधडाक्याने साजरे व्हायचे. त्यामुळे दुपारी दोनच्या सुमाराला मॉस्कोतील रस्त्यांवर धुंद डोळ्यांची माणसे आढळायची. सध्याच्या 'पिरीस्त्रोयका'च्या काळात ही प्रथा बंद झाली.

काही लोक मोठ्या रेस्तराँमध्ये नवीन वर्ष साजरे करतात. दहा-बारा लोकांचे गट एकत्र येतात. काही कचेऱ्या शंभर-शंभर माणसांसह जागा बुक करतात. असे बुकिंग एकेक महिना आधी करावे लागते. अर्बात, प्राग, युक्रेना, इन्टूरिस्ट, पेकिंग, मस्क्वा अशा मातबर रेस्तराँमध्ये जागा मिळणे मुश्कील

व्हायचे. गेल्या दोन-तीन वर्षांत दिल्ली रेस्तराँची नवीन भर पडली. दिल्ली रेस्तराँ भारत-सोविएत संयुक्त प्रकल्प आहे. तेथे भारतीय आचारी भारतीय खाद्यपदार्थ बनवतात. रेस्तराँत रूबल विभाग व हार्ड करन्सी विभाग आहेत. रूबल विभागात जागा मिळणे जवळजवळ अशक्य. करन्सी विभागात डॉलर, पौंड, मार्क वगैरे चलने स्वीकारतात. शिवाय भारतीय व्यापाऱ्यांना मिळणारे रुपयांचे ट्रॅव्हल चेक्स इथे वटतात. पण मामला खूप महाग असतो. एका रूबलला अठ्ठावीस रुपयांचा दर लावतात. तीन-चार माणसांनी दारूसह जेवण घेतले तर तीन-चार हजार रुपयांच्या घरात बिल येते. मॉस्कोत रेस्तराँमध्ये फक्त खाद्यपदार्थ खाल्ले तर बिल विशेष येत नाही. दारू पिणे फार महागात पडते. बिल तयार करताना वेटर मंडळी सफाईदारपणे फसवतात. गिचमिड अक्षरात बिल आणून देतात. भरपूर टीपची अर्थात अपेक्षा करतात.

नव्या वर्षाचा आनंद ओसरतो न ओसरतो तेवढ्यात दादांचे पत्र आले. मॉस्कोहून पाठवलेले पत्र दहा दिवसांत भारतात मिळते. पण भारतातून मॉस्कोला पाठवलेले पत्र दोन महिन्यांनंतर मिळते. गेल्या सोळा वर्षांत या क्रमात बदल नाही. यामागचे नेमके कारण समजत नाही. रशियात पत्रे सेन्सॉर होतात असा समज आहे. मला खरे वाटत नाही. दादांना अद्याप माझ्याकडून बँकेत पैसे मिळाले नव्हते. मला आश्चर्य वाटले. कराराप्रमाणे दरमहा ऐंशी रुबलचे भारतात रुपये पाठविले जात होते. रक्कम सुमारे नऊशे रुपये होती. त्यातील दोनशे जुईसाठी द्या आणि बाकीचे पैसे वापरा असे मी दादांना कळविले होते. म्हणून मी निश्चिंत होतो. मी मार्गोला याबद्दल सांगितले. ती मला अकाऊंट सेक्शनमध्ये घेऊन गेली. खरे तर दरमहा माझ्या पगारातून ऐंशी रूबल व तेरा टक्के आयकर कापला जात होता. अकाऊंट सेक्शनमध्ये फायलींची चाळवाचाळव झाली. खरोखर चार महिने भारतात पैसे पाठवले गेले नव्हते. हे काम करणारी पेन्शनर बाई आजारी होती म्हणे. सारा कारभार गुपचूप. मला संताप आवरेना. वरच्या स्वरात ताड ताड बोललो. अकाऊंट सेक्शनने चूक कबूल केली. पण उपयोग काय ? एका वेळी दोन महिन्यांपेक्षा जास्त रक्कम भारतात पाठविण्यास सोविएत सरकारच्या अर्थखात्याची परवानगी नव्हती. प्रकाशन गृह सरकारी प्रेस कमिटीच्या अखत्याराखाली होते. मार्गोसुद्धा गडबडली. शेवटी दोन महिन्यांचे भारतात पैसे पाठविले जातील व दोन

महिन्यांचे एकशे साठ रूबल ऑफिस मला परत करील असे ठरले. ह्यात अर्थ नव्हता. माझे रुपये बुडाले होते, माझी चूक नसताना. मूळचा माझा स्वभाव विलक्षण संतापी. त्याच क्षणाला करार मोडून भारतात परतावे असे वाटले. पण ते शक्य नव्हते. भारतातसुद्धा एकूण आनंद होता. परिस्थितीपायी हताश होऊन मी तडजोड मान्य केली. एका मोठ्या सरकारने आपल्या छोट्या माणसामार्फत मला फसवले होते. सोविएत नोकरशाहीचा पहिला फटका बसला. 'नोवोस्ती' मधील कारभार जास्त चांगला होता. प्रकाशन गृहाचा कारभार ढिसाळ होता. व्यवहारदृष्ट्या माझा तोटा झाला होता. मला एक हजारहून जास्त पगार होता. करार आधी वाचला नव्हता. माझी चूक होती.

माझ्याच वेळी हिंदीचे अनुवादक श्री. मूनीश सक्सेना मॉस्कोला येणार होते. पण तेव्हा ते आले नाहीत. दहा-बारा वर्षांनंतर आले. ते आले तेव्हा महिना एकशे ऐंशी रूबलचे रुपये भारतात पाठविले जात होते. शिवाय रूबलचा भाव खूप वाढला होता. १९७३ साली त्यांनी करार आधी वाचून काढला होता. व्यवहारदृष्ट्या ते शहाणे ठरले. मूनीश खूप काम करीत होते. त्यांचा वेग जबरदस्त होता. पण जेव्हा ते आले तेव्हा त्यांची प्रकृती खूप खालावलेली होती. जेमतेम तीन-चार वर्षे मॉस्कोत राहिले. अत्यंत आजारी अवस्थेत त्यांना भारतात पाठविण्यात आले. लौकरच ते वारले.

आता माझ्या अपार्टमेंटमध्ये फोन आला होता. एक दिवस 'नोवोस्ती'च्या अकाऊंट सेक्शनचा फोन आला. माझे म्हणे खूप पैसे येणे होते. लेख, टेलिफिल्मा यांची बिले साचली होती. ते पैसे कुठे आणि कसे घ्यायचे हे मला माहीत नव्हते. ईगर मला बरोबर घेऊन गेला. रक्कम हजारपेक्षा जास्त होती. तो हसून म्हणाला, "थोडे पैसे स्वतःजवळ ठेवून घे. तमाराला सगळे देऊ नको. रशियन पुरुष जे पैसे बायकोपासून लपवून ठेवतात त्यांना 'झनाचका' म्हणतात." मी एक नवा शब्द शिकलो. 'झिना' म्हणजे बायको. 'झनाचका' म्हणजे बायकोपासून लपवून ठेवलेले पैसे. मी कष्ट करून मिळवलेले पैसे लपविणे मला पटत नव्हते. का म्हणून ? कशासाठी ? सोविएत संघात मुळात आयकर कापून घेतात. त्यामुळे सरकारला फसवण्याचा प्रश्न नव्हता. रूबल रुपयांमध्ये रूपांतरित करण्यावर खूप निर्बंध होते. जादा रूबल रशियातच खर्च करायला हवे होते. दोन फेब्रुवारीला तमाराचा वाढदिवस होता. त्यानिमित्त

तिच्यासाठी चेकोस्लोवाक बनावटीचा कृत्रिम फरचा हिवाळी कोट मी तिला भेट दिला. प्रिय व्यक्तीसाठी सुंदर वस्तू भेट देण्यात आनंद असतो.

*

# ताश्कंद चित्रपट-महोत्सव

रशियन हिवाळ्याचा जोर जानेवारी-फेब्रुवारी महिन्यांमध्ये असतो. -३० अंश सें. ग्रे. पर्यंत तपमान उतरते. रात्री तर त्याहून खाली जाते. हिमवादळ झाले तर भयंकरच. त्याचा घूं घूं भयाण आवाज काळजात धडकी भरवतो. संध्याकाळच्या वेळा जास्तच उदास वाटतात. रात्री मोठ्या असतात. सकाळी नऊपर्यंत दिवस उजाडतच नाही. दुपारी चारनंतर अंधार पडलेला असतो. रस्त्याच्या कडेला बर्फाचे उंच उंच ढीग साचलेले असतात. मॉस्कोत मात्र रस्त्यावरचा बर्फ ताबडतोब काढून टाकतात. त्यासाठी खास मोटारी व माणसे काम करतात. वाहतुकीचा खोळंबा होत नाही. ट्राम, बस, घरे छान उबदार ठेवतात. पाश्चात्य देशांच्या तुलनेत सोविएत संघाने ह्या उबेबाबत आघाडी मारलीय. लोकांना अगदी कमी खर्चात किंवा मोफतच घरांमध्ये ऊब मिळते.

लेनिनच्या पुस्तकाचा अनुवाद आटोपल्यानंतर फेब्रुवारी महिना संपत आला. मार्चपासून वसंताच्या मोसमाचा आरंभ. बर्फ वितळायला लागला. पाण्याचे ओहळ धावू लागले. निष्पर्ण झाडांना चिकटलेला बर्फ खाली पडू लागला. केसाळ कोट-टोप्यांऐवजी हलके कोट व हलक्या टोप्या लोक वापरू लागले. प्रत्येक मोसमात वेगळे कपडे. सकाळी रेडिओवर दिवसाचे तपमान ऐकून त्याप्रमाणे बाहेर जाताना कपडे चढवायचे. मार्च महिन्यात वारा फार वाहतो. थंडगार चावरा वारा अंगातील हाडांपर्यंत आत घुसतो. म्हणून रशियन लोक म्हणतात, “मार्त मार्तोक, अदवाय द्वोय पार्तोक.” म्हणजे ‘मासात मार्च मास, दोन विजारी अंगात घाल.’

ह्या मार्च महिन्याच्या आठ तारखेला सोविएत संघात एक मोठा सण साजरा करतात. आठ मार्चला आंतरराष्ट्रीय महिला दिन साजरा करतात. ह्या दिवशी बायकांचा फार थाट. मुले आईला फुले देतात. पुरुष बायकोला व बहिणीला भेटवस्तू देतात. कचेरीतील पुरुष कर्मचारी सहकारी महिला कर्मचाऱ्यांना फुले, चॉकलेट, शँपेनची किंवा वाईनची बाटली देतात. निदान चांगले शब्द बोलतात. हा सण सोविएत बायकांच्या मनी-मानसी भिनलाय.

आता हे मला कुठून ठाऊक असणार ? नेमक्या त्याच दिवशी 'नोवोस्ती' वृत्त संस्थेने माझी मॉस्फिल्म स्टुडिओची भेट निश्चित केली होती. मॉस्फिल्म स्टुडिओ आपल्या प्रभात स्टुडिओसारखा मला आदरणीय. 'मनोहर' व 'यूथ रिव्ह्यू'साठी मॉस्फिल्मवर लेख तयार करायचे होते. 'नोवोस्ती'च्या मॉस्को कचेरीत भारत विभागात एव्हाना माझे नाव चांगलेच प्रस्थापित झाले होते. मी लोकांच्या मुलाखती कशा घेतो आणि एकूण लेख कसा लिहितो याचे निरीक्षण करण्यासाठी मिखायल नावाचा तरुण पत्रकार माझ्याबरोबर आला होता. त्याची स्वतःची वोल्गा मोटार होती. त्यामुळे माझ्या घरापासून सुमारे पस्तीस किलोमीटर अंतरावर असलेल्या मॉस्फिल्म स्टुडिओपर्यंत जाऊन येणे सोपे होते. मॉस्कोत रस्ते प्रशस्त असल्यामुळे हे अंतर विशेष वाटत नाही. अवघ्या चाळीस मिनिटांत स्टुडिओपर्यंत पोहोचलो. 'नोवोस्ती'ने आधीच कळविल्यामुळे स्टुडिओत प्रवेश सोपा ठरला. आवार खूप मोठे होते. साउंड स्टेजेस प्रचंड होती. सोविएत-पोलिश संयुक्त चित्रपटाचे चित्रीकरण चालू होते. ल्युदमिला कसातकिना नावाची रशियन नटी तेथे होती. 'टेमिंग ऑफ टायगर्स' नावाच्या रशियन चित्रपटाद्वारे ती भारतात पूर्वी प्रसिद्ध बनली. तिच्याशी गप्पा मारताना असे समजले की, वाघांबरोबर निर्भयतेने काम केल्याबद्दल खुद्द जवाहरलालनी तिचे कौतुक केले होते. पुन्हा भेटीबाबत मी तिच्यापाशी घरचा टेलिफोन नंबर विचारला. माझाही नंबर दिला. तेव्हा ती तटकन म्हणाली, "मी पुरुषांना स्वतः होऊन फोन कधी करत नाही." स्टुडिओबद्दल आणखी माहिती गोळा करून दुपारी घरी परत आलो. पोटात कावळे कोकलत होते.

घरात स्वयंपाकघर थंड होते. गॅसवर भांडी दिसत नव्हती. डायनिंग टेबलापाशी तमारा व तिची मुलगी तान्या बसल्या होत्या. तमारा घुम्म होती. मी जेवणाबद्दल विचारले. तमारा उत्तरली, "आज मी जेवण तयार केलं नाही !"

"का ?"

"कारण तू मला आठ मार्चची भेट दिली नाही !" हे ऐकून मी चक्रावलो. सकाळपासून कामाच्या नादात होतो. भेटवस्तूचे एवढे काय अप्रूप ? म्हणून माणसाला उपाशी ठेवायचं ? त्यावर मी काय बोलणार ? केवळ महिन्यापूर्वी टॉप बूट आणि हिवाळी केसाळ कोट भेटी दिलेल्या होत्या. संताप आवरल्यामुळे माझ्या डोळ्यांमध्ये पाणी तरळले. तमारावर ओरडायचा माझा हक्क नव्हता. भांडणाची इच्छा नव्हती. तिच्याबरोबरचे सहजीवन हा माझा एक प्रयोग होता. दोन पुरुष मित्र गुण्यागोविंदाने एकत्र राहू शकतात. एकमेकांसाठी तडजोड करू शकतात. तर मग एका स्त्रीने आणि पुरुषाने स्नेहाने एकत्र का राहू नये ? राग, मत्सर, असूया या भावनांना थारा कशाला द्यायचा ? खरे तर पुरुषाने घरखर्चाचा भार उचलावा म्हणून मी संपूर्ण घरखर्च करीत होतो. मला कधी स्वयंपाक करायची वेळ आली नव्हती. स्त्री म्हणून तमारा स्वयंपाक करायची, घर स्वच्छ करायची, माझे कपडे धुवायची, त्यांना इस्त्री करायची. मला अर्थातच ह्या सोयी आवडल्या. आता सेक्सची बाब परस्परसंमतीने घडायची. तिथे आग्रह, बळजोरी नव्हती. एक छान सहजीवन जगण्याची माझी इच्छा होती. तमाराला मुलीच्या खर्चासाठी नवऱ्याकडून पोटगी मिळत होती. तिच्यापाशी चार पैसे शिल्लक राहावेत म्हणून आमच्या घरखर्चात तिला खर्च करू देत नव्हतो. शिवाय तिच्या घराचे टेलिफोनसह भाडे देत होतो. अशी परिस्थिती असताना एखाद्या कजाग बायकोप्रमाणे ती आज का वागली ? असा प्रश्न माझ्या मनात उद्‌भवला. पुढे समजून आले तो तिचा स्वभावदोष होता. पण माझ्या मनात अढी मात्र निर्माण झाली. त्या दिवशी तान्याने मध्यस्थी केली. एवढ्या एकच वेळी तान्या माझ्याशी चांगली वागली. पुढच्या आयुष्यात माझ्या आणि तमाराच्या कलहाचे मुख्य कारण तान्या ठरणार होती हे त्या वेळी मला काय माहीत !

ह्या प्रसंगानंतर नेहमीप्रमाणे सुरळीत जीवन चालू झाले. अनुवादासाठी एक छानदार पुस्तक मला मिळाले. पुस्तके कोणती करायची हे ऑफिस ठरवायचे. अनुवादक सांगितल्या कामाचा चाकर होता. आमचा मोबदला उक्त्या पद्धतीने ठरायचा. म्हणून जेवढे काम तेवढे पैसे असे होते. मी खच्चून काम करायचो. पण सोविएत कर्मचारी ठरीव कोट्याबरहुकूम काम करायचे.

कारण त्यांना ठरीव पगार मिळायचा. जास्त काम करण्यास उत्तेजना नव्हती. आश्चर्य म्हणजे सोविएत संघात लोकांच्या पगारामध्ये वार्षिक वाढ होत नाही. एकच पगार कायम रकमेचा मिळत असतो. मग कितीही वर्षे नोकरी करा. त्यामुळे लोक कंटाळतात. त्यांना कामात रस वाटत नाही. कामचुकारपणा हा रशियनांचा स्थायी भाव.

किर्घिज लेखक चिंघिज ऐत्मातोव यांच्या 'तीन कादंबरिका' अनुवादासाठी मिळाल्या होत्या. ऐत्मातोव लेनिन पारितोषिक विजेते आहेत. खूप लोकप्रिय लेखक आहेत. त्यांच्या बव्हंश कथांवर चित्रपट बनलेत. किर्घिझियामधील स्टुडिओने त्यांच्या कथांवर आधारलेले चित्रपट उत्तम तयार केले आहेत. आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवांमध्ये ह्या चित्रपटांची प्रशंसा झालीय. माझा अनुवाद सरस उतरलाय. अत्यंत समरसून त्या दीर्घकथांचा मराठी अनुवाद मी केला. 'तीन कादंबरिका'ची पहिली आवृत्ती अवघ्या तीन महिन्यांत महाराष्ट्रात खपली असे समजले. चिंघिज ऐत्मातोव यांची प्रत्यक्ष भेट होण्याचा योग लौकरच जुळून आला.

मे महिन्यात उझबेकीस्तानच्या ताश्कंद नावाच्या राजधानीच्या शहरात आशियाई-आफ्रिकी आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव भरला होता. 'नोवोस्ती'मार्फत पत्रकार म्हणून माझी तेथे वर्णी लागली. ईगरने या कामी पुढाकार घेतला. मी ताश्कंदला जायला निघालो. ताश्कंद मॉस्कोपासून सुमारे साडेतीन हजार किलोमीटर अंतरावर आहे. मॉस्कोपासून भारतापर्यंत बरोबर मध्यभागी. साडेतीन तासांचा प्रवास होता. भाडे फक्त एकोणपन्नास रूबल. सोविएत संघात अंतर्गत विमानप्रवास स्वस्त होता.

घरापासून दीड तास टॅक्सी प्रवास केल्यानंतर दमादेदेवो विमानतळावर मी ईगरसह आलो. विमानतळावरची व्यवस्था पाहिल्यानंतर ईगरच्या येण्याचे कारण मला समजले. तो फक्त पोचवायला आला होता. सोविएत संघात परदेशी प्रवाशांसाठी विमानात चढण्या-उतरण्याची वेगळी व्यवस्था असते. इन्टूरिस्ट ह्या सरकारी प्रवासी संस्थेमार्फत ही व्यवस्था असते. परदेशी प्रवाशांनी वेगळ्या खास दालनात प्रवेश करायचा. त्यांच्यासाठी सामान देण्याचा काऊंटर वेगळा. त्यांना विमानापर्यंत घेऊन जाणारी बस व हवाईसुंदरी वेगळी. त्यांच्यासाठी विमानातील वेगळी आसने आरक्षित असतात. विमान

उतरल्यानंतर त्यांचे स्वागत करणारी हवाई सुंदरी वेगळी. विमानतळाबाहेर जाण्याचे दार वेगळे. वेगळ्या दालनात सामान येते. प्रथम प्रथम हे वेगळेपण चमत्कारिक वाटले. पण पुढे अनुभवांती ते जास्त सुखद वाटू लागले. कारण ताश्कंदकडे व कॉकेशसकडे जाणारे सोविएत प्रवासी प्रचंड सामान सांगाती घेतात. विमानात बसताना गैरसोय होते. चक्क आपल्या एस. टी. मध्ये बसलोय असे वाटते. अगदी घाण वासांसह.

मॉस्को सोडताना हलका हिमवर्षाव होता. -४ अंश सें. ग्रे. तपमान होते. साडेतीन तासांनंतर ताश्कंदमध्ये उतरलो. तेव्हा ४० अंश सें. ग्रे. उष्णता होती. ताश्कंदचे घड्याळ मॉस्कोपेक्षा तीन तास पुढे आहे. म्हणजे भारतापेक्षा अर्धा तास पुढे. 'सलाम आलेकुम' हे शब्द कानांवर आले. उत्तर हिंदुस्थानातील मुसलमान वस्ती असलेल्या गावाप्रमाणे ताश्कंद प्रथम दृष्टिक्षेपात वाटले. १९६६ साली भयंकर भूकंपात जमीनदोस्त झालेले हे शहर. सोविएत सरकारने त्याची फेरउभारणी जलद केली. पण १९७४ सालात अजून बैठ्या इमारती होत्या. अरुंद रस्ते, बोळ होते. मातीची बैठी घरे होती. त्यानंतर चार वर्षांत ताश्कंद झपाट्याने बदलले. उंच इमारती उभ्या झाल्या, प्रशस्त रस्ते बनले. भुयारी मेत्रो चालू झाली. हॉटेल उझ्बेकीस्तानसारखे टोलेजंग हॉटेल उभे झाले.

त्या वेळी भारतीय प्रतिनिधींची राहण्याची सोय 'ताश्कंद' हॉटेलात होती. टुमदार छोटी इमारत. माझी सूटकेस विमानतळापासून चुकून दुसऱ्या हॉटेलात गेली होती. सुमारे तासभर पळापळ केल्यानंतर मला ती परत मिळाली. उझ्बेकीस्तानच्या स्टुडिओमार्फत काही कलाकार, तंत्रज्ञ आम्हा प्रतिनिधींच्या स्वागताला आले होते. त्यांच्या वागण्या-बोलण्यातून कमालीची आस्था जाणवत होती. नंतरच्या काळात भारताचा सुवर्णमयूर जिंकणारा अली हमरायेव हा गुणी उझ्बेक चित्रपट-दिग्दर्शक त्या वेळी ओळखीचा बनला. मी एव्हाना रशियनमध्ये संभाषण करू शकत होतो. म्हणून अलीशी दोस्ती लौकर जमली. उझ्बेक तरुण तारका तमारा शकीरोवा हिच्याशी त्याने माझा परिचय करून दिला. ठेंगणी ठुसकी तमारा शकीरोवा जेमतेम विशीच्या आत होती. चित्रपट तारकेचा नखरा तिच्या वागण्यात नव्हता. एखाद्या कॉलेज कन्यकेप्रमाणे ती वावरत होती. तिची सोबत सोडायची नाही अशी तंबी उझ्बेक स्वागतमंडळाच्या प्रमुख बाईने मला दिली. इतक्या छान तरुणीची सोबत कोण सोडणार ? मनाशी

म्हटले आपला शुक्र उच्चीचा असणार.

रात्री रेस्तराँमध्ये जेवणाच्या वेळी तीस-पस्तीस भारतीय चित्रव्यावसायिक भेटले. त्यांच्यात पूर्वपरिचयाचे होते श्री. वसंतराव साठे. म्हणजे राजकपूरचे पटकथा-लेखक आणि श्री. के. ए. अब्बास यांचे सहकारी. कित्येक महिन्यांनंतर भरपूर मराठी बोलायला मिळाले. साठेसाहेबांनी भराभरा माझ्या ओळखी करून दिल्या. त्यांच्यामुळे मुंबईच्या हिंदी चित्रपटसृष्टीतील अनेक मातब्बर लोकांच्या माझ्या ओळखी झाल्या. बासू चतर्जी, बासू भट्टाचार्य, गुलझार हे पुढे छान मित्र बनले.

दोन दिवसांनंतर दुखऱ्या दाढेनिशी गिरीश कर्नाड आला. त्या वेळी तो पुण्याच्या फिल्म इन्स्टिट्यूटचा प्रिन्सिपल होता. माझा प्रथम गैरसमज होता की गिरीश महाराष्ट्रीय आहे. भारतीय प्रतिनिधींचा मी अनधिकृत दुभाष्या नकळत बनलो. महोत्सव समितीच्या कार्यकर्त्यांना गिरीशची समस्या मी सांगितली. ताबडतोब दवाखान्यात जाण्याची सोय झाली. दातांच्या डॉक्टरने गिरीशची दुखरी दाढ काढली. गिरीश वेदनामुक्त झाला. एवढे झाल्यानंतर मैत्री जमायला काय वेळ ? बंगालचा दिग्दर्शक पूर्णेंदू पत्रिआ, गिरीश आणि मी असे त्रिकूट जमले. महोत्सवाच्या चित्रपटांव्यतिरिक्त संध्याकाळच्या वेळी उझ्बेक रंगभूमी पाहण्याची सोय होती. महोत्सव समितीने लीदिया नावाची रशियन तरुणी ह्या कामी आमच्या दिमतीला दिली होती. लीदियाला इंग्रजी भाषा अजिबात येत नव्हती. म्हणून गिरीश आणि पूर्णेंदू यांच्यासाठी मी दुभाषी बनलो. ताश्कंदचे सुप्रसिद्ध हमझा थिएटर आम्ही पाहिले. हमझा नावाचा उझ्बेक नाटककार, कवी, क्रांतिकारक होऊन गेला. त्याच्या गौरवार्थ थिएटरला नाव देण्यात आले.

ताश्कंद म्हणजे पाषाण नगरी. या शहरात सुंदर सुंदर बागा आणि थुई थुई नाचणारी कारंजी दिसली. एके काळचा मागासलेला मध्य आशिया रशियन कम्युनिस्टांनी खूप प्रगत बनविलेला दिसला. उझ्बेक मुसलमानांबरोबर रशियन माणसे, कोरीयन लोक राहत होते. उझ्बेक मुसलमानांच्या नावांचे रशियनीकरण घडलेले दिसले. म्हणजे महंमूद या नावाच्या जागी महंमूदोव.

पण उझ्बेक मुसलमान बायकांनी जरी परांजा म्हणजे बुरखा टाकला तरी संततीनियमन स्वीकारले नाही. एकेका बाईला आठ-आठ मुले दिसत होती. सोविएत संघात मुसलमानांची लोकसंख्या झपाट्याने वाढतेय ही आजची

चिंतेची बाब बनलीय.

महोत्सवासाठी भारतीय प्रतिनिधीमंडळ सर्वांत मोठे होते. सुमारे तीस-चाळीस माणसांमध्ये निम्मे लोक दक्षिण भारतीय चित्रपट व्यावसायिक होते. त्यांचा एक गट अलग वावरायचा. मुंबई व कलकत्ता येथील माणसे मिळून-मिसळून होती. बांगलादेशचे प्रतिनिधी आमच्यातच वावरायचे. बबिता ही चित्रतारका खूप लोकप्रिय बनली. राजकपूर यांची लोकप्रियता कल्पनातीत आढळली. त्यांचा ब्रद्यागा (आवारा), गस्पदिन ४२० (श्री. ४२०) लोकांच्या आठवणीत कायम होते. महोत्सव समितीने त्यांची खास बडदास्त राखली. राजकपूर आल्यानंतर आमच्या बरोबर सतत वावरणारे वसंतराव साठे अचानक गायब झाले.

चित्रपट महोत्सवात आशियाई व आफ्रिकी देशांचे चित्रपट पाहायला मिळाले. काही कम्युनिस्ट देशांचे प्रचारी चित्रपट हास्यास्पद वाटायचे. तर काही छोट्या आफ्रिकी देशांचे चित्रपट गुणवत्तेच्या दृष्टीने दर्जेदार असायचे.

फिल्मी बाजारपेठेत खरेदी-विक्रीचे व्यवहार चालायचे. म्हणून निर्माते व वितरक यांची गर्दी व्हायची.

उझ्बेक प्रजासत्ताकाच्या स्टुडिओने पाहुण्यांसाठी मोठी पार्टी दिली. उत्तम मद्यांसह रुचकर जेवण होते. मग उझ्बेक गाणी आणि नाच. हे उझ्बेक मुसलमान म्हणजे मूळचे मोगल. उझ्बेक भाषेत उर्दू, फारसी शब्द आढळतात. त्यांना भारतीय लोक व भारतीय कला यांच्याबद्दल अत्यंत आत्मीयता वाटते. ताश्कंदमध्ये हिंदी बोलणारी अनेक माणसे आढळली. हिंदी चित्रपटांमधील गाणी उझ्बेक मुली सर्रास गातात. बारीक बारीक पेडांच्या त्यांच्या वेण्या मजेशीर वाटतात.

चित्रपट दिग्दर्शक लतीफ फैझियेव यांनी स्वतःच्या मालकीच्या दुमजली घराच्या आवारात भारतीय प्रतिनिधींना मोठी मेजवानी दिली. बकऱ्याचे मांस सळ्यांवर भाजले जात होते. मोठ्या कढयांमध्ये पुलाव शिजत होता. मोठा जंगी बेत होता. या पुलावात तूप फार घालतात. त्यामुळे घशाला मिठी बसते. याच फैझियेवनी मुंबईच्या श्री. फकीरचंद मेहरा यांच्याबरोबर नंतर दोन चित्रपट संयुक्तपणे निर्माण केले.

एक दिवस लालबहादूर शास्त्री यांचे स्मारक पाहायला आम्ही गेलो.

त्यामुळे ताश्कंदच्या परिसरातील ग्रामीण भागाचे दर्शन घडले. उझबेकीस्तान फळांच्या व कापसाच्या मुबलक उत्पादनासाठी प्रसिद्ध आहे.

महोत्सवात प्रेस बार ही जागा रात्रीच्या वेळी महत्त्वाची. देशोदेशीचे प्रतिनिधी खूप उशिरापर्यंत तेथे मद्यपान करतात. तेथे नव्या ओळखी होतात. पूर्व जर्मनीतील लीपझिग चित्रपट महोत्सवाचे डायरेक्टर ट्रिश ओळखीचे बनले. नोव्हेंबरात भरणाऱ्या लीपझिग चित्रपट महोत्सवाचे निमंत्रण त्यांनी मला दिले. खरे म्हणजे चेकोस्लोवाकियातील कार्लोवी वारीचे आमंत्रण मला मिळावे अशी माझी इच्छा होती. पण जमले नाही. महोत्सवाच्या धामधुमीत जरा निवांतपणा जेव्हा मिळायचा तेव्हा मन थोडे उदास बनायचे. आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाला हजर राहण्याची महत्वाकांक्षा पूर्ण झाली. पण प्रत्यक्षात चित्रपटनिर्मितीच्या क्षेत्रापासून मी दूर गेलो होतो. माझा सक्रिय सहभाग थांबला होता. केवळ पत्रकार म्हणून मी आता उरलो होतो. काही लोकांचा समज व्हायचा की मी दिग्दर्शक आहे.

पाहता पाहता महोत्सवाचे दहा दिवस संपत आले. तमारा शकीरोवा आणि लीदिया या दोघी छानपैकी मैत्रिणी बनल्या होत्या. दोघींनी मला जाता जाता चकित केले.

एक दिवसभर आम्ही कंपूने एकत्र फिरत होतो. काही कामाच्या निमित्ताने तमारा शकीरोवा माझ्या खोलीत आली. तेथे आम्ही दोघेच होतो. एकदम तिच्या कोमल हातांचा माझ्या मानेभोवती विळखा पडला. तिने माझे प्रदीर्घ चुंबन घेतले. त्या चुंबनाने मला खूप काही सांगितले. त्यानंतर आम्हा दोघांची एकांतात तशी भेट कधी घडली नाही.

मॉस्कोला परतण्याचा शेवटचा दिवस होता. दुपारचे विमान होते. भल्या सकाळी खोलीच्या दारावर टकटक आवाज आला. दारात लीदिया उभी होती. तिचे वय सुमारे बावीस-तेवीस होते. माझा निरोप घ्यायला आली होती. बोलता बोलता आम्ही दोघे माझ्या पलंगावर विवस्त्रावस्थेत एकमेकांच्या मिठीत केव्हा गुरफटलो हे ध्यानातच आले नाही. मग एकदम भानावर आलो तेव्हा समजले लीदिया अनघा होती. बस्स ! पुन्हा कधी भेट झाली नाही. चेहरासुद्धा आठवत नाही.

मात्र मॉस्कोत घरी फजिती झाली. बाथरूममध्ये आंघोळ करीत होतो तेव्हा

तमारा आत आली. "हे काय, तुझ्या गळ्याखाली कसला डाग ?" तिने प्रश्न केला. मी आरशात पाहिले. प्रणयाच्या धुंदीत लीदियाचे दंतव्रण उमटले होते. "पिशवीचा पट्टा घासला गेला असावा !" मी थाप मारली.

*

## मृत्यूची छाया

माझी थाप पचली नाही. तमाराला संशय आला होता. मी बाहेर भानगड केली आहे असे तिला वाटले होते. माझ्या वाढदिवसानिमित्त लीदियाचे अभिनंदनपर पत्र आल्यावर तिची खात्री पटली. अर्थात मी कबुली दिली नाही. लीदियाला घरचा पत्ता दिल्याचा मूर्खपणा केला होता.

तरीसुद्धा तमाराने माझा वाढदिवस दणक्यात साजरा केला. त्या दिवशी तिची मैत्रीण एल्वीरा आली होती. ही एल्वीरा गमत्या स्वभावाची होती. ती घटस्फोटिता होती. तमाराच्या तान्याच्याच वयाची तिला एक मुलगी होती. एल्वीराचे वडील एके काळी सैन्यात अधिकारी होते. क्युबामध्ये दोन-तीन वर्षे वास्तव्य करून आले होते. फिडेल कॅस्ट्रोच्या भावाचे लष्करी सल्लागार म्हणून त्यांनी काम केले होते. मॉस्को सोविएतमध्ये एका मोठ्या पदावर ते होते. त्यांच्या वशिल्याने एल्वीराला नवे अपार्टमेंट मिळाले होते. पुढे त्यांच्यावर अफरातफरीचा आळ आला. तेव्हा स्वतःच्या दाचावर त्यांनी मनगटे कापून आत्महत्या केली.

माझ्या वाढदिवसाला ईगर त्याच्या दोन क्रमांकाच्या माजी बायकोसह आला होता. यहुदी बायकांच्या प्रेमात पडणे हे त्याचे दुबळेपण. त्याला बाईची सोबत सतत आवश्यक वाटायची. ईगरची जाडी यहुदी बायको कुणालाच आवडली नाही. मरीना ब्लागोनरावोवा आवर्जून आली होती. तिने मला खोलीच्या मध्यभागी उभे केले. सर्वांनी आपापले हात एकमेकांच्या हातांमध्ये गुंफले. मग माझ्याभोवती फेर धरला व गाणे गायला सुरुवात केली : “करावाय,

करावाय, कवो खोचिश वीबराय." ही रशियन पद्धत मला गमतीची वाटली.

या दिवशी एक मराठी पाहुणे आमच्याकडे आले होते. स्टेट ट्रेडिंग कॉर्पोरेशनच्या मॉस्को ऑफिसातील अधिकारी श्री. गडकरी फार उमदे गृहस्थ होते. गडकरी त्यांच्या दोन कन्यांसह व पत्नीसह मॉस्कोत तीन-चार वर्षे राहत होते. ते आणि त्यांची ज्योती नावाची मुलगी आमच्या घरी आले होते. लौकरच गडकरी कुटुंबाशी स्नेह दृढ झाला. मित्रांना गोळा करून पार्ट्या देण्याची माझी सवय पाहून गडकऱ्यांनी मॉस्कोतील जीवनाचे एक नवे दालन मला दाखविले. व्यापाराच्या निमित्ताने मुंबई, पुणे येथून मॉस्कोला येणाऱ्या लोकांच्या ओळखी त्यांनी करून दिल्या. त्यांच्यामुळे पुण्याच्या 'थरमॅक्स' कंपनीच्या निर्यात विभागाचे डायरेक्टर श्री. एम. पी. राव यांची ओळख झाली. कालांतराने श्री. मनोहर राव यांच्याशी घनदाट मैत्री जमली. त्यांच्या स्वभावातील मनोहर पैलू दिसून आले. पुढे पुढे त्यांच्या प्रत्येक मॉस्कोभेटीत आमची गाठ पडायचीच.

मॉस्कोतील 'कॉसमॉस' किंवा 'मेझ्दुनरोदनाया' हॉटेलांच्या खोलीत स्थिरस्थावर झाल्यानंतर राव मला फोन करायचे. मग भेटीची वेळ व जागा ठरायची. कधी आमच्या घरी, कधी हॉटेलातील खोलीत. खूप गप्पा व्हायच्या. रावांना वाचनाची आवड जास्त. माफक व्हिस्कीपान घडायचे. मग रविवारी सकाळी सौनामध्ये जायचे. तेथे मसाजवाल्याकडून भोजाच्या फांद्या मारून घ्यायच्या, छानपैकी मसाज करून घ्यायचा. मग रेस्तराँत वोदकासह जेवण. मॉस्कोतील वास्तव्यात एम. पी. रावांच्या संगतीत दिवस सुंदर व्यतीत झाले. या कार्यक्रमात तमारा आमच्याबरोबर उत्साहाने असायची.

मॉस्कोत माझे आगमन झाल्याच्या घटनेला एक वर्ष पुरे होत आले. एक दिवस भारतीचे पत्र आले. जुईसह तिचा मी पुन्हा स्वीकार करावा अशी सूचना पत्रात होती. मला पुन्हा विषाची परीक्षा घ्यायची इच्छा नव्हती. मी स्पष्ट नकार कळविला. मध्यंतरी ती भगवान रजनीशांच्या भजनी लागली होती असे कळले. माझ्या नकारानंतर ती काय समजायचे ते समजून चुकली. काही काळानंतर तिने दुसरे लग्न केल्याची बातमी समजली. मला तिच्या नवऱ्याची कीव वाटली. कारण जगातील सर्व पुरुषांशी माझी ऐक्यभावना आहे. बिचाऱ्यापुढे कोणते भोग होते ह्याची मला कल्पना होती. असो !

दादांची पत्रे मधून मधून येत होती. ताईची प्रकृती जास्तच बिघडत होती.

मु....८

मामा आणि बेबी तिच्या शुश्रूषेत गुंतले होते. त्यांना बराच त्रास झाला. पण त्या वेळी मात्र त्यांनी तसे कळविले नाही. घरापासून दूर असताना मी चिंताक्रांत होईन ह्या विचाराने त्यांनी तपशील कळविला नाही. दादांना माझ्याकडून बँकेमार्फत पैसे व्यवस्थित मिळत होते. एक दिवस मामाची तार आली. १ सप्टेंबर १९७४ रोजी ताई वारली होती.

ताईच्या आजाराबाबतचे तपशील १९८९ मध्ये भारतात कायमसाठी म्हणून जेव्हा परतलो तेव्हा बेबीने सांगितले. ताईच्या मेंदूला रक्तपुरवठा व्यवस्थित होत नव्हता. आवश्यक ती शस्त्रक्रिया घडली नव्हती. ताईचा मृत्यू अनपेक्षित नव्हता. यातनांमधून ती मुक्त झाली.

ह्या घटनेनंतर महिनाभरानंतर लीपझिग चित्रपट महोत्सवाचे रीतसर निमंत्रण आले. २३ नोव्हेंबर ते ३ डिसेंबर या काळात महोत्सव होता. ह्या आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवांना पत्रकारांना जाण्या-येण्याचा प्रवासखर्च करावा लागतो. महोत्सव समिती महोत्सवादरम्यान हॉटेलचा, निवासाचा व जेवणांचा खर्च करते. त्यासाठी मोकळा वेळ मात्र असला पाहिजे. म्हणजे हा सारा हौसेचा मामला. महोत्सवाबद्दल एक-दोन लेख लिहायचे. त्यांच्यापासून होणारे अर्थार्जन किरकोळ असते. देशोदेशीचे चित्रपट पाहायला मिळतात हे मात्र खरे. वेगवेगळ्या माणसांच्या ओळखी होतात. त्यामुळे मित्रांच्या क्षेत्राचा विस्तार घडतो.

रशियात आल्यानंतर माझा हा पहिला परदेश प्रवास. आगगाडीने जाणे स्वस्त होते. सुमारे ३२ तासांचा प्रवास होता. मॉस्कोपासून श्वेतरशियाच्या सीमेवर ब्रेस्त शहरापर्यंत जायचे होते. पुढे पोलंडची सीमा सुरू होणार होती. सीमेपर्यंत रात्रभर प्रवास घडणार होता. मग दिवसभर पोलंड ओलांडून आगगाडी पूर्व जर्मनीच्या हद्दीत शिरणार होती. रात्री दहाच्या दरम्यान बर्लिन शहर येणार होते. बर्लिनपासून आगगाडी बदलून रात्रभर प्रवास केल्यानंतर लीपझिग स्टेशन सकाळी येणार होते. एकूण प्रवास अवघड होता.

प्रवासाची पूर्वतयारी करायला हवी होती. प्रकाशन गृहाच्या विदेश विभागातील वादिमचा साहाय्यक येवगेनी ऊर्फ झेन्या ह्या माणसाने माझ्या जाण्या-येण्याच्या व्हिसांची व्यवस्था केली. हा झेन्या एके काळी खलाशी होता. हिंदी छान बोलायचा. पण जरा वोदकाप्रेमी होता. सकाळपासून स्वारीच्या

तोंडाला भपका यायचा. पोटात वोदका असेल तर साहेब खुशीत वावरायचे. जर नसेल तर चिडचिड करायचे. त्यांच्या मदिरेच्या तंद्रीत घडलेली चूक मला भोवली.

मॉस्कोतील ब्येलारूस्काया स्टेशनवरून पश्चिम युरोपकडे जायचे. तेव्हा २१ नोव्हेंबर १९७४ रोजी ब्येलारूस्काया स्टेशनवर उभ्या असलेल्या आगगाडीच्या पहिल्या वर्गाच्या डब्यात अस्मादिक ऐटीत चढले. माझा सहप्रवासी इंडोनेशियन तरुण होता. त्याला रशियन भाषा उत्तम बोलता येत होती. पण इंग्रजी मोडकीतोडकी. त्याचे नाव अवल होते. थोड्याच वेळात वोदकाच्या साथीवर आमची ओळख जमली. अवल रशियातील फिल्म इन्स्टिटयूटमध्ये शिकत होता. पूर्व युरोपात त्याच्यासारखे अनेक इंडोनेशियन तरुण-तरुणी राजकारणात गुरफटलेले होते. इंडोनेशियात क्रांती घडल्यानंतर भूमिगत जीवन जगत होते. 'राज्यविहीन नागरिक' म्हणून तो मॉस्कोत राहत होता. एका रशियन तरुणीशी त्याचे लग्न झाले होते. तिच्यापासून झालेल्या त्याच्या अपंग मुलाचा त्याने फोटो दाखविला. आई-बाप, मायदेश यांच्यापासून त्याची अनेक वर्षे फारकत झालेली होती.

पहाटे ब्रेस्त स्टेशन आले. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात ब्रेस्तला रशियाच्या इतिहासात अनन्यसाधारण स्थान आहे. हिटलरी फौजांनी २२ जून १९४१ रोजी रशियावर पहिला हल्ला केला तो ब्रेस्त येथे. ब्रेस्तची गढी रशियन सैनिकांनी शौर्याने लढविली. पण अपुऱ्या संख्याबळापायी त्यांना दारुण पराभव पत्करावा लागला. तेथे धारातीर्थी पडलेल्यांच्या गौरवार्थ एक भव्य स्मारक उभे आहे. ब्रेस्तपासून लोहमार्गाची रुंदी बदलत असल्यामुळे डब्यांची चाके बदलण्याचा कार्यक्रम तीन-चार तासांपर्यंत चालतो. क्रेनच्या साहाय्याने डबा अलगद वर उचलला जातो. टेबलावरच्या ग्लासातील पाणी जसेच्या तसे राहते. प्रवाशाची इच्छा असेल तर त्याने डब्यातच बसून राहावे किंवा गावात फेरफटका मारावा. मी आणि अवलने बेत केला की, गढीतील स्मारक पाहून यायचे.

गाडी स्टेशनात शिरली. बाहेर हलका हिमवर्षाव चालू होता. तपमान शून्याखाली ७ अंश सें. ग्रे. होते. गाडी थांबताच रशियन सीमारक्षक दाणदाण बूट आपटत डब्यात शिरले. त्यांनी आमचे व्हिसा व पासपोर्ट तपासले. दस्तऐवजांसह ते बाहेर निघून गेले. पण थोड्याच वेळात परतले. दोन

सीमारक्षक माझ्या दोन बाजूंना बंदुका सावरून उभे राहिले. त्यांच्याबरोबर चलण्याची त्यांनी मला खूण केली. दोन्ही बाजूंना उभे राहून अंगाला स्पर्शही न करण्याचा हा 'रशियन अटके'चा सभ्य प्रकार ! गोंधळल्या मनाने मी त्यांच्याबरोबर चालू लागलो. रात्रीच्या मद्यपानामुळे डोके ठणकत होते.

आमची वरात स्टेशनवरच्या पोलिस चौकीत शिरली. सुमारे वीस मिनिटांनी घाबऱ्या घुबऱ्या चेहऱ्याचा अवल माझ्या समाचारासाठी तेथे आला. माझ्या व्हिसामध्ये गमन-आगमनांच्या तारखांचा घोटाळा होता. गमनाच्या २२ नोव्हेंबरऐवजी ५ डिसेंबर तारीख पडली होती. वस्तुतः आगमन ५ डिसेंबरला घडणार होते. आतापर्यंत हा घोटाळा रेल्वेची तिकिटे देणाऱ्या व्यक्तीच्या लक्षात आला नव्हता. माझ्याही हे ध्यानात आले नव्हते. सुदैवाने माझ्यापाशी जर्मन सरकारची निमंत्रणपत्रे होती. अवलसुद्धा चित्रपट महोत्सवाला जात होता. पोलिस अधिकाऱ्याला त्याने माझे निरपराधित्व समजावले. तो अधिकारी के. जी. बी. चा होता. अधिकाऱ्याने आमचे बोलणे शांतपणे ऐकून घेतले. त्याने अवलचे कागदपत्र पाहिले. 'राज्यविहीन नागरिका'ला पोलंडमधून (transit) प्रवास करायला अडचण येणार होती. अधिकाऱ्याने अवलची अडचण दूर केली. पण मला तसेच बसवून ठेवले. दोन-अडीच तासपर्यंत मी तसा बसून होतो. पोटात भूक पेटली होती. डोके भयंकर ठणकत होते. समोरची दृश्ये छातीत धडकी भरवत होती. सोने किंवा पैसे लपवून नेणाऱ्या प्रवाशांच्या अंगझडत्या होत होत्या. त्यांना अटका होत होत्या. डोळे विस्फारून मी पाहत होतो. माझी अंगझडती झाली नाही. शेवटी सकाळी दहा वाजता तो के. जी. बी. अधिकारी माझ्यापाशी आला. फोनमार्फत त्याने मॉस्कोशी संपर्क साधला होता आणि माझ्याबद्दल योग्य ती चौकशी केली होती. यापुढे व्हिसावरच्या तारखा काळजीपूर्वक नीट पाहा, अशी मला समज दिली. "गाडी सुटायला आणखी एक तास अवधी आहे. गाव बघायचं असेल तर जा." असे म्हणून त्याने मला सोडले. तेवढ्यात अवल आला. आता गावात जाण्यासाठी माझ्या अंगी त्राण उरले नव्हते. घाईने डब्यात परत जाऊन बसलो. न्याहरी केली. रात्रीच्या मद्यपानावर 'उतारा' म्हणून रशियन पद्धतीने वोदकाचा थेट घुटका मारला !

नेमक्या या काळापूर्वी तीन-चार तास आधी तिकडे पुण्यात दादा मरणयातना भोगत होते.

महोत्सव पूर्ण झाल्यानंतर जेव्हा मी मॉस्कोला परतलो तेव्हा सकाळची वेळ होती. आगगाडीच्या सतत प्रवासामुळे मी शिणलो होतो. तमाराने न्याहरीसाठी टेबल लावले. टेबलावर कन्याक भरलेला छोटा चषक होता हे पाहून मला आश्चर्य वाटले. तमाराने मला कन्याक पिण्याचा आग्रह केला. खाल्ल्यानंतर तिने मामाकडून आलेली तार दाखविली. २२ नोव्हेंबरला दादा वारले होते ! हा मोठा आघात होता. ताईपाठोपाठ दादा इतक्या वेगाने हे जग सोडून गेले होते. मी अवाक् बनलो. मला रडू फुटावे म्हणून तमाराने आणखी कन्याक दिली. तसे मला रडू येत नाही. वाचताना, नाटक-सिनेमा पाहताना माझ्या डोळयांमध्ये पाणी येते. अस्पष्ट दबता हुंदका येतो. हमसून हमसून रडल्याची कधी आठवण नाही. जरा कुठे चांगले दिवस सुरू झाले होते. पण त्यांचा उपभोग माझ्या माता-पित्यांच्या नशिबी नव्हता. काही महिन्यांपूर्वी दादांचे खुषीपत्र आले होते. मी चित्रपटसृष्टीत नट झालो आणि परदेशात नोकरी मिळवली याबद्दल त्यांचे स्वप्न पूर्ण केल्याबद्दल त्यांनी समाधान व्यक्त केले होते. पितृऋणातून मी मुक्त झालो होतो.

भारत सोडल्यानंतर अवघ्या वर्ष-सव्वा वर्षाच्या आत मृत्यूने माझ्या माता-पित्यांना लागोपाठ हिरावून नेले. माझे नशीब साधेसुधे नव्हे ही प्रथमच जाणीव झाली.

*

# बर्लिन– लीपझिग– पुणे

पूर्व बर्लिन स्टेशनवर काही जर्मन माणसे अवलला भेटायला म्हणून आमच्या डब्याजवळ आली. मॉस्कोतील फिल्म इन्स्टिट्यूटमधील अवलच्या जर्मन मित्रांचे ते नातेवाईक होते. त्या लोकांनी अवलला काही जर्मन मार्कच्या नोटा दिल्या. अवल अनुभवी होता. महोत्सवादरम्यान त्याने खर्चाची तरतूद केली होती. मी आपला महोत्सव समितीच्या भत्त्याबाबत निश्चिंत होतो. नंतर बर्लिन ते लीपझिग प्रवासात अवलने मला पैशांबाबत खुलासा केला. तो ह्या पैशांच्या बदली जर्मन मित्रांना मॉस्कोत काही रूबल देणार होता. ही देवघेव सोयीची होती. कम्युनिस्ट देशांमध्ये पैशांच्या विनिमयाच्या भानगडी फार होत्या असे पुढे पुढे ध्यानात आले. आश्चर्य म्हणजे या देशांमध्ये डॉलरला फार फार महत्त्व होते. फक्त डॉलरमध्ये वस्तू विकणारी दुकाने होती. त्यांना मॉस्कोत 'बेयोंझका' असे नाव आहे. 'बेयोंझा' म्हणजे भोजाचे झाड. इंग्रजीत बर्च. पूर्व जर्मनीत अशा दुकानांना 'इंटरशॉप' नाव होते. तेथे स्कॉच व्हिस्की, इंग्लिश किंवा अमेरिकन सिगारेटस्, फ्रेंच परफ्यूम आणि उत्तम परदेशी कपडे, पादत्राणे मिळायची. फक्त परदेशी माणसे या दुकानांमध्ये विकत घेऊ शकत. स्थानिक माणसे एकटी-दुकटी दुकानात जायला भीत असत. कधी कधी परदेशी माणसाच्या सोबतीने जायची. 'ग्लास्नस्त'च्या काळात सोविएत नागरिक बिनधास्त 'बेयोंझका'त खरेदी करतात. आपल्याच देशात आपल्या नागरिकांना उत्तम वस्तू खरेदी करण्याची मनाई हा कम्युनिस्ट राजवटींचा विचित्रपणा होता. त्याचेच दुष्परिणाम आज त्या भोगत आहेत.

लीपझिग टुमदार शहर होते. पूर्व जर्मनी तसा नीटनेटका छोटासा देश होता. रस्त्यावर भेटलेल्या जर्मन लोकांशी जर रशियनमध्ये बोलले तर त्यांना आवडायचे नाही. काही इंग्रजी बोलत. रशियाच्या मांडलिक देशांमधील लोकांमध्ये रशियाबद्दल एक प्रकारची सुप्त वैरभावना वसत होती.

'कॅपिटॉल' सिनेमा थिएटरमध्ये महोत्सवाचे चित्रपट दाखविणार होते. लीपझिग महोत्सव हा लघु चित्रपटांचा महोत्सव आहे. ताश्कंद, मॉस्को, लीपझिग या महोत्सवांचे मूळ स्वरूप राजकीय आहे. कलेचा मुखवटा घेतला जायचा. पॅलेस्टीन मुक्ती संघटनेमार्फत उत्तम उत्तम चित्रपट सादर झाले. त्या संघटनेचे प्रतिनिधी ऐटीत वावरायचे. विशेषतः प्रेस बारमध्ये त्यांची दादागिरी फार चालायची. दुपारपासून रात्रीपर्यंत चित्रपट बघायचे असा कार्यक्रम होता. सकाळी आदल्या दिवशी दाखविलेल्या चित्रपटांची पत्रकार परिषद असायची. महोत्सवाचे हे तंत्र लौकरच अंगी बाणले. प्रथम प्रथम डोळे दुखायचे. भाषेची समस्या होती. जर्मन मला येत नाही. त्यामुळे दुभाष्याचा धावता अनुवाद समजायचा नाही. सब टायटल्स वाचायला त्रास व्हायचा.

आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवांमध्ये वावरणारी माणसे ठरीव असतात. तेच ते चेहरे दिसायचे. लीपझिगमध्ये भारतीय पत्रकार म्हणून प्रथम मी एकटा होतो. नंतर दिल्लीचे देवेंद्रकुमार आले. देवेंद्रकुमारांची ताश्कंदमध्ये ओळख झालेली होती. कोणे एके काळी आचार्य अत्र्यांनी त्यांना अभिनयाची संधी दिली होती म्हणे. म्हणून माझ्यासारख्या मराठी माणसाबद्दल त्यांना आपुलकी वाटत होती.

महोत्सवांमध्ये आशियाई माणसे एकमेकांशी छान वागायची. पाकिस्तानी टेलिव्हिजनचे एक अधिकारी, पाकिस्तानी चित्रपट दिग्दर्शक, बांगला देशचे चित्रपट दिग्दर्शक, एकाच जेवणाच्या टेबलावर जिव्हाळ्याने गप्पा मारीत. परस्पर मैत्री खरोखरच वृद्धिंगत व्हायची. बर्लिनमध्ये स्थायिक झालेल्या असदुल्ला नावाच्या पाकिस्तानी पत्रकाराने आपण होऊन माझ्याशी ओळख काढली. परिचयानंतर फार भला माणूस वाटला. मूळचा हिंदुस्थानचा होता. मग पाकिस्तानात गेला. कम्युनिस्ट पक्षाचा सदस्य झाल्यानंतर पाकिस्तानातून लंडनला पळून गेला. लंडनमधून मॉस्कोला आला. तेथे आवडले नाही म्हणून बर्लिनला आला. जर्मन स्त्री डॉक्टरशी लग्न केल्यानंतर बर्लिनलाच स्थायिक झाला. थोरला मुलगा आहे. त्याच्या पाठोपाठ मुलगी झाली. असद अत्यंत

कुटुंबवत्सल गृहस्थ आहे. मित्रांना स्वतःच्या घरी बोलावतो. स्वतः स्वयंपाक करतो आणि भारतीय पद्धतीचे चवदार जेवण देतो. क्रांतीच्या नादाने भरकटलेली अशी माणसे जगभर विखुरलीत.

अवलची आणि माझी लीपझिगमधील ॲस्टोरिया हॉटेलातील एकाच अलिशान स्वीटमध्ये राहण्याची व्यवस्था झाली होती. नंतर नंतर ध्यानात आले की, महोत्सव समितीच्या जेवण भत्यात न्याहरी व फक्त एक जेवण खाणे शक्य होते. म्हणून रात्रीच्या जेवणासाठी पदरचे पैसे खर्च करावे लागायचे.

महोत्सव संपला. काही विशेष घडले नव्हते. सूटकेस घेऊन मी खाली उतरलो तेवढ्यात रिसेप्शनवरच्या बाईने बोलावले व माझा खोली नंबर विचारला. ती म्हणाली, “तुमच्या टेलिफोन बिलाचे दोनशे मार्क !”

“टेलिफोन ?” मी कधी कुणालाच फोन केला नव्हता. तिने नुसते खांदे उडवले. माझ्यापाशी तेवढे पैसे नव्हते आणि मी खरोखरच फोन केला नव्हता. काहीतरी घोटाळा झालेला असावा. म्हणून मी तिच्यापेक्षा जास्त उंच माझे खांदे उडविले. अखेर ती भानगड मिटली. तेव्हापासून एखाद्या हॉटेलमधून बाहेर पडताना माझे मन नेहमी धास्तावते. रिसेप्शनमधून पैशांची भलतीच मागणी व्हायची ! त्या वेळी दैव बलवत्तर होते म्हणून ठीक होते ! पण...

परतीच्या प्रवासात बर्लिनमध्ये राहायची सोय नव्हती. महोत्सव संपला होता. म्हणून महोत्सव समितीने हात वर केले होते. लीपझिगमधून बर्लिनला दुपारी पोहोचलो. एका प्रशस्त हॉटेलच्या व्हरांड्यात माझ्यासारखे ‘कंगाल’ पाहुणे सामानासह बसले होते. तेथे असदुल्ला मदतीला धावला. त्याने मला त्याच्या घरी नेले. चांगले जेवू-खाऊ घातले. घरात त्याची तान्ही मुलगी होती. ती मुलगी आणि त्याची बायको दिसल्या नाहीत.

बर्लिन ते मॉस्को प्रवास बिनबोभाट घडला. पुढे मॉस्कोत दादांच्या मृत्यूची वार्ता देणारी तार माझी वाट पाहत होती.

त्या धक्क्यातून सावरताच मी भारतात जाण्याची तयारी केली. विमानाच्या तिकिटासाठी पैसे आवश्यक होते. मार्गोने ॲडव्हान्स वगैरेची सोय ताबडतोब केली. ‘एअर इंडिया’च्या ऑफिसने सीट देऊ केली. तेव्हा कर्मचारी तत्परतेने काम करीत. पुण्यात जाऊन एकूण निरवानिरव करायला हवी होती. धाकटा भाऊ अभय एकटा होता. आश्चर्य म्हणजे तो या प्रसंगी धीराने आणि

समजूतदारपणे वागला होता. दादांच्या अंत्यसंस्कारांची जबाबदारी त्याने पार पाडली होती. दादांचा अकाऊंट ज्या बँकेत होता त्या बँकेत गेलो. योगायोग म्हणजे नव्या हप्त्याचे पैसे त्यांच्या मरणाच्या दिवशीच दुपारी आले होते. डॉक्टरांची बिले द्यायची होती. दादांच्या अकाऊंटमध्ये माझेच पैसे अडकले होते. त्यासाठी कोर्ट, वकील वगैरेसाठी अभयने धावपळ केली. श्री. चारुदत्त सरपोतदारांनी त्याबाबत फार मदत केली. बधिर मनाने मी यंत्रवत वागत होतो. भावनांचे उमाळे वगैरे आले नाहीत. कठोर, रूक्ष व्यवहाराला तोंड द्यायचे होते. 'यासीन मंझिल' मधील आमची राहती जागा मला शापित भासायची. तिचे भाडे नाममात्र होते. तरीही अभयच्या तुटपुंज्या पगाराला ते झेपणार नाही अशा विचाराने त्याच्यापाशी आगामी दोन-तीन वर्षांचे भाड्याचे पैसे मी दिले. पुढे विधिलिखितात काय घडणार हे आम्हा दोघांना त्या वेळी कसे ठाऊक असणार ? जे घडले ते कल्पितापेक्षा फार भयानक ! दादा आणि ताई यांचे मृत्यू मी प्रत्यक्ष पाहिले नव्हते. अभयने दादांचा मृत्यू पाहिला होता. ह्या मृत्यूंनी आणि 'यासिन मंझिल'च्या जागेने पुढची चौदा वर्षे दुःस्वप्नांमार्फत माझा छळवाद केला.

*

## ओदेस्सा ‘कपितान नेमो’

बधिर मनःस्थितीत भारत सोडून मॉस्कोला परत जायला मी निघालो. आतापर्यंत माझ्या डोक्यावर काळे आणि दाट केस होते. गेल्या दोन महिन्यांत केस पांढरे व्हायला सुरुवात झाली. लौकरच सारे केस पांढरे झाले. ताईप्रमाणेच मी अकाली म्हातारा दिसू लागलो.

भारतात आता माझी श्रीशिल्लक शून्य होती. राहायला मालकीची जागा नव्हती. मॉस्कोतील जीवनाचे रम्य चित्र नव्हते. तरीही पुढील जीवनासाठी जायला हवे होते. पुन्हा मनाची घुसमट सुरू झाली. पण ह्या भावना मी कुणापाशीही सारखा उगाळत नव्हतो. उलट माझी लोकांमध्ये प्रतिमा होती ती एक छानछोकी, रंगेल, बिनधास्त कलावंत तरुण माणूस. काही बिघडत नव्हते. आपल्या दुःखाचे रडगाणे गाऊन लोकांना कशाला वैताग द्यायचा ? प्रत्येकाला आपापली ओझी न्यायची असतात. दादा दारू न पिता लिव्हर सिऱ्हॉसिसने ५५ व्या वर्षी वारले होते आणि ताई ५३ वर्षांची होती. तसे माझे लहानपणी लाड झाले नव्हते. ताई सारखी आजारी म्हणून तिच्या अंगाखांद्यावर खेळणे कधी शक्य झाले नव्हते. दादा नेहमी स्वतःच्या लेखनात आणि नोकरीत मग्न. त्यांचा स्वभाव रखरखी फार. कधी समाधान नाही. मी वयात आल्यानंतर मला त्यांचे वागणे पटत नव्हते. लहानपणी ताई-दादांचा मी मार खाल्ला नाही.

मॉस्कोत परतलो तेव्हा हिवाळा कडक होता. तमारा आणि ईगर माझी वाट पाहत होते. त्यांना पाहून मनाला बरे वाटले. लौकरच नित्यक्रम सुरू झाला. ह्या हिवाळ्यात माझ्यापाशी सुयोग्य कपडे होते. रस्त्यावर अर्ध्या तासापेक्षा जास्त

वेळ थांबायचे नाही हे मी कटाक्षाने पाळत होतो. अधून मधून एखाद्या मेत्रो स्टेशनचा पटकन आडोसा घ्यायचा. हातांमध्ये परत ऊब आल्यानंतर पुढे चालू लागायचे.

प्रकाशन गृहातील काम झेपेना म्हणून तमाराने नोकरी सोडली. त्या वेळी नवी नोकरी मिळणे सोविएत नागरिकांना सोपे होते. अनेक कचेऱ्यांबाहेर पाट्या लागायच्या 'पाहिजेत'. पण हवी तशी नोकरी लौकर मिळायची नाही. तमाराने काही महिने बेकारी अनुभवल्यानंतर कुठेतरी नवी नोकरी प्राप्त केली. पण ती खूष नव्हती. केवळ नोंदीसाठी ती ही नोकरी करायची. सोविएत नागरिकांनी पेन्शनीच्या वयापर्यंत नोकरी केली पाहिजेच असा कायदा होता. बायकांनी वयाच्या ५५ पर्यंत व पुरुषांनी ६० पर्यंत नोकरी केली पाहिजेच. मग नंतर सरकार पेन्शन देते. काही लोक किमान २२ वर्षे नोकरी केल्यानंतर पेन्शनपात्र ठरतात. अशा वेळी स्वस्थ बसले तर चालते. पण तसे कुणी स्वस्थ बसत नाही. उलट पेन्शननंतर काही लोक अर्धवेळ काम करतात. तमाराला नोकरी करणे आवडत नव्हते हे माझ्या ध्यानात आले होते. पण माझ्या कामाच्या स्वरूपामुळे मी सतत घरात असायचो. म्हणजे दोघे चोवीस तास एकत्र. मला ते नको होते. शिवाय तिच्या भावी हिताच्या दृष्टीने तिने नोकरी करणे इष्ट होते.

दोन-तीन महिन्यांनंतर तमारा माझ्यापाशी कुजबुजली. तिची पाळी चुकली होती. सोविएत बनावटीचे कंडोम वाईट असतात. शिवाय पुरुषांनी कंडोम वापरलेले रशियन स्त्रियांना आवडत नाही. त्या त्यांच्या पद्धतीने काळजी घेतात. कुठेतरी गडबड झाली होती पण ह्या गोष्टीचा तमाराने फार बाऊ केला नाही. रशियन स्त्रीचा एक स्वभावविशेष मला ठळकपणे दिसला. ती म्हणाली, "तू काळजी करू नको. चुकीला मीही जबाबदार आहे. मी डॉक्टरकडे जाईन. गर्भपात करून घेईन. इस्पितळात एक-दोन दिवस राहीन. मग घरी परत येईन." तसे ती खरेच वागली. तमाराची मूळची प्रकृती निरोगी असल्यामुळे लौकरच ती पूर्ववत वागू लागली.

ईगरपाशी मी ही गोष्ट बोललो. त्याची विशेष प्रतिक्रिया झाली नाही. ही बाब त्याने नित्याची मानली. नंतर नंतर माझ्या ध्यानात आले की, रशियन तरुणी खरोखरच ही बाब स्वतःची स्वतः निस्तरतात. केवळ दिवस राहिले म्हणून पुरुषांच्या गळ्यात पडत नाहीत. सेक्समध्ये पुरुषाला जसा आनंद मिळतो

तसाच बाईलाही आनंद मिळतो अशी त्यांची विचारधारा आहे. म्हणून तर मुक्त संभोग जीवनात काही तरुणी पुढाकार घेतात. आवडत्या पुरुषाबरोबर कामजीवन अनुभवतात. अर्थात हा सार्वत्रिक निष्कर्ष नव्हे. प्रत्येकजण आपापल्या स्वभावानुसार वागते. पण गर्भपात रीतसरपणे नोंदला जातो. सरकारी इस्पितळांमध्ये रीतसरपणे गर्भपात केले जातात. अर्थात तरुणीचे वय अठरा वर्षे पूर्ण असले पाहिजे. काही वेळा अल्पवयीन मुलींच्या पालकांची संमती घेतात. जर स्त्रीच्या प्रकृतीला गर्भपात अपायकारक असेल तर डॉक्टर तसे करण्यास नकार देतात. आमच्या कचेरीतील काही तरुणी गर्भपात केल्याबद्दल बिनदिक्कतपणे उघड सांगायच्या. जसे आपल्याकडील बायका स्वतःच्या बाळंतपणाबद्दल सांगतात तसेच त्या सुरात काही बायका स्वतःच्या गर्भपातांबद्दल सांगायच्या. माझ्या मनात आले की, जर मुलगी झाली असती तर तिचे नाव तनिला ठेवायचे. पण भावनावश होणे शक्य नव्हते. अनेक गुंतागुंती उद्‌भवल्या असत्या. रशियात मी कायम स्थायिक होईन अशी आरंभी तरी चिन्हे दिसत नव्हती. आधीच जुईसाठी जीव आसुसत होता. मग जीवाची आणखी कुतरओढ झाली असती. तमाराच्या चटकन निर्णयामुळे सारे सुरळीत पार पडले. बस्स. आमच्या बाबतीत सोळा वर्षांच्या सहजीवनात एकदाच असे घडले.

एक दिवस अनुक्रियेव यांनी इगोर यूदिन नावाच्या तरुण रशियन चित्रकाराला माझ्याकडे पाठविले. सोनेरी केसांचा आणि सोनेरी दाढीचा इगोर हसतमुख तरुण होता. मुलांसाठी असलेल्या पुस्तकांमध्ये चित्रे काढायचा. त्याचे सासरे अदेस्सा फिल्म स्टुडिओमध्ये कॅमेरामन होते. त्यांनी इगोरला एका नव्या चित्रपटाचे कला-दिग्दर्शनाचे काम आणले होते. ज्यूल व्हर्नच्या ‘कॅप्टन नेमो’ कादंबरीवर तीन भागांची टेलिफिल्म तयार होणार होती. हा नेमो म्हणे नानासाहेब पेशवा अशी कल्पना केली होती. कॅ. नेमो आपल्या नॉटिलस पाणबुडीतून हिंदुस्थानच्या किनाऱ्याला येतो. तेथे १८५७ च्या बंडातील शिपाई त्याला भेटतात असा प्रसंग होता. ह्यासाठी दिग्दर्शक लेविन यांना एका भारतीय सल्लागाराची आवश्यकता होती. इगोर यूदिनला जेव्हा अनुक्रियेव यांच्याकडून समजले की, प्रकाशन गृहात माझ्यासारखा भारतीय धंदेवाईक नट आहे, तेव्हा तो माझ्यापाशी विचारणेसाठी आला. अदेस्सा बघायची संधी होती.

मी होकार दिला.

मॉस्कोपासून दोन तासांच्या हवाई प्रवासानंतर युक्रेन प्रजासत्ताकातील काळ्या सागरतीरी वसलेल्या अदेस्सा बंदरगावी मी पोहोचलो. सोविएत चित्रपटसृष्टीचा इतिहास वाचताना मला अदेस्साबद्दल थोडीशी कल्पना होती.

जगप्रसिद्ध सोविएत चित्रपट दिग्दर्शक सेर्गेय इझेन्श्तीन यांच्या 'युद्धनौका पत्योमकिन' चित्रपटात चित्रित केलेला अदेस्सा बंदराजवळच्या पायऱ्यांवरचा प्रसंग अजरामर ठरलेला आहे. अदेस्सा हे खास बंदरगाव आहे. हसतमुख खलाशी दिसतात. गावातील माणसे चतुर वागतात. अदेस्साचे ऑपेरा थिएटर ऐतिहासिक महत्त्वाचे आहे. अदेस्सा फिल्म स्टुडिओचे चित्रपट बव्हंश पश्चिमी कथा-कादंबऱ्यांवर आधारलेले असतात. युक्रेनी तरुणी गोल चेहऱ्यांच्या लांबसडक केसांच्या दिसल्या. त्यांच्या गालांवरच्या खळ्या नजरेत भरल्या.

अदेस्सा विमानतळावर माझ्या स्वागतासाठी इगोर व स्टुडिओतील एक सहदिग्दर्शिका आली होती. गावात काही फरसबंदी रस्ते दिसले. ट्राम धावत होत्या. उन्हाळ्याचे दिवस होते. हवा छान होती. मॉस्कोपेक्षा जरा जास्त उबदार. युक्रेनी भाषा रशियनच्या आसपास भासली. रशियन माणसे 'ह' च्या जागी 'ग' म्हणतात. उदा. हिमालय म्हणण्याऐवजी 'गिमालय' म्हणतात. याउलट युक्रेनी माणसे 'ग' च्या जागी 'ह' म्हणतात. इगोर ऐवजी 'इहोर' उच्चारतात. अदेस्सा स्टुडिओ सर्वसामान्य फिल्म स्टुडिओंसारखा वाटला. दिग्दर्शक लेविन यांनी ताबडतोब स्वतःच्या घरी मला नेले. 'कपितान नेमो' चित्रपटाची स्केचेस त्यांनी तयार केली होती. भारतीय रीतीरिवाज, हालचाली इत्यादी गोष्टींविषयी त्यांनी चौकशी केली. बोलता बोलता ते म्हणाले, "उद्या तुमचा मेक-अप करू. मग स्क्रीन टेस्ट घेऊ. उद्या सकाळी स्टुडिओत या." मला हे अनपेक्षित होते. मी सल्लागार म्हणून काम करायला आलो होतो, नट म्हणून नव्हे. मी एका मराठा शिपायाची भूमिका करावी अशी लेविन यांची इच्छा होती. तेव्हा त्यांच्या इच्छेप्रमाणे दुसऱ्या दिवशी स्क्रीन टेस्टसाठी स्टुडिओत हजर झालो. फक्त मिशा लावल्या आणि डोक्यावर फेटा बांधला. कॅमेरासमोर उभा राहिलो. फक्त डोळ्यांनी बोललो. सारे खूष. बाहेर पडताना पुन्हा यायचे निमंत्रण मिळाले. प्रवासखर्चाबरोबर स्क्रीन टेस्टचे पैसे मिळाले. सोविएत संघात तशी पद्धत आहे. अगदी मोठमोठ्या कलावंतांनासुद्धा एखाद्या भूमिकेसाठी मेकपमधील स्क्रीन

टेस्ट द्यावी लागते. त्याबद्दल पैसे मिळतात. कलावंतांच्या पगारांच्या श्रेणी असतात. मोबदला किरकोळ असतो. अवाच्या सवा रकमा नसतात. स्टुडिओत येताना किंवा घरी जाताना वाहनखर्च स्वतः करावा लागतो. शूटिंगच्या वेळी स्वतःचे जेवण आणायचे किंवा कॅंटीनमध्ये आपल्या जेवणाचे आपणच पैसे द्यायचे. असा साधा सोपा व्यवहार होता. सुमारे महिन्यानंतर परत अदेस्साला यायचे होते. शूटिंग सुरू होणार होते.

एक महिन्यानंतर अदेस्साला परत आलो. माझ्या हातात 'कपितान नेमो' चित्रपटाचे करारपत्र होते. माझ्या वाढदिवसाच्या आधी आठ दिवस मी आलो होतो. या वेळी आऊटडोअर शूटिंग होते. स्टुडिओच्या बसमधून अदेस्सापासून सुमारे २०० कि.मी. अंतरावर असलेल्या 'ब्येलगोरद झेस्त्रोवस्की' नावाच्या एका छोट्या गावी आलो. वाटेत युक्रेनचे सृष्टिसौंदर्य पाहायला मिळाले. 'कश्तान'ची झाडे म्हणजे चेस्नटची झाडे रस्त्याच्या दुतर्फा फुलली होती. ब्येलगोरद लिमान नावाच्या विस्तीर्ण नदीच्या तीरावर वसले होते. ह्या तीरापाशी चौदाव्या शतकात बांधलेला एक तुर्की किल्ला आहे. हाच आमच्या चित्रपटातील हिंदुस्थानी किल्ला होता. त्याच्या तटाच्या आसपास ताडाची एक-दोन झाडे लावली आणि कॅप्टन नेमोची नॉटिलस तीरावर उभी केली. चित्रपटाची पार्श्वभूमी तयार झाली. इगोरने घारापुरीचे मोठे कट आऊट तयार केले होते. ढोबळ मानाने हिंदुस्थानी वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न होता.

मी परदेशी पाहुणा म्हणून माझी खास बडदास्त राखण्यात आली. गावातील एकमेव हॉटेलच्या इमारतीत माझी राहण्याची व्यवस्था होती. खुद्द दिग्दर्शक लेविन यांची एका टुकार घरात राहण्याची व्यवस्था होती. मला माझ्या बडदास्तीबद्दल लाज वाटली. पण शूटिंग संपल्यानंतर लाजेची भावना पटकन पळून गेली. कारण हॉटेलचे भाडे माझ्या कराराच्या पैशांमधून कापून घेतलेले होते. खास युक्रेनी झटका ! !

सकाळी दहा वाजता शूटिंग सुरू झाल. लेविन यांची चित्रणाची पद्धत इझेन्श्तीन धर्तीची होती. ही पद्धत मला पपा जागीरदारांमुळे परिचयाची होती. म्हणून अडचण काही आली नाही. मला संवाद नव्हतेच. पण घोड्यावर बसण्याच्या वेळी पेच उद्‌भवला. खरे म्हणजे मी नट कसा झालो ह्याचे कधी कधी माझे मलाच आश्चर्य वाटायचे. पोहता येत नाही, मोटार वा स्कूटर चालवता

येत नाही, घोड्यावर बसता येत नाही, होडी वल्हवता येत नाही ! नुसते बोलता यायचे. आणखी एका प्रसंगात नवा पेच निर्माण झाला. उंच तटावरून खूप खोल असलेल्या अंधारकोठडीत दोरावरून शिपाई उडी मारतो. अखेर डबल वापरावा लागला. सूर्यास्तानंतर पेटत्या मशालींचा शॉट अप्रतिम झाला.

पहिल्या दिवशी शूटिंगच्या धांदलीत गव्हाळी रंगाच्या खळीदार गालांच्या ओल्गा नावाच्या युक्रेनी तरुणीची ओळख झाली. ऐतिहासिक किल्ला पाहायला येणाऱ्या पर्यटकांसाठी गाईड म्हणून ती काम करीत होती. मला ती एकदम आवडली. एव्हाना माझ्या ध्यानात आले की, विविध स्त्रियांचा सहवास मला आवडायचा. त्यांच्याशी कामक्रीडा करण्याचा छंद लागला होता. पूर्वी ऐन तारुण्यात वासना फार उफाळून यायच्या. त्यांना वाट देण्यासाठी वेश्यागमन घडायचे. नंतरचे बेबंद एकाकी जीवन. पण खरे तर आता तमाराशी प्रतारणा करून मुक्त लैंगिक जीवन जगण्यासारखे भरीव कारण नव्हते. ज्या अर्थी मी तसे जगत होतो त्या अर्थी ही माझ्या स्वभावातील फार मोठी उणीव होती. बेछूट, मुक्त लैंगिक जीवन जगण्याची माझ्यात ही प्रवृत्ती कशी निर्माण झाली याचे माझे मलाच आश्चर्य वाटायचे. अर्थात सहजगत्या एखादी तरुणी प्राप्त झाली तरच तिच्यावर झडप घालत होतो. तरुणीच्या पाठी धावणे, लाळघोट्याप्रमाणे तिचा अनुनय करणे जमत नव्हते. रशियात तरुणी पटकावण्यात एव्हाना मी पटाईत झालो होतो. पिकलेल्या केसांसह आणि किंचित सुटलेल्या पोटासह माझे व्यक्तिमत्त्व तरुणींना आवडत होते.

ओल्गाला संध्याकाळी हॉटेलवर बोलावले. 'बैलाचे रक्त' नावाच्या हंगेरियन मदिरेसह सात रात्री तिच्या सहवासात घालविल्या. अर्थात मी तिच्या जीवनातील पहिला पुरुष नव्हतो. अशा ओळखींमध्ये निरोप घेताना पत्ता देण्याचा वा घेण्याचा मूर्खपणा या वेळी मी केला नाही. पुन्हा कधी न भेटणे सर्वांत उत्तम.

कॅप्टन नेमोची भूमिका विख्यात रशियन नट व्लादीमीर द्राझेंस्की करीत होता. बटबटीत डोळ्यांचा हा टक्कलवाला नट माझ्याशी अलिप्त वागला. रशियन नटांचे आणि लेखकांचे असे अलिप्त वागणे माझ्या परिचयाचे झाले होते. परदेशी लोकांशी हे लोक जरा भिऊन वागतात. याउलट अभिनेत्री बिनधास्त वागायच्या. ताश्कंद चित्रपट महोत्सवाच्या वेळी चार-पाच किर्घिझ

सिनेमावाल्यांबरोबर फिरणाऱ्या लेखक चिंघिझ ऐत्मातोव यांच्याशी मी मुद्दाम परिचय करून घेतला. पण ते थंड वागले. जर सरकारमार्फत औपचारिक भेट ठरली असेल तरच लेखक व नट भेटतात. जेव्हा हे लोक भारतात येतात तेव्हा आपली माणसे पाघळून जातात. त्यांना मिठ्या मारतात, आपल्या घरी जेवायला बोलावतात आणि लपेटदार सह्या करून पुस्तके भेट देतात. रशियात टेलिफोन डिरेक्टरी नसते, तेव्हा घरचा टेलिफोन नंबर मिळणे महाकठीण. रशियनांना खरे कौतुक अमेरिकनांचे आणि त्यांच्याजवळच्या डॉलर्सचे.

हा द्वार्झेस्की स्वतःच्या तीन-चार बायकांच्या मुलांसाठी पोटगी देत होता. ती चुकवावी म्हणून मॉस्कोबाहेरच्या स्टुडिओंची कामे आनंदाने स्वीकारायचा असे मी ऐकले. खरे-खोटे कुणास ठाऊक. वयाच्या चाळिशीत हृदयविकाराच्या झटक्याने तो वारला.

अदेस्सा स्टुडिओने पैसे देण्याच्या बाबतीत मुंबईच्या चित्रनिर्मात्यांवर वरताण केली. शेवटच्या हप्त्याचे पैसे त्यांनी कधीच दिले नाहीत. पैसे बुडाल्याचे सुख-दुःख मला नव्हते. नवे अनुभव पदरी पडले आणि अदेस्साच्या दोन सफरी मोफत झाल्या हेही नसे थोडके.

चार-पाच वर्षांनंतर याच स्टुडिओसाठी व दिग्दर्शकासाठी 'पेतल्या आरीओन' म्हणजे 'ओरायनचे कडे'नामक वैज्ञानिक अजबकथेवर आधारलेल्या चित्रपटात 'यूनो'च्या अध्यक्षांची भूमिका मी केली. शूटिंग मॉस्कोत फक्त एक दिवसाचे झाले. पूर्वीचे पैसे मिळालेच नाहीत.

*

★ **'दोन्ही घरचा पाहुणा'** : मुंबईतील 'मेट्रो' सिनेमात उद्घाटन प्रसंगी (डावीकडून) श्रीकांत मोघे, दर्शना, संजीवकुमार, आशा पोतदार व अनिल



★ **'दोन्ही घरचा पाहुणा'** : अनिल कृष्ण!

★ **'दोन्ही घरचा पाहुणा'** : पुण्यातील 'नटराज' चित्रपटगृहात (१९७१)



संगी
निल

★ **'यालाच म्हणतात प्रेम'** : अनिल व उमा.

★ **'चिमण्यांची शाळा'** : राजा गोसावी व रिक्रूट ऑफिसरच्या भूमिकेत अनिल

)





★ पिचुंदा येथे 'मायाक' हॉटेलसमोर कॉकेशियन पोशाखात अनिल

★ तमाराचं एक रूप



★ प्रगती प्रकाशनात -
दाढीवाले फ्योद्र फ्योद्रविच अनुफ्रियेव,
एक बंगाली तरुण अनुवादक,
सौ. स्वेतलाना भौमिक, खाली बसलेला अनिल



★ 'अनिल-तमारा, मॉस्कोतील



★ 'प्रणयाचे पहिले दिवस' : छाया इगर अलेक्सांद्रोव,

★ अदेस्सा स्टुडिओजच्या 'कॅप्टन नेमो' या चित्रपटातील एका भूमिकेत अनिल (१९७५)

★ रशियन हिवाळ्यात मॉस्को शहराजवळील अरखांगगेलस्कोये भागात मजा लुटताना.

★ क्रिमियात युक्रेन सॅनिटोरियमच्या आवारात अनिल - तमारा

★ अनिल, तमारा - पिचुंदा येथे
काळ्या सागरतीरावर (१९७८)



★ मॉसफिल्म स्टुडिओत रशियन अभिनेत्री लुदमिला कसात्किना हिच्या समवेत अनिल

# मॉस्को चित्रपट महोत्सव आणि स्कॅन्डीनेविया

पूर्वी भारतात असताना मॉस्को आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाबाबत मला फार आकर्षण वाटायचे. जेव्हा मॉस्कोत १९७३ साली प्रथम आलो तेव्हाचा महोत्सव थोडक्यात हुकला होता. माझ्या आगमनापूर्वीच चार दिवस महोत्सव संपला होता.

१९७५ साली मॉस्को चित्रपट महोत्सवाला हजर राहण्याची संधी 'नोवोस्ती'ने मला दिली. आता मी स्थानिक पत्रकार होतो. म्हणून इतर सोविएत पत्रकारांबरोबर उलीत्सा वारोवस्कायावरच्या ॲक्टर्स स्टुडिओ थिएटरमध्ये रशियन कॉमेंट्रीसह मला चित्रपट बघायला मिळत होते. ही थोडीशी डावी वागणूक होती. महोत्सवाचे मुख्य स्थळ 'रोस्सिया' हॉटेलातील सेंट्रल कन्सर्ट हॉल येथे होते. तीन हजार उत्तम आसनांचा हा सुशीतल हॉल सुंदर आहे. निदान तो पाहण्यासाठी कुठल्याही कार्यक्रमाला जायला हरकत नाही. त्याच्या दुसऱ्या मजल्यावरील कॅफेत आईस्क्रीम आणि मश्रूमपासून बनविलेला जुलीयन नामक पदार्थ खाण्यात मजा येते.

साधारणतः जुलै महिन्यात मॉस्को चित्रपट महोत्सव सुरू होतो. उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळे हवा छान असते. क्वचित पावसाची सर आल्यानंतर गारवा येतो. महाप्रचंड 'रोस्सिया' हॉटेलच्या पूर्व विभागात भारतीय पाहुणे मुख्यत्वे राहत होते. छातीवर बिल्ला असल्याविना कडेकोट पोलिस बंदोबस्तामधून आत जाणे मुश्कील. तरीही भुरटी मंडळी आढळायची. महोत्सवातील अमेरिकन व फ्रेंच चित्रपटांच्या खेळांना तुडुंब गर्दी व्हायची. मॉस्को महोत्सवात भारतीय

प्रतिनिधींना विशेष महत्त्व मिळत नव्हते. ताश्कंद महोत्सवापेक्षा इथले वातावरण जास्त पश्चिमी. इथली फिल्मी बाजारपेठ जास्त प्रभावी.

साठेसाहेब अर्थातच आले होते. फोनवरून त्यांच्या खोलीचा नंबर वगैरे समजला होता. नंतर दोन्ही बासू व गुलझार यांच्या भेटी झाल्या. या वेळी संजीवकुमार आला होता. जुनी ओळख पुन्हा उजळली.

माझ्याकडे 'दोन्ही घरचा पाहुणा'चे मुंबईतील प्रीमियरचे फोटो होते. त्यात संजीवकुमारला पाहून तमारा म्हणाली, "हा खरा सुंदर नट !" त्या क्षणापासून ती त्याची फॅन बनली होती. म्हणून सर्वांना घरी जेवायला बोलावण्याचा बेत ठरला. चित्रपटांच्या प्रदर्शनामुळे, इतर ठरलेल्या कार्यक्रमांमुळे रात्री अकरा-साडेअकराची वेळ ठरली. खरे तर मॉस्कोतील प्रघाताच्या तुलनेने हा फार उशीर होता. पण इलाज नव्हता. माझ्यापाशी स्वतःची मोटार नव्हती. इतक्या लोकांना एकदम जाण्यास टॅक्सी मिळेनात. म्हणून मेत्रो आणि ट्राम यांचा आधार घेतला. सर्वांना मेत्रोबद्दल कुतुहल होते.

आमच्या छोट्याशा अपार्टमेंटमध्ये त्या रात्रीचे जेवण रंगले. तेव्हापासून दोन्ही बासू जेव्हा जेव्हा मॉस्कोत येत तेव्हा तेव्हा मित्रांसह आमच्याकडे येत. साठेसाहेबांची हजेरी अर्थातच असायची. संजीवकुमारला आम्ही शेवटचे पाहत होतो ह्याची त्या वेळी कल्पना नव्हती. त्याच्यावर खूष झालेल्या तमाराने निरोपाच्या वेळी त्याला एकदम जवळ ओढले आणि त्याच्या गालाचे चुंबन घेतले. बिचारा संजीवकुमार माझ्याकडे चोरटी नजर टाकून लाजला. ह्या माणसांच्या सहवासात दहा दिवस छान गेले. अभिनेत्री विद्या सिन्हा दिदीचे पत्र घेऊन आली. म्हणून 'लेनिन हिल' तिला दाखवायला घेऊन गेलो. सांगाती शबाना आझमी आली. त्या वेळी ती नवखी होती. लेनिन हिलवरून मॉस्कोचे विहंगम दृश्य रमणीय दिसते. मागेच मॉस्को विद्यापीठाची भव्य इमारत उभी आहे. तिचे बांधकाम जर्मन युद्धकैद्यांनी केले म्हणे. लेनिन टेकडीच्या पायथ्यापाशी मस्क्वा नदीतीरावर रॉकेट बोटीत बसायचे आणि थेट 'रोस्सिया' हॉटेलपाशी उतरायचे. 'रोस्सिया' हॉटेल लाल चौकाजवळ आहे.

क्रेमलिनच्या परिसरातील काँग्रेस प्रासादात मॉस्को चित्रपट महोत्सवाचा उद्घाटन सोहळा असतो. तेथेच महोत्सवाची सांगता होते. सहा हजार आसनांचा सुशीतल हॉल भव्य आणि सुखद वाटतो. नंतर क्रेमलिनमधील

गेओर्गी हॉलमध्ये शानदार मेजवानी झडते. या प्रसंगांना हजर राहताना मनात सार्थक भावना उमटली. एक वेगळेच वातावरण निर्माण होते. जीवन सर्वसामान्य पातळीवरून किंचित वर चढते. महोत्सव संपल्यानंतर पुन्हा दैनंदिन कामात अडकायला मन अनुत्सुक बनते. तरीही जमिनीवर पाय टेकवावे लागतात. थोडक्यात गंमत असते. अविस्मरणीय क्षणचित्रे मनःचक्षूंसमोरून झराझरा सरकत जातात. त्यांचे चित्रण करण्यास काही वेळा लेखणी असमर्थ ठरते. त्या वेळी भारतात आणीबाणीचा काळ जाहीर झालेला होता. भारतीय प्रतिनिधी काहीशा दडपणाखाली दिसत होते. गुलझारचा 'आँधी' चित्रपट महोत्सवात आधी दाखविणार होते. ऐन वेळी त्याला वगळण्यात आले. शांत धीरगंभीर वावरणाऱ्या गुलझारने विशेष प्रतिक्रिया व्यक्त केली नाही.

खरे म्हणजे दोन्ही बासू आणि गुलझार मूळ डाव्या विचारसरणीचे. सोविएत संघ त्यांचे चित्रपट विकत घेईल अशी त्यांना प्रथम आशा वाटत होती. पण कालांतराने या बाबतीत त्यांचा भ्रमनिरास झाला. त्यापेक्षा कलकत्त्याच्या मृणाल सेननी एकदा बाजी मारली. एका महोत्सवात त्यांच्या 'मृगया'ला पारितोषिक मिळाले. त्या वेळी 'मृगया'चा नायक नवा नट मिथुन चक्रवर्ती होता. रंगमंचावर जाण्यासाठी मिथुनपाशी तेव्हा योग्य कपडे नव्हते. शशी कपूरने स्वतःजवळची शाल त्याला दिली. मृणाल सेन यांच्या मुलाखतींमध्ये श्री. सत्यजित रे यांच्याबद्दल असूया उमटत होती.

मॉस्को चित्रपट महोत्सवांना श्री. सत्यजित रे आमंत्रण असूनही कधी आले नाहीत. कालांतराने त्यांचा तेथे गौरव करण्यात आला. दर दोन वर्षांनी मॉस्को चित्रपट महोत्सव भरतो. अशा रीतीने १९८१ पर्यंत मी हजेरी लावली. हळूहळू त्यातील स्वारस्य कमी होत गेले. एकदा बासु चतर्जी ज्यूरी होता. चित्रपट पाहताना त्याला चक्क झोप लागायची. सतत खूप सिनेमा पाहून पाहून माणूस थकतो. त्याच्या शेजारी बसलेली त्याची बायको त्याला जागे करायची. दुसऱ्या वेळी बासू भट्टाचार्य ज्यूरी होता. निकाल जाहीर करण्याच्या वेळी रशियन लोकांशी त्याचे मतभेद झाले. 'तेहरान ४३' या चित्रपटाला त्या वर्षी पारितोषिक देण्यात आले. महोत्सव समितीमधील रशियनांनी ज्यूरींवर दडपण आणण्याचे प्रयत्न केले. आपला बाणेदार बासू बधला नाही. एकदा-दोनदा अमोल पालेकर आणि स्मिता पाटील महोत्सवाला पाहुणे म्हणून आले होते. जब्बार पटेल आला

होता. नॅशनल फिल्म डेव्हलपमेंट कॉर्पोरेशनच्या सौ. मालती तांबे-वैद्य यांच्याशी भेट घडली. पुढे पुढे साठे साहेबांमुळे त्यांच्याशी परिचय दृढ बनला. बाई गप्पा मारायला दिलखुलास. आमच्याकडे जेवताना म्हणाल्या :"मला सर्व पचतं. पोट म्हणजे जातं आहे." महोत्सवानिमित्त चित्रपट क्षेत्रातील माणसांशी संपर्क राहिला. मॉस्कोच्या एकसुरी जीवनात तेवढाच विरंगुळा !

एक-दोन वर्षांच्या अवधीत माझ्या ध्यानात आले होते की, भारतीय प्रेक्षकांप्रमाणे सोविएत प्रेक्षकांची सुद्धा चित्रपटविषयक अभिरुची बिघडविण्यात आली होती. भारतातील गल्लाभरू हिंदी चित्रपट सोविएत संघाने विकत घेतले होते. उत्तम, कलात्मक, दर्जेदार बंगाली चित्रपट इथे माहीत नव्हते. सत्यजित रे यांचे नाव फक्त चित्रपट समीक्षकांना माहीत होते. सर्वसामान्य प्रेक्षक म्हणायचे, तुमच्या चित्रपटांमध्ये गाणी चांगली असतात. गोष्टी एकाच ठशाच्या वाटतात. बायका रडतात. त्यांचे म्हणणे खरे होते. पण प्रेक्षक कधीही मूर्ख नसतात. हेच प्रेक्षक उत्तम फ्रेंच चित्रपटांना गर्दी करायचे. ग्रेगरी पेकच्या 'मॅकेन्नाज गोल्ड'ने मॉस्कोत उत्पन्नाचे विक्रम केले. नंतरच्या काळात '३६ चौरंगी' ह्या शशी कपूरनिर्मित चित्रपटाला पहिल्या वीस मिनिटांत चित्रपटगृह ओस पडलेले मी पाहिले. फार वाईट वाटले. 'मेस्त इ झाकोन' म्हणजे 'सूड आणि कायदा' या नावाने 'शोले' लोकप्रिय बनला. तीन-चार वर्षांपूर्वी मिथुन चक्रवर्तीचा 'डिस्को डान्सर' तुफान लोकप्रिय बनला होता. सर्वांत आवडता परदेशी नट म्हणून तरुण सोविएत प्रेक्षकांनी त्याची निवड केली. 'इक्रान' म्हणजे 'रुपेरी पडदा' या चित्रपटविषयक पाक्षिकाने ही निवड जाहीर केली होती.

मॉस्को चित्रपट महोत्सव संपल्यानंतर पूर्वयोजनेप्रमाणे हेलसिंकी, स्टॉकहोम, कोपेनहेगेन या शहरांना पाहण्यासाठी मी आगगाडीने निघालो. ह्या प्रवासात सोबत पुण्याचा विजय दरेकर नावाचा तरुण होता. ह्यापूर्वी पाच-सहा महिने विजय ओळखीचा झाला होता. तो अमेरिकेत स्थायिक झालेला होता. एका अमेरिकन कंपनीचा इंजिनियर म्हणून अमेरिकन-सोविएत संयुक्त प्रकल्पावर काम करीत होता. 'कमाझ' मालवाहू मोटारी तयार करण्याचा तो प्रकल्प होता. ना बेरेझनीये चेल्नी नावाच्या गावात हा प्रकल्प होता. विजय मधून मधून तेथे जायचा. मॉस्कोतील पेकिंग हॉटेलातील एक स्वीटमध्ये त्याचे कायम वास्तव्य होते. सुमारे दोन-तीन वर्षे काम करून पुढे तो अमेरिकेतील

पीटस्‌बर्ग शहरी कायम राहायला गेला.

विजयने उन्हाळ्याच्या सुटीचा बेत केला. त्या वेळी स्कॅन्डीनेवियातील देशांच्या व्हिसाची भानगड नव्हती. सरळ आत जायचे आणि तीन महिने पूर्ण होण्याआधी बाहेर पडायचे. मॉस्को ते कोपेनहेगेन किंवा मॉस्को ते ओस्लो आगगाडीचे स्वस्त तिकीट सोयीचे होते. बाहेरच्या जगाची विजयला ओळख होती. त्याच्यासमोर मी नवखा. म्हणून मी त्याला चिकटलो. त्याची संगत मार्गदर्शक ठरेल हा हेतू होता. कारण परक्या शहरातील संध्याकाळ भारतीय माणसाला युरोपात फार एकाकी, उदासवाणी वाटते. बर्लिन, लीपझिगच्या प्रवासात ही गोष्ट मला जाणवली होती.

प्रवासाचा पहिला टप्पा मॉस्को ते हेलसिंकी हा होता. रात्री दहाच्या सुमाराला आगगाडी सुटणार होती. दुसऱ्या दिवशी दुपारी तीन वाजता हेलसिंकीला पोहोचणार होती. आमची तिकिटे फर्स्ट क्लासची होती. माझे परतीचे तिकीट होते. पण विजय कोपेनहेगेनपासून विमानाने लंडनला जाणार होता आणि महिनाभरानंतर लंडनहून विमानानेच मॉस्कोला परतणार होता. कोपेनहेगेनपासून आगगाडीनेच मी एकटा मॉस्कोला परतणार होतो. एकूण प्रवास जेमतेम आठ दिवसांचा होता. कारण माझे बजेट छोटे होते.

आंतरराष्ट्रीय प्रवासाच्या रशियन आगगाडीत रेस्तराँ कारमधील कर्मचारी महाडँबीस असतात हे मला ठाऊक होते. आमच्या रेस्तराँकारचे कर्मचारी तसेच ठरले. त्यांनी आम्हाला जेवणासाठी दीड-दोन तासपर्यंत वाट पाहायला लावली. माझा पारा चढला. रशियन भाषेत त्यांची जोरदार खरडपट्टी काढली. आमच्याच टेबलावर बसलेल्या दोन फिन्निश तरुणी माझा चिडलेला अवतार पाहून चकित झाल्या. त्या जपानपासून थेट प्रवास करीत होत्या. सुमारे आठ-दहा दिवस त्यांचा प्रवास चाललेला होता. माझ्या रशियन भडिमारामुळे कर्मचारी नरमले. त्यांनी पटकन जेवण आणून दिले. जेवणानंतर फिन्निश मुलींपैकी एकीला दारू हवी होती. तिच्यापाशी रूबल कमी होते. उलट माझ्यापाशी भरपूर रूबल होते. सीमेपूर्वी ते संपवायची मला घाई होती. कारण रशियाबाहेर रूबल नेता येत नाहीत. सहप्रवाशांना मी आनंदाने मदत केली. कन्याकची बाटली मागविली. आम्ही चौघांनी काही वेळ तिचे घुटके घेतले. मनमोकळ्या गप्पा चालू झाल्या. त्या मुलींनी प्रांजलपणे सांगितले की, जपानमध्ये वेश्याव्यवसाय करायला त्या

गेल्या होत्या. फिन्लंडचा कडक हिवाळा टाळून त्या दर वर्षी जपानला जायच्या. भरपूर पैसे कमावून उन्हाळ्यात घरी परतायच्या. दोघींची लग्ने झाली नव्हती. जपानी पुरुषांना गोऱ्या बायकांचा फार नाद आहे म्हणे. टोकियोमधील एका बारमध्ये काम करताना दारू प्यायची त्यांना सवय लागली होती. म्हणून दारूची रोजची वेळ झाल्यानंतर त्यांना आता प्यायची तलफ आली होती. त्यांच्यापाशी दुसरेच चलन होते. त्यांनी मला ते देऊ केले. मला त्याचा उपयोग नव्हता. म्हणून मी नाकारले. थोड्या वेळानंतर आम्ही आपापल्या कूपेंमध्ये परतलो. जाताना एकीने दिलगिरी प्रदर्शित केली : "आठ-दहा दिवसांचा प्रवास झाला. आंघोळीची नीट व्यवस्था नव्हती. म्हणून तुझ्या चांगुलपणाची आज फेड करू शकत नाही." उत्तरादाखल मी हसलो. त्या वेळी माझा तसा मूड नव्हता. या प्रवासात उनाडक्या करण्याचा इरादा नव्हता.

दुसऱ्या दिवशी दुपारी फिन्लंडची सीमा आली. फिन्निश सीमारक्षकांनी पासपोर्ट वगैरे ओझरते पाहिले. गेल्या दोन वर्षांत रशियात वावरताना सारखा पासपोर्ट जवळ बाळगायची आणि समोरच्या अधिकाऱ्यांपुढे धरायची सवय मला लागली होती. स्वतंत्र आणि बंदिस्त जगामधील तो फरक होता. फिन्निश मुलींचे बाप व भाऊ त्यांच्या स्वागतासाठी सीमेवर आले होते. आम्हाला 'बाय बाय' करून त्या निघून गेल्या.

हेलसिंकी शहर प्रथमदर्शनी उदास वाटले. विजय हॉटेलच्या शोधात गेला. सुमारे तासभर त्याची वाट पाहत मी हेलसिंकी रेल्वे स्टेशनवर बसून होतो. विजयला हॉटेल शोधण्यासाठी बराच त्रास झाला होता. भाडे अपेक्षेपेक्षा बरेच जास्त होते. शिवाय ठायी ठायी पाट्या लागलेल्या 'खोलीत मद्यपानाला मनाई आहे ! रात्री अकरानंतर हॉटेलात आल्यास दरवानाला एक मार्क द्यावा लागेल !' फिन्निश लोकांच्या मद्यपानाला आळा घालण्यासाठी फिन्निश सरकारने मद्यपानविरोधी कडक उपाययोजना केल्या होत्या. फिन्लंडमध्ये मद्य खूप महाग होते. म्हणून फिन्निश पुरुष खास बसगाड्यांमधून लेनिनग्रादला दारू प्यायला येत असत. सीमेवरच्या फिन्निश लोकांना सोविएत व्हिसा सहजपणे मिळायचा. तसेच शेकडो फिन्निश हौशी प्रवासी बोटीने एस्तोनियातील ताल्लिन शहरी दारू पिण्यासाठी येत असत. फिन्निश मार्क हार्ड करन्सी असल्यामुळे सोविएत सरकारला फायदा मिळायचा.

त्या काळात स्कॅन्डिनेवियन देशांनी पोर्नो फिल्म व पोर्नो मासिके यांच्या मुक्त प्रसाराला मुभा दिली होती. त्यांचा हा प्रयोग यशस्वी झाला होता. कुठल्याही बंदीमुळे ती मोडायला मानवी स्वभाव उद्युक्त होतो. जर बंदी नसेल तर माणसे तिकडे ढुंकूनसुद्धा बघत नाहीत. स्थानिक लोकांना पोर्नो साहित्याबाबत आस्था वाटत नव्हती. माझ्यासारखे आशियाई हौशी पर्यटक तशा दुकानांमध्ये उत्सुकतेने जात होते. पोर्नो फिल्म शो दाखविणाऱ्या एका दुकानात तीन-चार वर्षांचा लहान मुलगा आपल्या आईबरोबर चॉकलेट विकत घ्यायला आलेला मी पाहिला. दोन दिवसांत पोर्नो फिल्म शोबद्दल माझे कुतुहल संपले. नंतर नंतर त्याची किळस वाटू लागली. काही काहींची कथाकल्पना मजेदार होती. या क्षेत्रात प्रेक्षक म्हणून ते माझे आरंभीचे दिवस होते.

कोणत्याही नव्या शहरात गेल्यानंतर प्रथम बसची सिटी टूर घेणे इष्ट. शहराची एकूण कल्पना येते. मग खास आवडलेल्या स्थळांना पुन्हा भेट द्यायची. हा क्रम मी नेहमी पाळतो. हेलसिंकीमध्ये ब्रेझ्नेवप्रणीत अखिल युरोपीय शांतता परिषदेची पूर्वतयारी चालली होती. शहरात अमेरिकन व रशियन वकिलातींच्या इमारती समोरासमोर पाहून मौज वाटली. फिन्लंडमध्ये कपडे व पादत्राणे फार महाग वाटली.

हेलसिंकीपासून टुर्कू बंदरापर्यंत आगगाडीने जायचे होते. टुर्कूपासून बोटीत बसून रात्रभर प्रवास केल्यानंतर स्टॉकहोमला पोहोचणार होतो. टुर्कू बंदरातील बोटीत बसण्यासाठी प्रवाशांची झुंबड उडाली. ड्यूटी फ्री दुकानात दारू विकत घेण्यासाठी लोक धावपळ करीत होते. शिवाय उघड्या डेकवर योग्य जागा धरून ठेवण्यासाठीही ती पळापळ होती. आम्ही अनभिज्ञ होतो. म्हणून उघड्या डेकवर सारी रात्र कशीबशी काढली. अखेर रेस्तराँच्या टेबलाशी खुर्च्या बसायला मिळाल्या. आमच्यासमोर एक जिप्सी तरुणी बसली होती. आणि तिच्या शेजारी एक स्वीडिश पत्रकार तरुणी होती. ह्या पत्रकार तरुणीमार्फत मला समजले की, स्कॅन्डिनेवियात जिप्सींना हिडीस फिडीस वागणूक मिळते.

मला आश्चर्य वाटले. सोविएत संघात याउलट परिस्थिती होती. सोविएत सरकारने जिप्सींच्या विकासासाठी खूप काही केले आहे. त्यांचे वेगळे थिएटर आहे. जिप्सी गाणी व नाच फार लोकप्रिय आहेत. फार पूर्वीपासून रशियात जिप्सींचे नाच व जिप्सी गाणी प्रचलित आहेत. जिप्सींची समजूत आहे की, ते

मूळचे भारतामधील आहेत. म्हणून एखादा भारतीय दिसला की ते त्यांच्या पाठी लागतात. पैसे मागणे किंवा चोऱ्या करणे या उद्योगांमुळे जिप्सी अप्रिय बनले आहेत. मॉस्कोत अशीच एक जिप्सी वयस्क बाई लोकांना फसवायची. टॅक्सी ड्रायव्हरशेजारी बसलेली ही बाई फूटपाथच्या कडेला टॅक्सी थांबवायची व हातातील पन्नास रूबलची हिरवी नोट दाखवून पैसे सुटे मागायची. भोळा माणूस तिला सुटे पैसे द्यायचा. मग त्याच्या ध्यानात यायचे की, बाई आणि पन्नास रूबलची नोट दोन्ही गायब ! विलक्षण हातचलाखी व्हायची. सुदैवाने मी कधी फसलो नाही.

श्वेतरात्र होती. समुद्रावर सुखद गारवा होता. व्हिस्कीचे घुटके घेता घेता स्वीडिश पत्रकार बाईबरोबर माझ्या गप्पा चालल्या होत्या. विजय बिचारा पेंगत होता. जिप्सी तरुणी माझ्याकडे व स्वीडिश तरुणीकडे टकामका पाहत होती. बोलता बोलता माझ्या ध्यानात आले की, जिप्सी बाईजवळ बसायला इतर प्रवासी टाळत होते. म्हणून आम्हाला जागा मिळाली होती. जिप्सींच्या समस्या सोडविण्याचे कार्य पत्रकार तरुणी मोठ्या हिरिरीने करीत होती. स्वीडनमधील एकूण समाजकल्याणविषयक कायदे ऐकल्यानंतर तेथे खरे समाजवादी सरकार होते अशी माझी खात्री पटली. रशियन नेते समाजकल्याणाची उगाच टिमकी वाजवीत होते. प्रत्यक्ष कामाचा पत्ता नाही आणि खोटा प्रचार. त्या प्रचाराला विकसनशील भारतासारख्या देशातील गरीब लोक फसतात.

स्टॉकहोम छान उल्हसित शहर दिसले. राहण्यासाठी विजयने स्वस्तातील होस्टेल प्राप्त केले. आमचा मुक्काम फक्त दोन दिवसांचा होता. बिछान्यावरच्या चादरी बदलायला एक भारतीय तरुणी आली. माझ्यातील पत्रकार जागा झाला. त्या तरुणीकडून समजले की, अनेक आशियाई तरुण-तरुणी स्वीडनमध्ये अशी हलकी कामे करीत होते. त्यांच्यात बव्हंश विद्यार्थी होते. हॉटेलमधील लाँड्रीचे कपडे गोळा करणे, रेस्तराँमध्ये वेटरचे काम करणे किंवा बशा विसळणे वगैरे कामे करीत. या तरुणांना निम्मे पगार मिळत. सोविएत संघात शिकणारे आशियाई विद्यार्थी उन्हाळ्याच्या सुट्टीत अर्थार्जनासाठी स्कॅन्डिनेवियन देशांमध्ये तीन महिने काम करीत. कालांतराने सोविएत सरकारने ह्यावर बंदी केली. कारण हे विद्यार्थी डॉलरचा काळा बाजार करीत. भारतीय, पाकिस्तानी, बांगला देशी व श्रीलंकन तरुण मंडळी वारंवार दिसत होती. काही स्वीडिश

तरुणींबरोबर लग्न करायचे आणि स्वीडिश नागरिकत्व मिळवायचे. पर्यायाने स्वीडिश नागरिकांना उपलब्ध होणारे लाभ पटकवायचे आणि स्वीडनमध्ये स्थायिक व्हायचे असा डाव काही तरुण खेळत. यामुळे सार्वजनिक ठिकाणी भारतीय माणसांना योग्य मान मिळत नाही. युरोपातील लोकांच्या मनाचा जर एक्स-रे काढला तर भारतीयांबद्दलचा तिटकारा दिसतो. रशियात भारतीयांचे प्रमाण अत्यल्प आहे. शिवाय सरकारी प्रचार भारताला अनुकूल आहे म्हणून तेथे भारतीयांविषयी आस्था दिसते. पण जेव्हा चार-पाच लाख भारतीय मॉस्कोत कायम स्थायिक होतील तेव्हा काय काय होते ते पाहा ! त्या वेळी सर्वांच्या ध्यानात येईल की, ब्रिटिश आणि अमेरिकन नागरिक खूपच सहिष्णु वृत्तीचे आहेत. ही सहिष्णु वृत्ती रशियनांच्या अंगी अजिबात नाही. रशियातील परदेशी नागरिकांबद्दलचे कायदे मुळात जाचक ठरत होते. परदेशी माणसाला अस्पृश्याची भावना व्हायची.

स्टॉकहोममधील निशा जीवन स्वारस्यकारक होते. नाईट क्लबांमधील ‘लाइव्ह शो’ फार छान होते. शांत, शिस्तशीर वातावरण. स्थानिक माणसे नव्हती. आमच्यासारखे पर्यटक होते. पार्श्वसंगीत आणि छाया-प्रकाश यांच्या साथीवर सुडौल स्त्री व पुरुष विविध आसने करून संभोग क्रिया करीत होते. ते पहिल्यानंतर क्लबच्या मॅनेजरला मी विचारले: “पुरुष असे काम किती काळपर्यंत करू शकतो ?” तो उत्तरला: “गोरा तरुण दोन वर्षं. आणि नीग्रो तीन वर्षं !” नाईट क्लबांचे वेगळे जग असते ! मध्यंतरात एक नग्न तरुणी व्हिस्कीचा ग्लास घेऊन आली. “स्वीडिश अनुभव पाहिजे ?” तिने मखमली स्वरात विचारले. माझ्या खिशातील मर्यादित पैसे स्वीडिश अनुभवाला नाही म्हणाले.

आगगाडीच्या फर्स्ट क्लासच्या सुरेख डब्यातून कोपेनहेगेनकडे निघालो. खरे तर युरोपात आगगाडीच्या फर्स्ट क्लासचे तिकीट खूप महाग होते. मॉस्कोतील रूबलची मुबलकता माझ्या उपयोगी पडली होती. समोरच्या सीटवर एक ऑस्ट्रेलियन तरुणी बसली होती. त्या वेळी ऑस्ट्रेलियात हिवाळा चाललेला होता म्हणे. त्या हिवाळ्याला टाळण्यासाठी ती स्कॅन्डिनेवियाच्या सफरीवर आली होती. यापूर्वी कोपेनहेगेनला तिने एकदा भेट दिलेली होती. “टिवोली पार्क जरूर पाहा” तिने सांगितले. स्टेशनवर निरोप घेता घेता

संध्याकाळी सात वाजता टिवोली पार्कमध्ये भेटण्याचे आश्वासन देऊन निघून गेली. टिवोली पार्क खरोखरच सुंदर होता. पण ऑस्ट्रेलियन तरुणीने आश्वासन पाळले नाही. असो ! घडते असे कधी कधी ! !

कोपेनहेगेनमध्ये एका टुमदार दुमजली घरात छानशी खोली राहायला मिळाली. स्टॉकहोमपेक्षा अधिक स्वस्त. आमच्या लँडलेडीचे पूर्वज कधी काळी भारतात राहत होते म्हणे. त्यामुळे मुक्काम सुखद ठरला. सिटी टूरमधून मरमेडचा पुतळा पाहिला.

सफरीचा अवधी संपत आला. माझ्याजवळचे पैसेही. परतीचे तिकीट होतेच. विजयने व मी एकमेकांचा निरोप घेतला. त्यानंतर मॉस्कोत तो ओझरता भेटला होता. पुण्याला जाऊन लग्न ठरवून आला. पुढे अमेरिकेत निघून गेला. पुढे त्याचे पत्र कधी आले नाही. संपर्क तुटला. 'कमाझ' मालवाहू मोटारींमध्ये अमेरिकन तंत्रज्ञानाचा वापर केलेला आहे हे सत्य फारच कमी रशियनांना माहीत आहे.

परतीचा प्रवास चालू झाला. पैसे अगदी कमी होते म्हणून खाण्यासाठी जपून खर्च करीत होतो. स्टॉकहोममध्ये शहाणपण शिकलो की, विनिमयामध्ये नाण्यांना निम्मी किंमत मिळते. नकळत खिशात नाणी जमली होती. तीन दिवसांच्या प्रवासाने दमूनभागून घरी आलो. तमारा संशयाने माझ्याकडे पाहत होती. बायकांबरोबर मी उनाडक्या केल्या असाव्यात असा तिचा समज झाला. बाहेरून घरात येताच तिचे चुंबन घेतले नाही तर ती रागवायची. वेगळी संस्कृती, वेगळी भाषा. त्यामुळे असे छोटे संघर्ष व्हायचे. विचार केल्यानंतर ह्या रिवाजामागील रशियन स्त्रियांची चतुराई ध्यानात आली. बाहेरून आल्यानंतर स्त्रीचे चुंबन घेतल्यास तुम्ही बाहेर मद्यपान केले आहे असे तिच्या पटकन ध्यानात येते. शिवाय परफ्यूमचा वास येताच तुम्ही दुसऱ्या स्त्रीच्या बाहुपाशात होतात हेही तिला समजते. युद्धानंतर रशियात पुरुषांपेक्षा स्त्रियांची संख्या जास्त आहे. म्हणून एकाकी स्त्रिया एकट्यादुकट्या पुरुषापाठी धावतात, ह्या सत्याचा रशियन गृहिणीला कधी विसर पडत नाही. त्यांचेही बरोबर आहे. पुरुषाच्या जातीचा भरवसा नाही !

*

# कॉकेशस

कॉकेशसला रशियनमध्ये 'कावकाझ' म्हणतात. कॉकेशियन पर्वतरांग आणि काळा समुद्र यांच्या दरम्यानचा हा प्रदेश रशियाच्या दक्षिणेला आहे. समशीतोष्ण हवामान, सुंदर निसर्ग, उमदे लोक आहेत. जॉर्जियन, आर्मेनियन, आझरबैजानी वंशाच्या लोकांना कॉकेशियन म्हणतात. गरम रक्ताची, तापट स्वभावाची, बिनधास्त माणसे आहेत. त्यांच्यात ओसेशियन, अबखाझीयन, दाघेस्तानी उपजमाती आहेत. आर्मेनियन व आझरबैजानी लोकांचे हाडवैर सध्या सर्वज्ञात आहे. नागोर्नी कराबाख नामक टिचभर प्रदेशासाठी गेली तीन वर्षे दोन्ही जमातींच्या लोकांचे रक्त सांडले जात आहे. कावकाझ म्हणजे उन्हाळ्याची सुटी व्यतीत करण्याचे रम्य ठिकाण. पूर्वी झारकालीन सरदार मंडळी कावकाझमध्ये आराम करायला जात असत. अन्तोन चेखोवसारखे साहित्यिक कावकाझपलीकडल्या क्रिमियात प्रकृती सुधारण्यासाठी जात असत. पूष्कीन हा अभिजात रशियन कवी भटक्याच होता. सोविएत सत्ताकाळात रशियन साहित्यिकांची विश्रामस्थाने ऐतिहासिक स्मारके म्हणून जतन केली आहेत.

तर या कावकाझमध्ये जाण्याचा तमाराने बेत केला. ती मोकळीच होती. शिवाय मी स्कॅन्डीनेवियाला एकटाच जाऊन आल्यामुळे तिचे पित्त खवळले. चूक तिच्या सरकारची होती. कारण सोविएत नागरिकांना एकटे दुकटे परदेश प्रवासाला जाण्याची मुभा नव्हती. सोविएत नागरिकांच्या परदेश संचारावर अनेक निर्बंध होते. म्हणून तर नामवंत लेखक, बॅले नर्तक वगैरे मंडळी पळून

जात. स्तालीनची मुलगी स्वेतलाना अशीच भारतामधून अमेरिकेला पळाली. तिचा हिंदू नवरा आमच्या प्रकाशन गृहात अनुवादक होता म्हणे. त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या अस्थिविसर्जनासाठी ती नव्या दिल्लीत आली होती. तिच्या पलायनाचा पुढचा इतिहास सर्वांना ज्ञात आहे. खरे म्हणजे जर तमारा परदेशी येऊ शकली असती तर जास्तच बरे झाले असते. कारण परदेशात फिरताना संध्याकाळच्या वेळी मला एकटेपणाच्या भावनेचा त्रास व्हायचा. आनंदात कुणीतरी सहभागी असायला पाहिजे ना ? पण सोविएत सरकारचे नियम आडवे यायचे. सोविएत नागरिकांना चाळीस-चाळीसच्या गटांमधून परदेश प्रवासाला मुभा होती. त्यात कुणीतरी खबरे असत. म्हणजे मोकळेपणा नाही. आपल्या भारतात सोविएत हौशी प्रवाशांचे मोठमोठे गट का येतात ? याचा खुलासा आता होईल. अर्थात गोर्बाचोव यांच्या 'ग्लास्नस्त'मध्ये सोविएत नागरिकांच्या परदेश प्रवासांवरचे निर्बंध खूप प्रमाणात कमी झाले आहेत. नंतरच्या काळात तमाराला भारतात येता यावे म्हणून मी तर चक्क तिच्याशी लग्न केले ! ती हकीकत नंतर येईल.

मॉस्कोपासून दक्षिणेला दीड हजार किलोमीटर अंतरावर असलेल्या कॉकेशसमधील अॅडलर नावाच्या छोट्या गावी एक-दोन आठवडे राहण्याची योजना तमाराने आखली. सोबतीला यायला इगर तयार झाला. तयारी सुरू झाली ! मॉस्कोत मेत्रापोल हॉटेलात 'इन्टुरिस्ट' ची विमान तिकिटे परदेशी लोकांना मिळत होती. माझ्याबरोबरच तमाराचे व इगरचे तिकिट काढले. पण परतीची तिकीटे न घेण्यात माझी चूक झाली. त्यामुळे मनस्ताप टळला असता.

दरवर्षी उन्हाळ्यात किमान २४ दिवस समुद्रकिनारी पूर्ण विश्रांती घेण्याची रशियन लोकांना सवय आहे. ही विश्रांती खरोखरीची विश्रांती असते. सकाळपासून संध्याकाळपर्यंत किनाऱ्यावर पडून राहतात. ना कुठे धावपळ. दुपारी हॉटेलच्या वा विश्रामधामाच्या खोलीत वामकुक्षी. मला हा विश्रांतीचा प्रकार एकदम आवडला. सोविएत लोकांना वार्षिक रजा २४ दिवसांची असते. कावकाझमधील किनाऱ्यालगतच्या गावांना जाण्यासाठी अॅडलरचा विमानतळ मुख्य ठिकाण. इथूनच सोची नावाचे रमणीय विश्राम स्थळ आहे. सोचीमध्ये सुंदर सुंदर हॉटेल्स आहेत. शिवाय ट्रेड युनियनांची भव्य विश्रामधामे. सोची उत्तर कावकाझमध्ये आहे. तर गाग्रा नावाचे रम्य ठिकाण दक्षिणेला आहे.

गाग्राची ताडाची झाडे प्रसिद्ध आहेत. त्यापुढे आणखी दक्षिणेला पिचुंदा आहे. दरम्यान डोंगरात खूप उंचावर रित्सा सरोवर आहे. या रित्सा सरोवराकाठी स्तालिनचा दाचा भग्नावस्थेत उभा आहे. पिचुंदाच्या नजीक सोविएत बड्या पुढाऱ्यांचे सरकारी दाचा आहेत. ह्या कम्युनिस्टांचे वैभव पाहून खुद्द झार लाजला असता.

मस्क्वापासून अवघ्या दोन तासांच्या हवाई प्रवासानंतर आम्ही अ‍ॅडलरला येऊन ठेपलो. स्वतःच्या घरांमधील खोल्या भाड्याने देणारी माणसे विमानतळावर उभी होती. खाजगी जागा भाड्याने घेता येते हे ऐकून मला आश्चर्य वाटले. कावकाझमध्ये मॉस्कोपेक्षा वेगळी परिस्थिती होती. इगरने व तमाराने एका माणसाशी व्यवहार ठरवला. एका खोलीत तीन कॉट होत्या. प्रत्येकी दिवसाला एक रूबल भाडे ठरले. म्हणजे हे हॉटेलपेक्षा खूपच स्वस्त होते. मी खूष झालो.

पण घरापाशी चालत येताच माझी खुषी मावळली. अंगणाच्या फाटकापाशीच टोपलीचा संडास होता. रशियात अजून हे संडास उभे होते याचे मला कमालीचे आश्चर्य वाटले. लहानपणी कोल्हापुरात या संडासांबद्दल मला कमालीची किळस वाटायची. तेथे विधी करणे अशक्य. पण इगर आणि तमारा व्यवस्थित जात होते. सकाळच्या धास्तीमुळे मला रात्र रात्र झोप यायची नाही. वीस दिवसपर्यंत शिक्षा भोगली. दुसरा उपाय नव्हता. कारण हॉटेलांमध्ये जागा मिळत नव्हती. खाण्याचे तसे हालच होते. किनाऱ्यांवरच्या कॅफेमध्ये जेवण कमालीचे निकृष्ट होते. मला ते जेवण जाईना. म्हणून तमाराने बिचारीने घरीच स्वयंपाक करायला आरंभ केला. घरमालकीण चांगली होती. तिने स्वतःचे स्वयंपाकघर तमाराला वापरायला दिले. इगरला एका जागी थांबणे आवडत नव्हते. म्हणून तो समुद्रमार्गे रॉकेटमधून दूरदूरच्या गावांना जायचा. तमारा किनाऱ्यावरच्या वाळूत दिवसभर ऊन खायची आणि पाण्यात डुंबायची. मला पोहता येत नव्हते. पुण्यातील टिळक तलावात दरवर्षी कुणीतरी अपघाताने बुडून मरायचे. त्यामुळे पोहायला शिकण्याची मला घरातून मनाई होती. तेव्हापासून पोहणे शिकणे राहिलेच. मी फार मोठ्या आनंदाला मुकलो होतो, हे आता ध्यानात आले. एक दिवस धीर करून कंबरेपर्यंतच्या पाण्यात चालत गेलो. अचानक वरती समुद्र आणि खाली आकाश दिसू लागले. घाबरगुंडी उडाली.

पाण्याची भीती कायमची बसली. त्यामुळे मला उद्योग नव्हता. किनाऱ्यावरच्या स्विमिंग सूटमधल्या तरुणी निरखायचा चाळा लागला. कधी कधी बाजारातून भाज्या आणि फळे विकत आणायचो. रशियनमध्ये बाजाराला 'रिनक' किंवा 'बझार' हे शब्द आहेत. अॅडलरच्या बाजारात सफरचंदे, कलिंगडे, द्राक्षे, टरबुजे वगैरे फळे भरपूर मिळायची. शिवाय जॉर्जियन बनावटीचे 'आज्जेक' होते. हे 'आज्जेक' आपल्या लाल तिखटाच्या ठेच्यासारखे होते. लसूण, कांदा, मीठ व लाल मिरचीची पूड यांचे मिश्रण. जॉर्जियन लोकांना त्याच्या तिखटपणाबद्दल अभिमान फार आहे. शिवाय घरगुती दारू चोरून विकायचे. त्या दारूला 'चाचा' असे म्हणतात. मी भारतीय आहे हे पाहून सारे राज कपूरची व जवाहरलाल नेहरूंची प्रशंसा करायचे. 'आवारा' व 'श्री ४२०' चित्रपट अफाट लोकप्रिय होते. कावकाझमध्ये सूर्य डोंगरापलीकडे उगवायचा आणि समुद्रावर मावळायचा. काळ्या सागरावरचा सूर्यास्त पाहायला छान वाटायचे. देशोदेशीच्या सागरतीरांवर सूर्यास्त पाहायचा नंतर छंद लागला. असे तासन् तास निश्चल बसू शकतो. कधी शून्य मनाने. डोक्यात विचारांचा कोलाहल नसतो. विस्तीर्ण क्षितिज ७० मि. मि. च्या पडद्यासारखे भासते. आयुष्य खूप गूढ बनते. नियमितपणे काम करण्याच्या सवयीमुळे वेळेआधी कामाची योजना पूर्ण व्हायची. म्हणून सुट्टी मिळण्याची अडचण नव्हती. मार्गो व वादिम यांनी माझा स्वभाव वेळीच ओळखला होता. त्यांनी त्यांच्या बाजूने पूर्ण सहकार्य दिले. त्यांचा देश मी जास्तीत जास्त पाहावा अशी माझी इच्छा होती. त्यांनी या कामी खूप मदत केली. नोकरशाहीचे जाचक नियम दुर्लक्षित केले. माझ्यापाशी वेळ व पैसे मुबलक होते. रूबलच्या विनिमयावर निर्बंध होते हे एका परीने चांगले होते. जादा रूबल रशियातच खर्च करायला हवे होते. वेगवेगळी स्थळे पाहण्यासाठी, तमाराची कपड्यांची हौस भागविण्यासाठी आणि उंची मद्ये व सिगारेटस् यांच्या सेवनासाठी मी सढळ हाताने खर्च केला. पैशांचे ताण हा केवळ भूतकाळ होता. भूतकाळात काढलेल्या खस्तांचा पुन्हा पुन्हा उच्चार करून वर्तमानातील आनंद घालवू नये.

मस्क्वाला परतायची वेळ झाली. तिकिटे विकत घेण्यासाठी बसने सोचीला गेलो. अर्ध्या तासाचा प्रवास होता. त्या निमित्ताने सोची पाहण्याचा इरादा होता. सोचीमधील सुंदर हॉटेलांच्या इमारती आशाळभूत नजरेने

पाहिल्या. पुन्हा अशा काटकसरी सहलीवर यायचे नाही असा मनाशी निश्चय केला. कॉकेशियन रिव्हिएराचे खरे रूप मला पूर्वी माहीत नव्हते. रशियातील मुक्कामात कावकाझमध्ये तमारासह मी पुन्हा पुन्हा आलो. दोनदा पिचुंदाच्या सोळा मजली विश्रामधामातील सुरेख खोल्यांमध्ये. गाग्रामध्ये जॉर्जियन लेखकांच्या विश्रामधामात आणि शेवटी सोचीमधील कॅमेलिया हॉटेलच्या सुंदर स्वीटमध्ये. नंतर सर्व इच्छा पूर्ण केल्या.

सोचीमध्ये इन्टुरिस्ट हॉटेलातील इन्टुरिस्टच्या तिकीट कचेरीत गेलो तेव्हा तेथील महिला कर्मचाऱ्यांनी नवा पेच निर्माण केला. माझे परवाना पुस्तक उलटसुलट चाळल्यानंतर तेथील बाईने विचारले: "कुठं राहिलात ?"

"ॲडलरमधल्या एका घरात !" मी.

"पोलिसात नोंद केली ?"

"नाही. मला माहीत नव्हतं."

"पोलिसात नोंद करा. त्यांचा शिक्का असल्याशिवाय तुम्हाला मॉस्कोचं तिकीट मिळणार नाही !"

"कुठं आहे पोलीस चौकी ?"

"मला माहीत नाही. तुम्हीच चौकशी करा."

नव्या गावात आल्यानंतर चोवीस तासांच्या आत पोलिसांकडे नोंद करायची असा नियम होता. हे मला माहीत नव्हतं. इगर आणि तमारा माझ्यापेक्षा जास्त अज्ञानी. ॲडलरमध्ये समुद्रात डुंबणाऱ्या इगरवर मी तणतणलो. त्याला सांगाती घेऊन परत सोचीला गेलो. इगर अर्ध्या पँटमध्ये होता. तशाच अवतारात तो इन्टुरिस्टच्या कचेरीत आला होता. तेथील बाई त्याच्यावर कडाडली. सवयीनुसार दाढी कुरवाळीत इगर चूपचाप बाहेर आला. सोची बंदरापासच्या पोलिस चौकीत आम्ही शिरलो. इथे आमचे दैव बलवत्तर होते. सुरेख दिसणाऱ्या पोलिस महिलेने हसतमुखाने म्हटले: "कालच आलात ? चांगला आराम करा ! हवा छान आहे !"

तिने परवाना पुस्तकावर शिक्का मारला हे पाहून आम्ही काहीच बोललो नाही. केव्हा आलो होतो हा प्रश्न आपोआपच मिटला. जर खरे बोललो असतो तर पार मेलो असतो. मौनामुळे कधी कधी फायदे होतात !

शिक्का मिळाल्यावर विजयी मुद्रांनी आम्ही परत इन्टुरिस्टकडे आलो. पण

तिथल्या बायका महाखट. फक्त मला एकट्याला विमानाचे तिकीट द्यायला तयार होत्या. आम्ही तिघे एकत्र होतो. म्हणून तडजोड केली. पॅसेंजर आगगाडीच्या तिसऱ्या वर्गाची तिकिटे काढली. मी इन्टुरिस्टमधून आणि इगर व तमाराने बाहेरच्या साध्या बुकिंग ऑफिसातून. पुढचे चार दिवस तिकिटाचा घोळ चालला होता. सुट्टीचा मूड एकदम बिघडला. हा देश चक्रव्यूहाप्रमाणे आहे. आपल्याकडे अभिमन्यूची भूमिका येते. एकदा आत गेले तर बाहेर येणे कठीण. पोलिसी राज्य म्हणजे काय मामला आहे याचे प्रत्यंतर येऊ लागले.

तब्बल छत्तीस तासांच्या प्रवासानंतर मॉस्कोत घरी पोहोचलो. तमाराला वारा बाधला. आठ दिवसपर्यंत नाक गळत होते. रशियन स्टाईल आराम मानवला नव्हता.

लौकरच इगरचे लग्न ठरले. त्याची तिसरी बायको घटस्फोटिता होती. तिला पहिल्या लग्नाचा सात-आठ वर्षांचा मुलगा होता. इगरला लहान मुलांची खूप आवड होती. पण त्याला स्वतःचे मूल अद्याप नव्हते. बायकोच्या मुलावर त्याने आपल्या मुलाप्रमाणे प्रेम केले. त्याने नोंदणी पद्धतीने विवाह केला. त्याप्रसंगी साक्षीदार म्हणून मी सही करावी अशी माझ्यासकट सर्वांची इच्छा होती. पण नोंदणी कचेरीतील अधिकाऱ्यांनी म्हटले, “परदेशी माणूस साक्षीदार म्हणून चालणार नाही.” इगरच्या लग्नाच्या जेवणाला भरपूर वोदका प्यायलो आणि भरपूर नाचलो.

मरीना ब्लागोनरावोवाचा नवरा झेन्या क्रीडाविषयक पत्रकार होता. दाढी [illegible]लेला तरुण देखणा झेन्या सुस्वभावी वाटला. येवगेनी या नावाचे लाडके रूप म्हणजे झेन्या. रशियन भाषेत झेन्या हे नाव पुरुषाचे आणि स्त्रीचे सुद्धा असते. येवगेनिया नावाच्या स्त्रीला झेन्या म्हणून हाक मारतात. तशीच गत साशा नावाची. अलेक्सांद्र नावाच्या पुरुषाला साशा म्हणतात. अलेक्सांद्रा नावाच्या स्त्रीला साशा म्हणून हाका मारतात.

पण एकमेकांना अनुरूप दिसणाऱ्या मरीना व झेन्याचे कशात तरी बिनसले. त्यांनी नंतरच्या काळात घटस्फोट घेतला. मरीना या विषयावर बोलणे टाळायची. “माझं आयुष्य म्हणजे निव्वळ दलदलीतलं जीवन.” असे म्हणायची. तिला मूल नव्हते. तिचे वडील वारले होते. तिची आई दुसऱ्या महायुद्धात रणगाडा रेजिमेंटमधून लढली होती. मरीना व तिची म्हातारी आई मॉस्कोतील

छोट्या अपार्टमेंटमध्ये एकत्र राहतात.

मरीनाच्या आईचे इंदिरा गांधींवर फार प्रेम. जेव्हा इंदिरा गांधी मॉस्कोत आल्या होत्या तेव्हा त्यांच्या काळजीने मरीनाची आई कसनुशी व्हायची. रशियातील म्हाताऱ्या बायका विलक्षण भावनाप्रधान आहेत. जगांत सगळीकडची माणसे सारखी.

*

# दुसरा करार

पाहता पाहता पहिल्या कराराची तीन वर्षे संपत आली. 'नोवोस्ती'साठी नियमित लेख लिहिणे थांबले होते. टेलिफिल्मांचा प्रकल्प पुढे सरकला नव्हता. सा. 'मनोहर'चे सदर मीच बंद केले. मॉस्कोच्या मेत्रोवर आणि हवेवर किती काळ लिहिणार ? राजकारण हा विषय मला वर्ज्य होता. तरीही लेखन करताना तारेवरची कसरत व्हायची. सोविएत समाजव्यवस्थेत खटकणाऱ्या गोष्टींचा उल्लेख करणे शक्य नव्हते. दोष दाखविले असते तर एकूण नोकरीला रामराम करावा लागला असता. आर्थिकदृष्ट्या मला हे परवडण्यासारखे नव्हते. आत्ता 'ग्लास्नस्त'चा काळ वेगळा आहे. खरेखुरे लेखनस्वातंत्र्य आहे. खुद्द सोविएत वर्तमानपत्रे, दूरदर्शन कडाडून टीका करतात. १९७६-७७ चा काळ वेगळा होता. छापील टीकेला रशियन मंडळी फार संवेदनाक्षम होती. विशेषतः परक्या माणसाने केलेली टीका त्यांना आवडत नाही. कधी कधी खाजगीत मी माझी नाराजी बोलून दाखवायचो. कचेरीतील अधिकाऱ्यांनी मनात राग राखून ठेवला होता.

अनुवादासाठी पुस्तके मिळायची. ऐत्मातोव यांच्या 'तीन कादंबरिका' शिवाय यूरी बोंदारेव यांची 'गरम बर्फ' कादंबरी नाव घेण्यासारखी होती. स्तालिनग्रादच्या लढाईत तोफखान्यात प्रत्यक्ष लढलेला हा लेखक आधुनिक सोविएत लेखकांमध्ये खूप प्रसिद्धीला आलाय. त्याच्या 'बेरीग' नावाच्या कादंबरीवर 'किनारा' नाटक व चित्रपट निघालेत. 'गरम बर्फ'वर चित्रपट निघालाय. स्तालिनग्रादच्या युद्धाची पार्श्वभूमी आहे. माझ्या दृष्टीने कामाची

योजना कमी पडायची. लेनिनग्रादमध्ये कतेनिना यांच्यापाशी शिकलेली नताशा मसाल्किना नावाची उराल प्रांतातील एका छोट्या गावातील तरुणी व निकोलाय सिदेलेव नावाचा मॉस्कोपासून काही अंतरावरच्या तूला गावातील तरुण हे दोघे संपादक म्हणून कामाला लागले. मराठीसारखी दुर्मिळ भाषा शिकल्याबद्दल त्यांना लेनिनग्रादमध्ये राहण्याचा परवाना मिळाला होता. आता आमच्या प्रकाशन गृहात नोकरी मिळाल्यामुळे अपार्टमेंट आणि मॉस्कोत राहण्याचा परवाना अशा दोन्हीचा लाभ त्यांना मिळाला. मॉस्कोतील गर्दी अशी वाढते. कालांतराने मराठी विभागाची वाढ झाली. मॉस्को नभोवाणीवर मराठी विभागात काम करणारी सौ. तात्याना वेर्बित्सस्काया हिला संपादक म्हणून घ्यावे अशी मी आमच्या कचेरीत शिफारस केली. वरकरणी शांत आणि कुटुंबवत्सल दिसणारी ही बाई चौदा वर्षांनंतर माझ्या संकटकाळात अत्यंत क्रूर आणि हलकट वागली.

एक दिवस मार्गोने विचारले, "डॉक्युमेंटरी चित्रपटांच्या मराठी कॉमेंट्रीचा अनुवाद करायची आणि आवाज देण्याची इच्छा आहे ?" हा नवा उद्योग मी उत्साहाने घेतला. 'फिल्म एक्सपोर्त' नावाची संस्था जगातील ३०-४० भाषांमध्ये लघुपटांना किंवा वार्तापटांना कॉमेंट्री देण्याचे काम करीत होती. 'प्रगती', 'मीर' प्रकाशन गृहांमधील परदेशी अनुवादक आणि मॉस्को नभोवाणीवरील परदेशी निवेदक या कामांसाठी पाचारण करण्यात येत असत. यात थोडे द्रव्यार्जन होते. म्हणून परस्परांचे हेवेदावे होते. मी काम स्वीकारल्यानंतर मॉस्को रेडिओवरच्या मराठी निवेदकांचा श्री. नरेंद्र सिंदकरांचा फोन आला. त्यांच्या तोंडची भाकरी मी काढून घेतली असा त्यांनी आरोप केला. मी त्यांना समजावले की, त्यांची भाकरी म्हणजे रेडिओ मॉस्कोवरची नोकरी होती. 'फिल्म एक्सपोर्त'चे काम म्हणजे वरचे लोणी होते. शिवाय 'फिल्म एक्सपोर्त'कडे मी काम मागायला गेलो नव्हतो. चित्रपट हा माझा खास विषय होता. सिंदकरांशी थोडी बोलाचाली घडली. मीही संतापून बोललो, "मी महाराष्ट्रात मोठा होतो म्हणून मला इथं बोलावलं ! तुम्ही इथं आहात म्हणून केवळ मोठे ठरलात !" त्यानंतर आमचे परस्परांशी बोलणे थांबले. श्री. सिंदकर येणाऱ्या-जाणाऱ्या प्रत्येक मराठी माणसाला माझ्याबद्दल वाईट-साईट सांगत होते. दोन मराठी माणसांचे एका जागी पटत नाही हा प्रवाद खरा ठरला. मॉस्को

मुक्कामात हा अप्रिय विषय. खरे तर माणूस मेहनती, खूप कष्टाळू. पण कोत्या मनामुळे अप्रिय ठरला.

ताश्कंद चित्रपट महोत्सवाचे निमंत्रण पुन्हा मिळाले. या वेळी ताश्कंद खूप बदलले होते. अनेकमजली हॉटेल उझ्बेकिस्तानमध्ये राहण्याची सोय होती. माझ्या केसांचाही रंग पांढरा-काळा संमिश्र बनला होता. अली हमरायेवचे लग्न झालेले होते. लतीफ फैझियेव पूर्वीच्याच उत्साहाने वावरत होते. मॉस्कोच्या दमादेदेवो विमानतळावर विमानाकडे जाणाऱ्या बसमध्ये गंमत घडली. बसमध्ये ओळखीचा भारतीय चेहरा दिसला. बिचकत मी विचारले, "कलकत्त्याहून ?" चेहऱ्याने मानेने नकार दिला. मग एकदम मला ओळख पटली. "देवेन वर्मा ?" चेहऱ्याने निःशब्द होकारार्थी मान डोलावली. मुंबईत वरळी सी फेसवर राहणारा देवेन पूर्वी कधी कधी ओझरता भेटायचा. तो पुण्याच्या वाडिया कॉलेजात शिकला होता. म्हणून जास्त आपुलकी वाटत होती.

"नुसत्या माना कशाला हलवतोस ? बोलत का नाही ?" मी.

"गेले दहा-बारा तास मी कुणाशीही बोललोच नाही !" देवेन.

मग त्याने हकीगत सांगितली. ताश्कंद चित्रपट महोत्सवाला निमंत्रित पाहुणा म्हणून तो चालला होता. त्याचे तिकिट एअर-इंडियाचे होते. मुंबईहून मॉस्कोला थेट आला. ते विमान शेरेमेत्येवो विमानतळावर उतरले. तेथून ४०-५० किलोमीटर लांब असलेल्या दमादेदेवो विमानतळावर टॅक्सीमार्फत त्याची रवानगी झाली. बाकी चहा व जेवण शेरमेत्येवो विमानतळावर आटोपले. ह्या सर्व वेळात त्याला भाषेची अडचण भासली. केवळ खुणांची भाषा. त्यामुळे तोंडाला मिठी बसली होती. पुढे विमानात भरपूर गप्पा मारून त्याने ती कसर भरून काढली. ताश्कंदमधील दहा दिवसांत देवेनच्या संगतीत पुन्हा कॉलेजजीवनाचा भास झाला. विख्यात चित्रपट निर्माते-दिग्दर्शक श्री. यश चोप्रा त्याचे जिवलग मित्र आहेत. म्हणून माझ्या परिचयाच्या यादीत यश चोप्रांचे नाव दाखल झाले. रशियन पासपोर्ट अधिकारी प्रवाशाकडे कसे न्याहाळून पाहतो त्याची नक्कल देवेन खूप छान करायचा. चित्रपट निर्माते श्री. गुलशन राय आले होते. देवेन व यश यांच्या कंपूत ते सामील झाले. शिवाय बासुद्रय आणि गुलझार भेटले. श्याम बेनेगल व स्मिता पाटील यांचा परिचय झाला. रशियन स्त्रियांच्या जीवनाबद्दल स्मिताला खूप कुतुहल वाटायचे. मला खूप प्रश्न

विचारायची. मी भराभरा खरी उत्तरे द्यायचो. साठे साहेब आणि राज कपूर महोत्सवाचा अविभाज्य भाग होते.

मॉस्को रेडिओची भारतीय विभागाची कीरा पताकी आली होती. तिने ताश्कंद नभोवाणीवरच्या अधिकाऱ्यांची ओळख करून दिली. महोत्सवाबाबत माझा अभिप्राय व्यक्त करणारे दहा मिनिटांचे हिंदीतील भाषण ताश्कंद नभोवाणीने प्रक्षेपित केले.

महोत्सव समितीने पाहुण्यांसाठी समर्कंदची एक दिवसाची सहल आयोजित केली होती. पाच-सहाशे लोकांना घेऊन एक आरक्षित पूर्ण आगगाडी जाणार व येणार होती. मी मॉस्कोवासी असल्यामुळे महोत्सव समिती थोडी डावी वागणूक द्यायची. सहलीचे निमंत्रण मला नव्हते. गुलझारने चतुराईने जादा सीट पैदा केली. म्हणून मी सहलीचा आनंद घेतला. समर्कंद मागच्या वेळीच पाहिले होते. तैमूरलंगाची कबर हिंदूंना कौतुकाने गुणगान करून दाखविली. फार विचित्र वाटले. उद्या जर रशियनांना हिटलरचे थडगे कौतुकाने दाखवले तर ? असा विचार मनात आला.

या महोत्सव प्रसंगी केंद्रीय मंत्री श्री. विद्याचरण शुक्ल यांचे भारतीय प्रतिनिधींना दम देणारे भाषण ऐकून आश्चर्य वाटले. मॉस्कोत भारतीय वर्तमानपत्रे वाचायला मिळत नव्हती. जगाशी खरा संपर्क फक्त बी. बी. सी. च्या इंग्रजी बातम्या ऐकून. त्यासुद्धा नीट ऐकू येत नसत. रशियन मंडळी रेडिओ लहरींवर अडथळे आणायची. मंत्रीमहोदयांच्या भाषणावरून भारतामधील आणीबाणीतील सरकारी अरेरावीचा अंदाज आला.

हॉटेल उझ्बेकिस्तानमध्ये एक मजेदार ओळख झाली. संध्याकाळी सातचा सुमार होता. एकट्याला कंटाळा आला होता. व्हिस्की प्यायचा मूड होता. लिफ्टच्या दारापाशी शिडशिडीत अंगकाठीचा भारतीय माणूस दिसला. त्याला व्हिस्की पिण्यासाठी माझ्या खोलीत बोलाविले. आश्चर्य म्हणजे आनंद गोळीकेरी नावाचा तो मराठी माणूस होता. मूळचा बेळगावचा. त्रिनिदाद टोबॅगोमध्ये बरीच वर्षे स्थायिक. दोन मुलगे आणि बायको यांच्यासह पोर्ट ऑफ स्पेनमध्ये एका बंगल्यात राहत होता. एका सिंधी उद्योगपतीशी सिनेमा थिएटरांमध्ये भागीदारी होती. चित्रपट वितरणाचा व्यवसाय होता. गप्पांच्या ओघात पोर्ट ऑफ स्पेनला येण्याचे मला निमंत्रण मिळाले. अर्थात त्या वेळी

मला वाटले नव्हते की, लवकरच मी त्रिनिदाद टोबॅगोला जाईन. आनंद गोळीकेरी शब्दाचा सच्चा माणूस ठरला. त्याच्याबरोबर आलेले त्याचे मित्र शहानी यांचीही ओळख झाली. शहानींचे पोर्ट ऑफ स्पेनमध्ये भारतीय कलावस्तूंचे दुकान होते. अत्यंत कष्ट करून धनवान माणूस बनला होता. तेव्हा या सफरीत काही नवे मित्र लाभले होते. व्हिस्की माफक पिण्याचे फायदे !

ताश्कंद चित्रपट महोत्सवाचा तपशीलवार आढावा घेणारा माझा लेख 'रविवारची लोकसत्ता'मध्ये प्रसिद्ध झाला. तेव्हापासून आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवांबाबत 'लोकसत्ता'मध्ये लिहीत राहिलो. श्री. विद्याधर गोखले यांनी पूर्णत्वाने वाव दिला.

या वेळी मॉस्कोत चांगली बातमी माझी वाट पाहत होती. मार्गोने सांगितले की, प्रकाशन गृहाने माझ्याशी आणखी तीन वर्षांचा करार करण्याचे ठरविले होते. माझ्या चांगल्या कामाची ही पावती होती. दरम्यान भारतीय विभागाचे प्रमुख अनुक्रियेव सेवानिवृत्त झाले. त्यांच्या जागी वालेंतिन अनिसोव काम करू लागले. उत्तम इंग्रजी जाणणाऱ्या अनिसोव यांनी काही काळपर्यंत यूनोमध्ये काम केले होते. युरोप-अमेरिकेत वास्तव्य केले होते. शिवाय भारतातही वास्तव्य केले होते. त्यांची पत्नी लारीसा भारतीय पद्धतीचे माफक मसालेदार चवदार जेवण बनवायची.

नवा करार झाल्यामुळे प्रकाशन गृहाने मला मायदेशी जाण्याचे परतीचे तिकीट दिले. मात्र एअर इंडियाने प्रवास करायची परवानगी नव्हती. सोविएत सरकारी विमान कंपनी 'एअरोफ्लोत'च्या विमानामार्फतच प्रवास केला पाहिजे हे बंधन होते. ही गोष्ट समजण्यासारखी होती. पण पुढे पुढे मी स्वतः पैसे भरून तिकीट काढले तरी 'एअरोफ्लोत'मार्फत प्रवास करण्याची बळजबरी व्हायची. प्रत्येक प्रवास रक्तदाब चढण्याचे कारण ठरू लागला. 'एअरोफ्लोत'ची सेवा अत्यंत भिकार. जेवणात कोंबडीचा तुकडा साक्षात रबराचा तुकडा असायचा. ही कोंबडी खाऊ शकणारे लोक बक्षिसपात्र होते. होस्टेस उर्मट बोलायच्या. साधे पिण्याचे पाणी मिळणे दुरापास्त. मात्र 'एअरोफ्लोत'ची विमाने वेळेवर जातात व येतात. मॉस्को ते दिल्ली हा थेट प्रवास सहा तासांचा. नंतर दिल्ली ते मुंबई इंडियन एअर लाईन्सच्या विमानाने प्रवास करण्याची मुभा होती. रशियन मायबाप सरकारची ही मोठी मेहेरबानी होती.

खऱ्या अर्थाने चिंतामुक्त मनाने भारतात सुटीवर आलो. पुढील तीन वर्षांची कामाची शाश्वती मिळाली होती. पर्यायाने भारतातील बँकेत गंगाजळी थोडी साठण्याची संभाव्यता होती. पुण्यात शिंद्यांच्या घरी उतरलो. तेथून जवळच जुई राहत होती. ती आता तिच्या आजोबा-आजींकडे राहायची. तिला तास-दोन तासांसाठी घेऊन येत होतो. तिचे गबाळे कपडे पाहून काहीतरी विचित्र वाटले. मुलाच्या संगोपनात बाप अपुरा ठरतो. मॉस्कोत जेव्हा मुलांची पुस्तके मी अनुवाद करायचा तेव्हा वाचक म्हणून जुईची मूर्ती कायम नजरेसमोर राहायची.

या वेळी शिंद्यांच्या बाल्कनीत एका संध्याकाळी मद्यपानाची छानदार मैफल जमली. सुधीर मोघे तेथे असायचाच. शिवाय शिंद्यांचे मित्र श्री. तात्या खानोलकर यांची ओळख झाली. तात्या सेवानिवृत्त इंजिनिअर होते आणि हौशी छायाचित्रकार होते. त्यांची कन्या मधुरा शिंद्यांची मॉडेल होती. ही मधुरा आणि तिचा नवरा सतीश चुणेकर तात्काळ माझे दोस्त बनले. मधुराचा तजेलदार काळा रेखीव चेहरा पाहताच माझे डोळे चमकले. तेव्हा मला पूर्ण ओळखणाऱ्या शिंद्यांनी इशारा दिला, “ही माझ्या मित्राची मुलगी आहे.” तेव्हा हसून मी म्हणालो, “कोणतीही तरुणी ही कुणाची ना कुणाची मुलगी असणारच ! चिंता करू नका. मर्द मराठा सीमांचं उल्लंघन करणार नाही !” हे चुणेकर दांपत्य मनात ठसले. सतीशने ठामपणे म्हटले, “मूल निर्माण करायची मुळीच इच्छा नाही. कारण मूल म्हणजे मोठी चैन आहे. त्या मुलाच्या गरजा पूर्ण करता नाही आल्या तर मूल दुःखी होईल आणि आम्हीही कष्टी होऊ !” त्या निरोगी जोडप्याचे हे स्पष्ट विचार ऐकल्यानंतर कौतुक वाटले. लोकसंख्या विस्फोटाचे आज़ारपण भोगणाऱ्या भारतमातेचे अशा जोडप्यांमुळे कल्याण होईल ! नंतरच्या पुण्याच्या भेटींमध्ये चुणेकरांच्या घरी एक हमखास भेट व्हायची. सतीशचे वडीलसद्धा आमच्या मैफलीत बसायचे. माझ्या आत्मकथनांचा आरंभ सतीशच्या माडीवाले कॉलनीतील घरातच झाला.

या वेळी मुंबईत जागीरदार, श्रीकांत मोघे व दिदी यांच्या भेटी घेतल्या. दरम्यान श्रीकांत चतुर्भुज झालेला होता. मॉस्कोला जाण्यापूर्वी डॉक्टर शोभना दीक्षितशी ओझरता परिचय झाला होता. आता ती डॉ. सौ. शोभना मोघे बनली. श्रीकांत पूर्वीपेक्षा दुप्पट उत्साही दिसला. मामा आणि बेबी यांच्याकडे छोटा मुक्काम केल्यानंतर मॉस्कोला परतलो.

मॉस्कोच्या विमानतळावर तमारा वाट पाहत होती. ही सुंदर तरुणी पाहताच मन उल्हसित झाले. पण मध्यंतरीच्या काळात मी एक घोडचूक केलेली होती. माझा पूर्वीचा सावधपणा पूर्ण विसरून गेलो होतो. अर्थात केलेल्या चुकांची किंमत मोजावी लागतेच. अनास्ताशिया नावाच्या एका चुणचुणीत मुलीशी लैंगिक संबंधात मी गुंतलो होतो. शालेय शिक्षण पूर्ण केल्यानंतर ती आमच्या कचेरीत नोकरीला लागली होती. पाहता पाहता परिचय वाढला. एक दिवस तिने विचारले, "आत्तापर्यंत तू किती मुलींना बाई बनवलंस ?" मी उत्तरलो, "जेमतेम एक किंवा दोन." "मग मला बनव. माझ्या आयुष्यातील तू पहिला पुरुष व्हावास अशी माझी इच्छा आहे. तुझ्यासारख्या अनुभवी पुरुषाकडून मला खूप शिकता येईल. नंतरच्या आयुष्यात मी माझ्या भावी नवऱ्याला सुखी करू शकेन." नास्त्या म्हणाली. तिचा युक्तीवाद मजेशीर होता. हरणासारख्या डोळ्यांच्या नास्त्याला नाही म्हणणे अवघड होते. मी ऋषी-मुनी किंवा संन्यासी नव्हतो. माझ्यासारखा पूर्ण भोगवादी पुरुष मोहाला बळी पडला.

कालांतराने अनास्ताशिया पूर्णपणे गळ्यात पडू लागली. वेळी-अवेळी फोन करू लागली. दारावर घंटा वाजवू लागली. तमाराचा त्याग कर असा आग्रह धरू लागली. मी भानावर आलो. मनःशांती नाहीशी झाली. वादिमला हकीगत सांगितली. वादिमने नास्त्याला बोलाविले व सज्जड दम भरला. नास्त्याला अजून अठरा वर्षेही पूर्ण झालेली नव्हती असे नंतर समजले. केवढ्या संकटातून वाचलो. पण माझ्या ह्या लफड्याची बातमी कचेरीतील कुणा खत्रूड बाईने तमाराला फोनमार्फत कळविली. तमाराने सरळ मला जाब विचारला. मी कबूल केले. तमारा बिथरली. मी तिची समजूत घातली. चूक माझी होती हे खरे. पण तिच्या मुलीच्या वयाएवढ्या नास्त्याशी राहायचा मी नकार दिला होता, हे तिने ध्यानात घेतले पाहिजे. इतर अनुवादक त्यांच्यापेक्षा वीस-वीस वर्षे लहान असलेल्या तरुणींबरोबर राहत होते. तमाराला ह्या वस्तुस्थितीची जाणीव होती. तात्पुरता समझोता झाला. पण जेव्हा जेव्हा संघर्ष पेटायचा तेव्हा तेव्हा ह्या लफड्याची उजळणी व्हायची.

*

# त्रिनिदाद आणि टोबॅगो

रशियन हिवाळा टाळून त्या काळात भारतात मुक्काम करायचा असे नवे धोरण मी स्वीकारले. म्हणून १९७७ च्या आरंभी पपा जागीरदारांनी आणि श्रीकांतने नवीन पटकथा-संवाद लेखनासाठी मला पाचारण करताच मी तात्काळ मुंबईत थडकलो. रूबलमधील विमान तिकिटाचा भार मी काहीसा उचलला. कॅडेल रोडवरच्या हॉटेल आमिगोमधील मुक्काम पपा व श्रीकांतने सोसला. शिवाय माझी किरकोळ खरेदी घडली. बरोबर सव्वीस दिवसांत चोपडे तयार झाले. या वेळी लेखनात सुधारणा घडली. लेखन जास्त सिनेमॅटिक बनले.

काम आटोपून पुण्याला शिंद्यांकडे आलो. एक दिवस अभयला सहज भेटायला गेलो. त्याचा भयंकर अवतार बनलेला होता. केसांचे जंगल वाढले होते. हाता-पायांची नखे भरमसाठ वाढली होती. गाल खपाटीला गेल्यामुळे दात जास्तच पुढे दिसत होते. खरे तर अभय जन्मानंतर खूप देखणा होता. ताईसारखा रंग गोरा. केस कुरळे. लोकांना प्रथम तो मुलगी भासायचा. दोन-तीन वर्षांपर्यंत हे रूप टिकले. दात आल्यानंतर वरचे दात पुढे डोकावू लागले. विचित्र घाबरट स्वभावापायी शिक्षण शाळेतच सोडले होते. नंतर नंतर दादांबरोबर बसून त्यांचे डिक्टेशन घेऊ लागला. 'सोबत'कार श्री. ग. वा. बेहरे यांच्याकडे नेमकी कोणती नोकरी करीत होता हे मला माहीत नव्हते. या वेळी ध्यानात आले की, पुण्यातील पत्रकारांमध्ये त्याने स्वतःचे स्थान निर्माण केले होते. एक चित्रपट साप्ताहिकसुद्धा काढले होते. या उलाढालींमध्ये पैशांची गडबड होती असे नंतर समजले. आता त्याचे वय तीस-बत्तीस होते. त्याने

त्याच्या साप्ताहिकाचे काही अंक दाखविले व नामवंत साहित्यिकांची पत्रे दाखविली. मी कौतुकाचे चार शब्द बोललो. त्या सरशी तो हमसून हमसून रडू लागला. माझ्या ध्यानात आले, दादांच्या मृत्यूनंतर त्याची ही धडपड एकाकी होती. कुणाच्या मायेच्या शब्दाला पारखा झाला होता. तो अजून अविवाहित होता. मी त्याला तयार कपड्यांच्या दुकानात घेऊन गेलो. त्याच्यासाठी चार नवे कपडे विकत घेतले. वर आणखी पैसे दिले. नंतर तो मुंबईत बेबीकडे आला. थोडासा खोकत होता. मी मॉस्कोला लगबगीने परत गेलो. नंतर अभय आजारी असल्याची मामा व बेबीची पत्रे येऊ लागली. अखेर मामाची तार आली : २४ जून रोजी नेमक्या माझ्या वाढदिवशी अभय वारला होता. नंतर समजले की, त्याला रक्तक्षय झाला होता. घरात आणखी एक मृत्यू. तोसुद्धा २४ जूनला ! त्यानंतर ह्या दिवसाचा आनंद संपला. काही ना काही तरी विघ्न यायचे. सकाळपासून एक विचित्र खिन्नता मनावर झाकोळायची. वाढदिवस साजरा होताना मनात अपराधी भावना उमटायची.

दादा आणि ताई यांच्या मृत्यूनंतर घरात सतत मृत्यू चालले होते. मोठे व मधले मामा आणि धाकटे काका यांचे दरम्यानच्या काळात मृत्यू झाले होते. एकदम तार यायची किंवा मरणवार्ता देणारे पत्र यायचे. त्यात मामाची एक वेगळी तार आली : 'तुझी खुशाली कळव !' मला तारेचा अर्थ समजेना. नंतर खुलासा होताच कळले : मला पोटात कॅन्सर झाला म्हणून पुण्या-मुंबईत कुणीतरी अफवा उठवली होती. म्हणजे मी मरावा अशी कुणाची तरी 'सदिच्छा' होती. असो ! अफवा उठवणाऱ्या व्यक्तीने डोके वापरले होते. माझ्या पोटाच्या तक्रारी सतत असायच्या. त्यामुळे बातमी ऐकणाऱ्यांना खरे वाटले. ह्या अफवेचे गूढ आजतागायत कायम आहे. खरे म्हणजे निकटवर्ती तिच्याबाबत विसरूनसुद्धा गेले.

मनावरील औदासीन्याचे मळभ दूर झाले ते आनंद गोळीकेरीच्या भेटीने. मॉस्को चित्रपट महोत्सवासाठी तो पत्नीसह आला होता. उभयता आमच्या घरी आले. जाताना त्याने मला आश्वासन दिले : "तुला परतीचे विमान तिकीट पाठवतो." त्रिनिदादमध्ये नोकरीची शक्यता मला चाचपून पाहायची होती. तमारासह तेथे स्थायिक व्हावे असा बेत होता. अर्थात या वेळी तमाराला नेणे शक्य नव्हते. कागदोपत्री ती माझी कुणीच नव्हती.

याच सुमाराला मॉस्कोत दोन मराठी कुटुंबे राहायला आली होती. भारतीय राजदूत श्री. इंद्रकुमार गुजराल यांचे खाजगी सचिव श्री. घाटणेकर यांच्याशी परिचय झाला. अनेक वर्षांच्या दिल्लीतील वास्तव्यामुळे दिलखुलास स्वभाव बनलेले श्री. व सौ. घाटणेकर अल्पावधीत दृढ मित्र बनले. त्यांची कन्या जयश्री व चिरंजीव राजू यांचीही दोस्तांमध्ये जमा झाली. वहिनी घाटणेकरांनी तमाराला काही मराठी शब्द शिकविले. उदाहरणार्थ : "अनिल मला खूप आवडतो. अनिल माझा हिरा !" तमाराने त्यांच्याकडून मराठी पद्धतीचा स्वयंपाक शिकून घेतला. तेव्हापासून प्रत्येक वीक एन्डला हाल्तुरिन्स्काया उलीत्सा ते होटेल युक्रेन समोरचा डिप्लोमॅटिक कोर्पूस यांच्या दरम्यान दळणवळण वाढले. बाळासाहेब घाटणेकर यांना पंजाबी मराठा असे म्हणू लागलो. तमारासुद्धा घाटणेकर कुटुंबात रमू लागली. घाटणेकरांमुळे पुण्याचे ब्रिगेडिअर आपटे यांच्याशी ओळख झाली. या दोन कुटुंबांमुळे पुढची तीन-चार वर्षे मॉस्कोत आमची दिवाळी साजरी व्हायची. सिंदकरांचा बहिष्कार दोन्ही कुटुंबांनी धुडकावून लावला आणि मला व तमाराला दिवाळीच्या निमित्ताने जेवायला बोलाविले. मॉस्कोच्या आसपासच्या प्रेक्षणीय स्थळांना त्यांच्या मोटारींमधून सहली व्हायच्या. मॉस्कोपासून सुमारे ८० कि.मी. अंतरावरच्या झागोर्स्क गावी तीन-चारदा गेलो. रस्ता खूप छान आहे. मध्ययुगातील चर्चच्या इमारती पाहायला मिळाल्या. येताना निसर्गाच्या सान्निध्यात दोन घोट दारू प्यायची आणि जेवायचे असा कार्यक्रम. फार मजेत दिवस गेले. एकदा तर ल्येव तल्स्तोय यांच्या यास्नाया पल्याना गावी गेलो होते. इंग्रजीत लिओ टॉलस्टॉय म्हणतात. पण रशियन नाव ल्येव तल्स्तोय आहे. यास्नाया पल्याना इस्टेटीवर पॉपलरच्या राईत पॉपलरच्या तीन झाडांदरम्यान तल्स्तोयचे साधे थडगे आहे. त्याच्या इच्छेप्रमाणे ह्या जागी त्याचे दफन केले म्हणे. या थोर जागतिक लेखकाचे चिर विश्रामाचे स्थळ खूप रम्य आहे. 'माणसाला किती जमीन लागते ?' असा सवाल करणारा तल्स्तोय तीन झाडांच्या दरम्यान पहुडलाय. तल्स्तोयच्या सात-आठ कथांचा अनुवाद करण्याचे श्रेय मला लाभले. त्या संग्रहात त्याची आयुष्यातील पहिली कथा 'दोन हुस्सार', आणि त्याच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झालेली कथा 'बॉल नृत्यानंतर', समाविष्ट झाल्या आहेत. 'क्राईत्सर सोनाटा' या कथेचे मराठी नाव 'शापित संगीत' दिले आहे.

कथासंग्रहाचे तेच नाव आहे. या पुस्तकाच्या किमान तीन-तीन हजार प्रतींच्या दोन आवृत्त्या निघाल्या. तल्स्तोयने लहान मुलांसाठीसुद्धा कथा लिहिल्या. त्यांचे मराठी अनुवाद पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालेत.

बाळासाहेब घाटणेकर व वहिनी घाटणेकर, तसेच दादासाहेब आपटे व वहिनी आपटे या दोन दांपत्यांच्या घरच्या पाट्र्यांचे आमंत्रण वारंवार मिळायचे. पर्यायाने दूतावासातील इतर भारतीय कुटुंबांच्या ओळखी झाल्या. त्यात कमोडोर पवन जैन आणि त्यांची पत्नी पूनम जैन यांच्याशी दाट मैत्री जमली. दूतावासातील अधिकृत दुभाषी व सध्याचे शिक्षण विभागाचे प्रमुख श्री. संतोष गांगुली व त्यांची पत्नी सपना यांची ओळख पूर्वीच श्री. गडकरी यांच्यामुळे झाली होती. नंतरच्या काळात त्या ओळखीचे दृढ मैत्रीत रूपांतर झाले. अशा रीतीने दूतावास पर्व सुरू झाले. राजदूत श्री. गुजराल यांच्या कारकीर्दीत मॉस्कोतील भारतीयांना दूतावास म्हणजे खरोखर आपल्या घरासारखा वाटायचा. श्री. गुजराल यांचा सौम्य स्वभाव सर्वांना आवडत होता. आमच्यासारख्या भारतीयांचे जीवन अधिक सुखकर व्हावे असे श्री. गुजराल यांनी प्रयत्न केले. हिंदुस्थानी समाजातील सदस्यांना भारतीय इंग्रजी वृत्तपत्रे मिळावीत अशी त्यांनी दूतावासातर्फे व्यवस्था केली. दर आठवड्याला आम्हाला वर्तमानपत्रे मोफत वाचायला मिळू लागली. शिवाय १५ ऑगस्ट आणि २६ जानेवारी या दिवसांना दूतावासाची चहापानाबद्दल निमंत्रणे आवर्जून यायची.

ऑक्टोबर महिन्यात एक दिवस मॉस्को-लंडन-पोर्ट ऑफ स्पेन या मार्गाचे परतीचे तिकीट खरोखर आले. व्हिसांसाठी माझी पळापळ सुरू झाली. लंडनचा ट्रान्झिट व्हिसा आवश्यक होता. खरे तर परतीचे तिकीट असताना लंडन एअरपोर्टवर ऐन वेळी व्हिसा मिळू शकला असता. पण मॉस्कोतील ब्रिटिश वकिलातीच्या अधिकाऱ्याने आडमुठेपणा केला. मॉस्कोत व पोर्ट ऑफ स्पेनमध्ये व्हिसा घ्यायला पाहिजे असा त्याने आग्रह धरला. दोन्ही स्थळी तीन-चार तास वेळ गेला.

सर्वसाधारणपणे मला मॉस्कोच्या एअरपोर्टवर सोडायला तमारा कधी यायची नाही. या वेळी ती आणि तिची मुलगी तान्या दोघीही आल्या.ऊ रझा अलींनी स्वत:च्या मोटारीतून आम्हा सर्वांना विमानतळावर नेले. का कोण जाणे

आनंदाऐवजी मनात प्रवासाबद्दल दडपण होते. ब्रिटिश एअरवेजच्या विमानाचा प्रवास तेवढा सुखकर वाटला नाही. सुमारे चार तासांत लंडन आले. लंडन वेळ मॉस्को वेळेपेक्षा दोन तास मागे आहे.

लंडनच्या हीथ्रो विमानतळावर एम्. पी. रावांचा नातेवाईक मला भेटण्यासाठी आला होता. ही तरतूद एम्. पी. यांनी पूर्वीच करून ठेवली होती. लंडनमध्ये एक दिवस राहण्याची सोय त्याच माणसाकडे होती. त्याने बिचाऱ्याने मला स्वतःच्या मोटरीतून पिकॅडिलीला नेले. कुठेतरी रेस्तराँमध्ये खाऊ घातले. स्वतःच्या घरात रात्रीचा निवारा दिला. पुन्हा दुसऱ्या दिवशी सकाळी एअरपोर्टला मोटारीने सोडले. त्या वेळी ब्रिटिश एअरवेजच्या कर्मचाऱ्यांचा 'गो स्लो' संप होता. विमाने तब्बल तीन-चार तास उशिरा जात-येत होती. प्रथमच जंबो ७४७ विमानातून पोर्ट ऑफ स्पेनपर्यंतचा प्रवास केला. ह्या अगडबंब विमानातील गच्च गर्दीचा इकॉनॉमी क्लास मुळीच आवडला नाही.

सुमारे आठ-नऊ तासांनंतर मुक्कामी पोहोचलो. विमानाच्या उड्डाणाचे क्रमांक व दिवस आनंद गोळीकेरीला तारेने कळवले होते. त्याआधी फोनने संपर्क साधण्याचे प्रयत्न केले होते. आनंद विमानतळावर भेटायला येईल अशी खात्री होती. खरेच तो विमानतळावर दिसला. त्याच्याबरोबर सौ. वहिनी व त्याचा सोळा-सतरा वर्षांचा मुलगा होता. मला पाहताच आनंद चकित झाला. नंतर त्याच्या आश्चर्याचे कारण समजले. केवळ योगायोगाने तो मला भेटला. माझ्या तारा त्याला मिळाल्या नव्हत्या. त्रिनिदादचे टपाल खाते थोर होते. त्याचा थोरला मुलगा लंडनला जाणार होता. म्हणून त्याला सोडण्यासाठी ते विमानतळावर आले होते. माझे दैव बलवत्तर होते.

पण कस्टममध्ये आणि पासपोर्ट कंट्रोलमध्ये मी तेवढा नशीबवान नव्हतो. माझे सामान तपासण्यात मुद्दाम दिरंगाई करण्यात आली हे माझ्या ध्यानात आले. करड्या प्रश्नोत्तरांनंतर नियमानुसार दहा दिवसांचा व्हिसा मिळाला. आनंदचा बंगला विमानतळापासून खूपच लांब होता. पोर्ट ऑफ स्पेन रात्रीच्या अंधारात विशेष दिसले नाही. दोन तीन मजली घरांच्या शिलोटी दिसत होत्या.

घरी पोहोचल्यानंतर आनंदा व वहिनींना कट ग्लासचे पेले भेट दिले. मॉस्कोत कट ग्लासचे पेले व फुलदाण्या उत्तम मिळायच्या. आनंदने दुसरी मोटार बाहेर काढली व तीन मिनिटांच्या अवधीत त्याचे मित्र शहानी यांच्या

बंगल्यावर पोहोचलो. इतक्या जवळ जायला मोटार कशाला असा मला प्रश्न पडला. आनंदने सांगितले की, पोर्ट ऑफ स्पेनमध्ये रात्री नऊनंतर बाहेर रस्त्यावर चालणे सुरक्षित नव्हते. त्रिनिदादमध्ये स्थायिक होण्याचा मनातील विचार प्रथम खोडला गेला. मला मोटार चालवता येतच नव्हती. पदयात्रेवर माझा आत्तापर्यंत भर होता. पोर्ट ऑफ स्पेनमध्ये सार्वजनिक वाहतूक व्यवस्था भिकार होती. टॅक्सी महाग होत्या. खच्चून भरलेले प्रवासी असायचे.

शहानी मला पाहून खूप आनंदले. त्यांनी त्यांच्या दोन मुलींची ओळख करून दिली. एक मुलगी वीस-बावीस वर्षांची असावी. दुसरी तिशीच्या सुमाराची. तिची आठ-दहा वर्षांची मुलगी तरतरीत दिसली. तिशीच्या तरुणीकडे मी विशेष लक्ष दिले नाही. या गोष्टीमुळे पुढे एक कथा घडली. कारण रूपगर्वितांकडे पुरुषाने लक्ष दिले नाही तर त्या त्याच्याकडे आकर्षित होतात हे नवे सूत्र मला आयुष्यात समजले. लौकरच सुंदरी वारंवार भेटायला येऊ लागली. आनंदचा मुलगा विचित्र वागायचा. स्वत: आनंद व्हिस्कीत कायम बुडायचा. पुन्हा पुन्हा तेच ते बोलायचा. चार-पाच दिवसांत मी त्या दिनक्रमाला कंटाळलो. बाहेर जाणे अवघड होते. सुंदरी रात्री मोटर घेऊन यायची. वेगवेगळ्या ठिकाणी घेऊन जायची. तिच्या मित्र-मैत्रिणींची ओळख करून द्यायची. व्हेनेझुएलातील एका तरुणाशी तिचे लग्न झालेले होते. आत्ता घटस्फोटिता होती व एका विमान कंपनीच्या बुकिंग ऑफिसमध्ये नोकरी करीत होती. तिच्याबरोबर फिरणे म्हणजे एक आनंद होता. पोर्ट ऑफ स्पेनच्या बकाल वातावरणात सुंदरीचा सहवास एक विरंगुळा होता. शहरातील रस्त्यांना मुंबई, मद्रास वगैरे नावे होती. हा देश चक्क १८-१९ व्या शतकातील हिंदुस्थान वाटत होता. हिंदू लोक धर्मभोळेपणाने वावरायचे. त्यांचे विचार खूप मागासलेले होते असे आढळले. रोटी-बेटी व्यवहार खुलेपणाने घडत नव्हते. हिंदू एका दहशतीच्या भावनेखाली जगत होते. स्थानिक लोकांमध्ये हिंदू अप्रिय होते. एका आलीशान हॉटेलातील रेस्तराँत रात्रीच्या जेवणासाठी गेलो तेव्हा काही लोकांनी आमच्याबद्दल हेटाळणीचे उद्‌गार काढले. त्रिनिदाद आणि टोबॅगो हा देश राजकीय आणि सामाजिक कलहांनी खदखदत होता. केव्हातरी हा स्फोट होईल असे मला त्या वेळी वाटले.

आता तेरा वर्षांनंतर माझा अंदाज खरा ठरला. त्या देशात सत्ता उलथून

टाकणाऱ्या बंडाळ्या होत आहेत. खून, मारामाऱ्या यांचा सुकाळ होता. दुकाने फोडण्याचे व जाळण्याचे सत्र सुरू होते. एक दिवस एका बँकेवर दरोडा पडला. त्या दरोड्यात रशियन बनावटीच्या कलाश्नीकोव बंदुकांचा वापर घडला होता. एकूण मुक्कामात मजा नव्हती. प्रेक्षणीय स्थळे पाहू शकलो नव्हतो. आनंद सारखा झिंगलेला असायचा.रात्री अपरात्री मला झोपेतून उठवायचा. शिवाय सुंदरी प्रत्येक वेळी उत्कट अनावर वागायची. मी हात राखून प्रतिसाद देत होतो. जर पुढचे पाऊल टाकले तर कायमचा अडकला जाण्याचा धोका होता. मात्र ऐन रात्री डोंगरमाथ्यावरच्या रस्त्यावर मोटारीतून जाण्यात आणि तेथून सुंदरीच्या चुंबन-आलिंगनांचा स्वाद घेण्यात आणि दूरवरच्या समुद्राला न्याहाळण्यात एक रोमँटिक भावना अनुभवाला यायची.

एक दिवस सुंदरीने पिकनिकचा बेत केला. ती, मी आणि तिचे वडील व तिची धाकटी बहीण पिकनिकला गेलो. आनंद त्यामुळे रागावला. त्याच दिवशी त्याच्या मुलाचा वाढदिवस होता. पण ते दोघे पिकनिकच्या मूडमध्ये बसत नव्हते. वहिनी बिचाऱ्या एकट्या उदास वावरायच्या. तो वैभवशाली बंगला सुखी नव्हता. पैशांमुळे आयुष्यात काही वेळा कुचंबणा होते हे खरे. पण केवळ पैसे असले तर सुखाचा लाभ होतोच असे नाही. ती परिस्थिती पाहून वाईट वाटायचे.

पिकनिकच्या दुसऱ्या दिवशी सकाळी आनंद बेचैन चेहऱ्याने माझ्यापाशी आला आणि म्हणाला की, श्रीयुत शहानींना माझे व सुंदरीचे फिरणे आवडत नव्हते. घरात बाप व मुलीचे कडाक्याचे भांडण झाले होते. मला वाटले, माझा काय दोष ? मी पुढाकार घेत नव्हतो. चूक एवढीच होती की, मी तिच्याबरोबर मोटारीतून जात होतो. मला घराबाहेर पडण्याची तेवढीच एक संधी होती. एक प्रकारची कोंडी बनली.

सुंदरी दोन दिवसांसाठी मिआमीला जाणार होती. तिला विमानाची तिकिटे सवलतीच्या दरांमध्ये मिळायची. तिच्या अनुपस्थितीत मॉस्कोला परतायचा मी निर्णय घेतला. नाही तरी माझी राहण्याची मुदत संपत आलेली होती. स्थानिक अधिकारी मुदत वाढवून देत नव्हते. शिवाय त्रिनिदादमध्ये स्थायिक होणे अशक्य होते हे स्पष्ट समजले होते. आनंदच्या व्यवसायाच्या चौकटीत मी बसत नव्हतो. सुंदरी प्रकरण हाताबाहेर जाण्यापूर्वी पळ काढायला हवा होता.

आनंदाचे आणि वहिनींचे आभार मानले आणि निरोप घेतला. भले गृहस्थ शहानी यांनी विमानतळापर्यंत मोटारीतून सोडले. बस्स ! कॅरीबियन सागराला रामराम केला !

लंडनमध्ये पिकॅडिलीच्या आसपास असलेल्या राथबोन नावाच्या छोट्याशा हॉटेलात मुक्काम टाकला. लंडन म्हणजे स्वच्छ मुंबई. दर पावलाला आशियाई नागरिक भेटायचा. इंग्रज माणूस औषधाला सापडत नाही. पूर्वी ऐकले होते की, लंडनची हवा लहरी. पण मॉस्कोची हवा त्यापेक्षा जास्त लहरी. लंडनचा शरद ऋतू मॉस्कोच्या शरदापेक्षा सौम्य वाटला. दोन दिवस पिकॅडिलीमध्ये पदयात्रा केली.

नेहमीच्या रिवाजाप्रमाणे बसमार्फत एक दिवसाची सिटी टूर घेतली. ऐतिहासिक महत्त्वाची स्थळे पाहिली. नामवंतांची थडगी पाहिली. टूर संपल्यानंतर गाईडने सढळ मदतीची याचना करताच आश्चर्य वाटले. कम्युनिस्ट देश आणि भांडवलदारी देश यांच्यातील फरक ह्या बाबतीत जाणवला. रशियातील गाईड जीव तोडून माहिती सांगत. त्यांना पगार विशेष नव्हते. लंडनमधील गाईडनाही पगार विशेष नसावेत. पण त्यांची याचना ऐकून विचित्र वाटले.

एक-दोन दिवसांच्या मुक्कामात नाटकाचे तिकीट मिळणे शक्य नव्हते. लंडनच्या पब्ज पाहून घेतल्या. एकटाच फिरत होतो. त्रिनिदादला विसरण्याचा प्रयत्न करीत होतो.

एका संध्याकाळी 'रिप ऑफ' या फ्रेंच रिव्ह्यूचा खेळ पाहिला. त्याच्याबद्दलची माहिती रझा अलींच्या घरातील एका मासिकात पूर्वी वाचली होती. नृत्य, संगीत, छाया-प्रकाश यांचा मनोहारी सुमेळ करणारा हा रिव्ह्यू होता. सर्व कलाकार पूर्ण नग्न होऊन नाचत होते. अवघ्या दहा मिनिटांनंतर त्यांच्या नग्नतेचा प्रेक्षकांना विसर पडला. नृत्यामार्फत छोट्या छोट्या प्रसंगांचे चित्रण केले जात होते. असा नावीन्यपूर्ण खेळ मी प्रथमच पाहत होतो.

ब्रिटिश एअरवेजच्या मॉस्कोमार्गे टोकियोला जाणाऱ्या विमानात आसन आरक्षित केले. हीथ्रोवरच्या इमिग्रेशन ऑफिसरने मला थांबवून माझा रशियन व्हिसा बारकाईने न्याहाळला. त्या विमानातील माझ्यासह फक्त तीन उतारू मॉस्कोला उतरले. घरी आल्यासारखे वाटले. परिचित रस्ते, परिचित चौक, पण

घरी तमारा नव्हती. माझे आगमन अनपेक्षित होते. ती तिच्या अपार्टमेंटमध्ये गेली होती. चुंबन-आलिंगनांची देवघेव झाली. असे रिवाज पार पाडण्यात मी पटाईत बनलो होतो. मग तमाराला भेटवस्तू दिल्या. या बाबतीत ती फार संवेदनाक्षम वागायची. आवडीच्या बाबतीत फार चोखंदळ. सर्वांत सुरक्षित मार्ग म्हणजे फ्रेंच परफ्यूमची बाटली आणणे. कपडे आणायचे म्हणजे मापापासून गोंधळ. कारण रशियात मापे वेगळी. युरोपची मापे वेगळी. ती एक फार मोठी डोकेदुखी असायची.

वेळेआधी मी परत आलो म्हणून सर्वांना आश्चर्य वाटले. मी कुणालाही खुलासा केला नाही. रशियातून बाहेर पडण्याचा एक प्रयत्न फसला होता. मुकाट नेहमीच्या कामाला लागलो, पण डोक्याला एक नवा ताप निर्माण झाला. मृत्यूपूर्वी अभयने पुण्यातील राहत्या जागेवर कुणाकडून तरी कर्ज काढले होते. त्या माणसाने मुंबईत मामा व बेबीकडे तगादा लावला होता. शेवटी भारतीय दूतावासामार्फत पत्र पाठविले. ही निष्कारण कटकट होती. अभय हा अज्ञान नव्हता. पैसे देणारा माणूस सज्ञान होता. हा व्यवहार केवळ त्या दोघांचा होता. अभय अचानक वारला. त्याच्या देण्याघेण्याचे व्यवहार मला काहीच माहीत नव्हते. मी दूतावासातील अधिकाऱ्यांना परिस्थिती समजावून सांगितली. ज्या माणसाने पत्र लिहिले होते त्यालाही खुलासा देणारे पत्र लिहिले. अभयचा साप्ताहिकाचा प्रयोग अंगाशी आला होता. त्याने त्यापायी बरेच कर्ज केले होते. मरणारी माणसे मरतात. जे मागे जिवंत राहतात त्यांना कटकटी मिटवाव्या लागतात. मूळ घरमालकाने अपार्टमेंटला पटकन टाळे लावले होते. अभयने त्याला नियमितपणे भाडे दिलेले नव्हते. म्हणजे मला फसविले होते. मी सतत त्याला भाड्यासाठी पैसे पाठवत होतो. मला भारतात राहण्यासाठी जागा नव्हती. वडील वारले. डॉक्टर, वाणी यांची बिले ठेवून गेले. धाकटा भाऊ वारला. तगादेदार मागे ठेवून गेला. एवढेच बरे की, तो अविवाहित होता.

*

# ली पझिग-बुखेनवाल्ड

आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाला हजर राहण्यातील अपूर्वाई संपली होती. तरीही ठराविक दिनक्रमापासून दूर पळण्याची संधी सोडत नव्हतो. वेळ भरपूर होता. काम योजनेआधी पूर्ण झाले होते. जाण्याचा खर्च करण्याची ऐपत होती. शिवाय लीपझिगच्या महोत्सव समितीचे आग्रहपूर्वक निमंत्रण होते. म्हणून आता लीपझिगला निघालो.

पूर्वी कॉलेजात असताना ना. सी. फडक्यांच्या कादंबऱ्या वाचून मनात वाटायचे, आगगाडीच्या प्रवासात आपल्याला एखादी सुंदर तरुणी भेटावी. मराठी नाटक कंपन्यांच्या भिकार दौऱ्यांमध्ये असे कधी घडले नव्हते. लीपझिगच्या या वेळच्या प्रवासात खरोखरच पंचविशीची सुंदर जर्मन तरुणी भेटली. मी नेहमीप्रमाणे फर्स्ट क्लासमध्ये व्हिस्कीची बाटली उघडून एकटा बसलो होतो. कंटाळून बाहेरच्या कॉरीडॉरमध्ये आलो. तेथे मोनिका भेटली. संभाषण रशियन भाषेत घडले. पूर्व जर्मनी रशियाचा मांडलिक होता म्हणून तेथे रशियन भाषा सक्तीने शिकवली जायची. ही गोष्ट माझ्या पथ्यावर पडली. मोनिका एका जनरलची मुलगी होती. तिचा नवरा मॉस्को विद्यापीठात शिकत होता. पूर्वी तीसुध्दा मॉस्को विद्यापीठात शिकली होती. आता लीपझिगच्या आसपासच्या गावी वडिलांकडे निघाली होती. तेथे तिचा लहान मुलगा होता. गप्पांच्या ओघात मी तिला माझ्या कूपेमध्ये व्हिस्की प्यायला बोलविले. ती आनंदाने आली. तिची शरीरयष्टी सडपातळ असली तरीही स्तन भरदार होते. दोन स्तनांमधील खोल घळ डोळ्यांना सतत आकर्षून घ्यायची. स्त्रीला

पुरुषाच्या नजरेतील कौतुक पटकन कळते. कौतुक आणि लंपटता यातील फरकही कळतो. जाता जाता ती सूचक हसली व म्हणाली: "लीपझिगमध्ये परवा दुपारी चार वाजता तुला भेटायला येईन."

लीपझिगमध्ये या वेळी हॉटेलात जागा मिळण्यासाठी खूप त्रास झाला. प्रतिनिधी जास्त झाले होते. खोल्या कमी पडल्या. चार-पाच तासांच्या प्रतीक्षेनंतर एका जुनाट हॉटेलात जागा मिळाली. तीसुद्धा एका खोलीत चारजणांना. त्या हॉटेलात सामायिक न्हाणीघर होते. त्याला सतत कलूप. आत जाण्यासाठी दरवानाला बोलावून घेण्याची पीडा होती. माझ्या खोलीत बल्गेरियन प्रतिनिधी होते. ही गोष्ट भावी काळात माझ्या फायद्याची ठरली. कारण बल्गेरियातील वार्ना चित्रपट महोत्सवाचे ते आयोजक होते. परिचय झाल्यानंतर त्यांनी आगामी वार्ना महोत्सवाचे निमंत्रण दिले. अर्थात पत्त्यांची देवघेव झाली.

संध्याकाळीच लीपझिग महोत्सव समितीच्या कार्यकर्त्यापाशी हॉटेलच्या जागेबाबत मी तक्रार केली. सुदैवाने रात्री नव्या, सुंदर हॉटेलात एक स्वतंत्र खोली मिळाली. खोली आटोपशीर होती. तिच्यात नेहमीसारखा पलंग नव्हता. सखल पलंग होता. छोटी बाथरूम होती. आत शॉवर घेणारी व्यक्ती तिच्या काचेतून दिसायची. हे सारे नेपथ्य पुढील पटकथेसाठी आपोआप तयार झाले. सांगितल्याप्रमाणे मोनिका आली नाही. होटेलच्या भानगडीत मीही तिला विसरलो होतो.

दुसऱ्या दिवशी पाच वाजता कॅपिटॉल सिनेमागृहातून जिना उतरून आलो तो समोर पाहतो काय ! थंडीने कुडकुडणारी, निळी पडलेली मोनिका उभी होती. तिने एकदम मिठी मारली आणि हकीगत सांगितली. आदल्या दिवशी तिच्या मुलाची प्रकृती अचानक बिघडली होती म्हणून ती येऊ शकली नव्हती. आता तो बरा झाल्यानंतर त्याला आई-बापांच्या हाती सोपवून ती आली होती. कारण येण्याचे वचन तिने मला दिले होते. लीपझिगमधील सर्व होटेले तिने धुंडाळली होती. शेवटी तिला सुचले की, माझी हमखास भेट कॅपिटॉल सिनेमागृहात होणे शक्य होते. गेले दोन तास ती तेथेच उभी होती.

मी तिला चटकन सांगाती घेतले. होटेलच्या काउंटरपाशी तिने रीतसर स्वतःचे नाव नोंदविले आणि भारतीय मित्राला भेटायला आले आहे असे सांगितले. ही गोष्ट रशियात शक्य नव्हती.

माझ्या खोलीत आल्यानंतर मोनिका मला बिलगत म्हणाली, "मी तुला हवी आहे ?" मी तिचे चुंबन घेतले. नंतर युरोपातील तरुणींच्या रिवाजानुसार ती शॉवर घ्यायला गेली. शय्यासोबतीपूर्वी आंघोळ केली म्हणजे स्वच्छ तर वाटतेच शिवाय कामभावना जास्त फुलतात, असा एक खुलासा तिने केला. त्यानंतर मोनिका आणि काळ्या जॉनी वॉकर व्हिस्कीची बाटली यांची पाच दिवसपर्यंत संगत होती. चित्रपट महोत्सवाला विसरलोच. काही बिघडत नव्हते. चित्रपट पुन्हा पाहता आले असते. मोनिका पुन्हा भेटली नसती. दरम्यान रेस्तराँत जेवणाच्या वेळी बल्गेरियन मित्र भेटत होते. माझी थट्टा करीत होते.

जर्मन कामाक्षीचा धुंद-फुंद सहवास संपला. जीवनाचे चित्रच बदलले. महोत्सव समितीने वायमार व बुखेनवाल्डची एक दिवसाची सहल आयोजित केली होती.

वायमार ठीक होते. पण बुखेनवाल्ड ! दुसऱ्या महायुद्धातील कुप्रसिद्ध छळछावणी पाहिल्यानंतर मन कमालीचे सुन्न बनले. आमचा जर्मन गाईड याच छावणीत कैदी म्हणून राहिलेला होता. त्याच्या डोळयांखालची दुहेरी वर्तुळे त्याच्या यातनांची साक्ष सांगत होती. हिटरलच्या नाझी सहकाऱ्यांनी मनुष्यसंहाराच्या किती भयानक कल्पना अमलात आणल्या ! वैद्यकीय तपासणीसाठी कैद्याला जेथे उभे करीत त्या फळीवर डोक्यापाशी एक भोक आहे. त्या भोकातून बंदुकीच्या गोळ्या मारीत. कैद्याला जर सोन्याचे दात असले तर त्याचा मुडदा वेगळ्या जागी ! अशा रीतीने सोने गोळा करीत. मुख्य बळी रशियन स्त्री-पुरुष होते. शिवाय पोलिश ज्यू आणि जर्मन कम्युनिस्ट. रशियन तरुणींच्या सोनेरी केसांचे ढीग पाहून कसेसे वाटले. जर्मन लष्करी अधिकारी अत्यंत विकृत मनोवृत्तीचे होते. त्यांनी तरुणींच्या कवट्यांचे टेबल लॅम्प बनविले. कातडी हातमोजे नरम व्हावेत म्हणून तरुणींच्या गर्भाशयांची त्वचा वापरायचे. युरोप किती रानटी होता हे भयानकरीत्या दिसले.

बुखेनवाल्डपासून परत येताना दुपारचे जेवण जाईना. मॉस्कोत परतल्यावरही ती दृश्ये सारखी नजरेसमोर यायची. एकच सफर दोन वेगवेगळ्या रंगांमध्ये घडली. नंतर लीपझिग महोत्सवाला जाणे बंद केले.

*

# नोकरीत अरिष्ट आणि दुसरा विवाह

दुसऱ्या कराराचा कालखंड संपत आला होता. त्रिनिदादमध्ये नोकरी मिळविण्याचा प्रयत्न फसला होता. पपा जागीरदार आणि श्रीकांत यांनी नव्या चित्रपटनिर्मितीत तसूभरही प्रगती केली नव्हती. प्रगती प्रकाशनमधील मराठी विभागाचा विस्तार झाला होता. एक वरिष्ठ संपादक, दोन कनिष्ठ संपादक, एक प्रूफ रीडर, एक कॉपी-लेखक अशा पाच रशियन लोकांना मराठी विभागात नोकरी मिळाली होती. कधी कधी मी थट्टेने म्हणायचो की, किमान पाच रशियनांना मी पोसतो. पुस्तकांचे अनुवाद चालू होते. चेखोवच्या कथांचा संग्रह तयार झाला. राजकीय विषयावरची पुस्तके चालूच होती. त्यात अमेरिकन लेखक जॉन रीड यांच्या 'जगाला हादरवणारे दहा दिवस' ह्या पुस्तकाचा अनुवाद घडला. ऑक्टोबर क्रांतीच्या वेळी हा लेखक प्रत्यक्ष रशियात होता. हे पुस्तक जगभर गाजलेय.

दरम्यान घरी भारतीय लोकांची वर्दळ वाढली होती. घाटणेकर कुटुंब होतेच. एअर इंडियाचे पायलट, इंजिनिअर व पर्सर वगैरे येऊ लागले. त्यात प्रभाकर प्रभू हा इंजिनिअर पूर्वीच ओळखीचा झाला होता. त्याच्याबरोबर सुभाष कान्हेरे हा पर्सर आला. हा सुभाष माझ्यावर खूष होता त्याचे कारण त्याच्या बायकोच्या अभिनयाचे कौतुक पूर्वी सा.'मनोहर' मध्ये मी केले होते. अभिनेत्री कु.कुंदा निरगुडकर सुभाषची पत्नी झाली. हा सुभाष व सौ.कुंदा कान्हेरे या दशकात घनिष्ट स्नेही बनले.

आणखी एक मजेशीर परिचय घडला. चित्रपट दिग्दर्शक बासू भट्टाचार्य

याची बायको रिंकी भट्टाचार्य हिची चिठ्ठी तिचा मामा घेऊन आला. हा मामा म्हणजे वैमानिक कॅ.देबू सेनगुप्ता. देबूमुळे कॅ.सुभाष ठाकूर याची ओळख झाली. कॅ.ठाकूर म्हणजे सौ.सुनीता देशपांडे यांचा धाकटा भाऊ. कॅ.ठाकूर पूर्वी भारतीय विमानदलात होता. तो मूळचा रत्नागिरीचा असल्यामुळे त्याचे मित्र त्याला 'थीबे' म्हणून हाक मारतात. मी त्याला थीबाराजे असे म्हणतो. बघता बघता मैत्री वाढली. त्यातच शाळूसोबती कॅ.अरुण गोडबोले भेटला. मला आणि तमाराला मराठी माणसांचे फार कौतुक होते. सर्व मराठी माणसांना आम्ही घरी प्रेमाने बोलावत होतो. माफक मद्यपान आणि शिस्तशीर जेवण चालायचे.

अशा परिस्थितीत कॅ.सुभाष पटवर्धन ऊर्फ पॅट याची ओळख झाली. हा माणूस मजेदार आहे. स्वतः दारू पीत नाही. पण दारू पिणाऱ्या मित्रांबरोबर मजेने गप्पा मारीत बसतो. एवढेच नव्हे, 'ओल्ड मंक' ही भारतीय रमची बाटली माझ्यासाठी त्याने अनेकदा आणून दिली.

बहुतेक भारतीय परदेशात व्यापार वा इतर नोकऱ्या करतात. पण मराठी भाषेचा वापर करणारा आणि पुस्तके अनुवादित करणारा एकमेवाद्वितीय माणूस म्हणून माझ्याबद्दल थीबाला कौतुक वाटायचे. तो आणि सुभाष कान्हेरे सोबत मित्रपरिवार घेऊन जायचे. कधी चहा, लोणची, कॉफी, बासमती तांदूळ वगैरे वस्तू आणत. भारतीय फळांना मॉस्कोत आणू देत नाहीत. तरीही थीबाने तमारासाठी आंबे आणले. खरोखरीचा आंबा तिने प्रथम पाहिला आणि चाखला. एकदा मॉस्कोत कांद्यांचा तुटवडा पडला. थीबा तिच्यासाठी मुंबईहून दोन किलो कांदे घेऊन आला. मॉस्को विमानतळाचे अधिकारी कांदे सोडेनात. कांद्यांचे बुडखे कापा असे सांगू लागले. बिचारा थीबा व विमानातील इतर कर्मचारी विमानतळावरच कांद्यांचे बुडखे तासभर कापत बसले. नववर्षाच्या सुमाराला मॉस्कोत काकडी व टोमॅटो म्हणजे पक्वान्न. बाजारात भरमसाट किमती असतात. अशा वेळी थीबाराजे टोमॅटो व काकड्या घेऊन आले आणि शॅंपेन पिऊन नवे वर्ष साजरे करून गेले.

मॉस्कोतील पूर्वीची एकाकीपणाची भावना कमी झाली. आता मॉस्कोत स्थायिक व्हायला हरकत नाही असा विचार मनात येऊ लागला. त्यातच जेवायला येणाऱ्या मराठी माणसांचा तमाराला भारतात येण्याचा आग्रह व्हायचा. अशा परिस्थितीत एक दिवस घाटणेकर म्हणाले : "आता करून टाक

लग्न ! उगीच तसं कशाला राहतोस ? नवरा-बायकोसारखं राहता !" त्यांचे म्हणणे खरे होते. आमचे सहजीवन पाच वर्षांचे होते. पण उभय देशांच्या परवानग्या मिळविणे फार तापदायक होते. घाटणेकरांमुळे भारतीय बाजू भक्कम होती. कागदपत्रांच्या भानगडी भराभर मिटणार होत्या. म्हणून मी हा विषय तमाराला सुचविला. तिने होकार दिला. तिच्या आईचे संमतीपत्र आणले.

हे सर्व ठीक होते. पण माझे आयुष्य कधीही सरळ जात नाही. एका बाजूला खूप चांगले चालत असताना दुसरीकडे छद्मीपणे हसते. मुंबईच्या लोकवाङ्मय प्रकाशन गृहातील पुराणमतवादी कम्युनिस्टांना माझे मॉस्कोतील वास्तव्य सलत होते. प्रगती प्रकाशनाचे लोकवाङ्मय प्रकाशन गृह भारतीय भागीदार आहे. मॉस्कोत मुद्रित केलेली पुस्तके ते महाराष्ट्रात विकतात. त्यांनी जॉन रीडच्या पुस्तकाच्या शीर्षकाबाबत खुसपट काढले. शीर्षक पसंत नाही म्हणून पुस्तकाच्या प्रती स्वीकारण्यास त्यांनी नकार दिला. मुंबईची खत्रूड माणसे असे काही करतील अशी अपेक्षा होती. 'नोवोस्ती' मधील अधिकाऱ्यांनाही पूर्वी ही कल्पना होती. आता 'प्रगती'च्या अधिकाऱ्यांचा गोंधळ झाला. त्यांना भाषेचे ज्ञान नव्हते. म्हणून अधिकारवाणीने बोलता येईना. मी माझ्या परीने समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. अर्थात वरिष्ठांच्या तात्काळ ध्यानात आले की, मुंबईच्या लोकांचा यामागे काहीतरी डाव होता. त्यांना स्वतःचा माणूस मॉस्कोला पाठवायचा होता. विचित्र लोक होते. वर्षानुवर्षे आपापसात लाथाळ्या करण्यात गुंतले होते. आता मराठी विभाग चांगला सुरळीत चालला होता ते त्यांना बघवत नव्हते. पुरोगामित्वाचा टेंभा मिरवणारी ही माणसे विलक्षण सनातनी होती. त्यांच्या हातून विधायक काम कधी घडले नव्हते. ह्याचा परिणाम माझ्या तिसऱ्या करारावर घडला. अनिसोव म्हणत होते : "या वेळी तीन वर्षांसाठी करार करणार नाही. फक्त एक वर्षासाठी करार करीन." मीसुद्धा हट्टाला पेटलो. "यात माझी चूक नाही. हे मुंबईवाल्यांचे कारस्थान आहे. नियमाप्रमाणे मला तीन वर्षांचा करार पाहिजे. अजून माझ्यापाशी मुंबईत पुरेसे पैसे साठले नाहीत." रशियन वरिष्ठांना माझे म्हणणे पटत होते. पण पुस्तकाच्या विक्रीचा पेच उभा होता. मार्गो बिचारी उभय पक्षांची समजूत घालत होती. शेवटी मी कबूल झालो. कारण अभयच्या आजारापायी बँकेतील गंगाजळी तळाला गेली होती. पुस्तकाच्या शीर्षकाच्या प्रकरणाचा छडा लावायला हवा होता. म्हणून मुंबईला

निघालो. मुंबईला जाण्यासाठी एअर इंडियाची फ्लाईट मिळविण्यासाठी खूप खटपट केली. आता 'एअरोफ्लोत' वाले जास्त आडमुठेपणा करू लागले. 'भारतीय नागरिकाला भारतीय विमान कंपनीच्या विमानाने प्रवास करायचा अधिकार आहे' असे मी ठासून सांगत होतो. तिकिटाचे पैसे मी माझ्या खिशातून देत होतो. अखेर 'एअरोफ्लोत'चा अधिकारी कबूल झाला. खरे म्हणजे अशी मनाई करणारा नियम कोठेही छापलेला नव्हता. तो दाखवा म्हणून मी तशी मागणी केली होती. पण हात उडविणे आणि खांदे उंच करणे हीच उत्तरे मिळाली. 'एअर इंडिया'ने प्रवास करणे जास्त सुखकर आणि सोयीचे होते. मॉस्कोत बसल्यानंतर थेट मुंबईत उतरायचे. दिल्लीला विमान बदलण्याचा व्याप नव्हता. शिवाय हसतमुख हवाई सुंदरी.

दुर्दैवाने त्या रात्री पॅरिसहून येणारे विमान लेट होते. घाटणेकरांना ही बातमी आधी समजली. त्यांनी मला फोन केला आणि सांगितले. म्हणून विमानतळावर मी फार लवकर गेलो नाही. योग्य वेळी गेलो. तेव्हा विमानतळावर माणसांची संख्या तुरळक होती. माझी एकट्याचीच सूटकेस सरकत्या जिन्यावरून रवाना झाली.

त्या सूटकेसचे पुन्हा दर्शन कधी घडले नाही ! मुंबईत उतरल्यानंतर आढळले की, सूटकेस आली नव्हती. माझ्यासारख्या दोन-तीन परदेशी प्रवाशांच्या सूटकेसेस अशाच गहाळ झालेल्या होत्या. माझ्या सूटकेसमध्ये कपडे, शेव्हिंग मशिन आणि पुस्तक प्रसिद्ध करण्याच्या हेतूने छापील लेखांचा गठ्ठा होता. तसे भौतिक नुकसान प्रचंड नव्हते. रशियातून काय आणणार ? लाकडी मात्र्योष्का बाहुल्या, छोटे वूलन रुमाल, शाली आणि चॉकलेटांचे खोके. बस्स ! हातातील बॅगेतले कट ग्लासचे चार चषक वाचले होते.

सुदैवाने कस्टमच्या काउंटरवर कॉलेजातील वर्गमित्र दिसला. एम.ई.एस. कॉलेजात शिकताना वसईकर बरोबर होता. त्याने योग्य तो अर्ज करण्यास सांगितले. पण असे अर्ज करून हरवलेल्या वस्तू कधी मिळतात ?

आठ-दहा दिवस विमानतळावर खेटे घातल्यानंतर मित्रवर्य श्रीकांत मोघे उपयोगी पडले. त्यांच्या ओळखी सर्वत्र. 'एअर इंडिया' तील वरिष्ठ अधिकाऱ्यांपर्यंत माझी तक्रार पोहोचली. तात्काळ नियमाप्रमाणे नुकसानभरपाई मिळाली.

अशा वेळी वाटते की, आयुष्य म्हणजे एक दमणूक आहे ! सूटकेस प्रकरण संपल्यानंतर समजले की, 'सोविएत देश'मधील श्री. प्रफुल्लकुमार मोकाशी यांना मॉस्कोत पाठविण्याची लोकवाङ्मय गृहवाल्यांनी तयारी केली होती. मी मोकाशींना खरी परिस्थिती समजावून सांगितली. त्यांची मुले अजून शिकत होती. त्यांनी निर्णय घेतला की, मॉस्कोला जायचे नाही. फार मोठा शहाणा निर्णय घेतला. आज 'सोविएत देश' मध्ये मोठ्या पदावर आहेत आणि चांगला पगार मिळवत आहेत. जर मॉस्कोला आले असते तर त्यांच्या पूर्ण कुटुंबाची वाताहत झाली असती. माझ्यासारख्या सड्याफटिंग माणसाचीसुद्धा भयानक परवड झाली.

मॉस्कोत विमानतळावर निघण्यापूर्वी शैला डांगे व रझा अली मुंबईला पत्रे देण्यासाठी म्हणून घरी आले. मॉस्कोत असा प्रघात होता. कुणी भारतात निघाले तर भराभरा माणसे पत्रे घेऊन येत. त्यामुळे पत्र लौकर पोहोचायचे. शैलाताईंनी त्यांच्या वडिलांसाठी एक पत्र दिले. मुंबईत मामा व बेबीकडे उतरल्यानंतर मी ते पत्र पोस्टाच्या पेटीत टाकले. आठवड्यानंतर श्री. डांग्यांचा निरोप आला. त्यांनी मला भेटायला बोलावले होते. ही घटना अनपेक्षित होती.

प्रत्यक्ष भेटीत समजले की, शैलाताईंनी जॉन रीडच्या पुस्तकाबाबतची भानगड श्री. डांग्यांना पत्रामार्फत कळविली होती. माझ्या नकळत शैला व रझा यांनी पत्रामार्फत माझी तरफदारी केली होती. श्री. डांगे यांच्याबरोबर नासिकचे कुणी कार्यकर्ते व श्रीमती रोझा देशपांडे बसल्या होत्या. 'मॉस्कोचा करार संपला तर मी पुढे काय करणार ?' असा प्रश्न श्री. डांग्यांनी केला. चित्रपटसृष्टीत पटकथा-लेखक म्हणून प्रयत्न करीन असे मी उत्तर दिले. कम्युनिस्ट पक्षाच्या वर्तमानपत्रांमध्ये लेख लिहा असे श्रीमती देशपांडे म्हणाल्या. दोन्ही माणसे छान वागली. मला मदत करण्याचा त्यांचा हेतू कळत होता. पुढे लोकवाङ्मय गृहात चक्रे कशी फिरली ते कोण जाणे !

यानंतर कळस म्हणजे लोकवाङ्मयवाल्यांनी त्याच पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीची मागणी नोंदवली. तेव्हा मी 'प्रगती'मध्ये नव्हतो. 'रादुगा'मध्ये होतो. दुसऱ्या आवृत्तीचे शीर्षक विचित्र छापले आहे. या वेळी लोकवाङ्मयवाल्यांना झोप लागली असावी.

या प्रकरणाचा एक मोठा फायदा झाला. अनिसोव यांचा माझ्यावर गाढा

विश्वास बसला. मार्गो बेनचा प्रथमपासूनच विश्वास होता.

दरम्यान भारत सरकारकडून लग्नाच्या परवानगीच्या कागदपत्रांची वाट पाहत होतो. जरुरीपेक्षा विलंब लागला होता.

त्या परवानगीनंतर सोविएत सरकार परवानगी देणार होते. पण भलतेच पत्र आले. पूर्वीच्या श्रीमती आरती हवालदारांनी खोडा घातला. परित्यक्तेचे आसू पाहून मुंबईतील भारतीय अधिकारी विरघळला होता. पत्र वाचल्यानंतर माझा संताप उडाला.

खरे तर भारतीने यापूर्वीच दुसरे लग्न केले होते. मी जुईसाठी देत असलेले पैसे मध्यंतरी तिने व तिच्या नवऱ्याने नाकारले होते. आता म्हणे नवरा-बायकोचे पटत नव्हते. तेव्हा भारतीने जुईच्या खर्चाची माझ्याकडून अपेक्षा व्यक्त केली होती. हे तिने मला सरळ कळवले नव्हते. पण मूळ हलकट स्वभावानुसार सरकारी अधिकाऱ्यापुढे बोलली. म्हणून विलंब झालेला होता. माझ्याकडे बँकेच्या सर्व नोंदी होत्या. तात्काळ दूतावासासमोर कागदपत्र ठेवले. महत्त्वाचे कागदपत्र जपून ठेवण्याची सवय आहे. दूतावासातील प्रथम सचिव समजदार गृहस्थ होते. त्यांनी सरकारकडे माझी बाजू मांडली. निष्कारण मनस्ताप झाला. ह्याची वाच्यता मी कुणापाशीही केली नाही. तेच चुकले होते. कारण बेबी व मामा मुंबईत भारतीचे व तिच्या नवऱ्याचे आगत-स्वागत करीत होते. त्यांच्याकडे जात होते. अर्थात जुईचा तनखा माझ्याकडून चालू होता. या अप्रिय गोष्टींचे राग मनात साचून गेले. त्यांची मला फार मोठी किंमत द्यावी लागली. पैशाच्या दृष्टीने आहेच. प्रकृतीच्या दृष्टीने अत्यंत वाईट.

या काळापासून माझ्या झोपेवर अनिष्ट परिणाम झाला. सारखी वाईट स्वप्ने पडायची. त्या स्वप्नांमध्ये मेलेले दादा, आई व अभय दिसायचे. त्याचप्रमाणे 'यासीन मंझिल' मधील घर भयाण स्थितीत दिसायचे. ह्या मेलेल्या माणसांनी आणखी दहा वर्षेपर्यंत छळले.

एवढ्या यातायातीनंतर लग्नाची परवानगी आली. अर्थात तमाराला या गोष्टींची कल्पना नव्हती. ती बिचारी तिच्या ऑफिसमधल्या कटकटींना तोंड देत होती. परदेशी नवरा म्हणून तिचे वरिष्ठ तिला त्रास देत होते. एकही नोकरी टिकत नव्हती. चारित्र्याच्या बाबतीत मी ढिला होतो. पण तमारा विलक्षण एकनिष्ठ होती. वरिष्ठांच्या वासनापूर्तीला तिने नकार दिला. वस्तुतः तिच्या

पैशांवाचून घरची चूल अडत नव्हती.

सोविएत सरकारची संबंधित अधिकारी मंडळी उर्मट वागत होती. लग्नाच्या कायदेशीर नोंदणीचे कागदपत्र अमाप होते. फार गुंतागुंती होत्या. तरुण विद्यार्थ्यांना त्यांचे विशेष वाटत नाही. चाळीशीला आलेल्या माझ्यासारख्या माणसाला ते वर्तन फार अपमानास्पद वाटायचे. रशियन स्त्रीबरोबर विवाह म्हणजे महाप्रचंड कटकट. ही रीतसर नोंदणीची बाब. शिवाय लग्नानंतर बायको करते ती कटकट वेगळी असते. लग्न करणे हे एक प्रकारचे व्यसनच. चुका घडूनसुद्धा माणूस पुन्हा पुन्हा चुका करतो. मी या बाबतीत अपवाद नाही.

खास परदेशीयांसाठी नियोजित केलेल्या कीरोवस्काया विभागातील विवाह नोंदणी कचेरीत नोंदणीची तारीख ठरली. सह्या करतेवेळी तमाराची मुलगी तान्या आली होती. विक्तर आणि ल्यूदा हे जोडपे आले होते. घाटणेकर दांपत्यही आले होते. सह्यांचा कागद स्वीकारणाऱ्या रशियन महिला अधिकाऱ्याने मान वरसुद्धा केली नाही.

त्या संध्याकाळी मेत्रोपोलमध्ये मी शानदार पार्टी दिली. पंधरा भारतीय व रशियन जोडपी मेत्रोपोलच्या वाद्यवृंदाच्या संगीताच्या तालावर लयबद्ध नाचत होती. बाळासाहेबांनी भेट दिलेल्या हिरव्यागार रंगाच्या जपानी साडीत तमारा जास्तच देखणी दिसत होती. साडी नेसणे तिला उत्तम जमते. युरोपीय बायका साडी विचित्र नेसतात. पण तमाराला साडी छान दिसते.

ही घटना घडली २९ मे १९८० रोजी. त्यानंतर पाठोपाठ मॉस्को ऑलिंपिक स्पर्धा चालू झाल्या. त्या काळात मॉस्को देखणे दिसत होते. बाहेरच्या नागरिकांवर मॉस्कोत येण्याबाबत नियंत्रणे होती. म्हणून गर्दी कमी. दुकानांमध्ये वस्तू मुबलकरीत्या उपलब्ध होत्या. ऑलिंपिक सोहळा प्रत्यक्ष पाहण्याचा योग होता. पण मी गेलो नाही. गर्दीचे वावडे ! टेलिव्हिजनवर पाहण्यात जास्त समाधान होते.

*

# झी परकाठीचे कीयेव

त माराबरोबरच्या लग्नाच्या धामधुमीआधी 'नोवोस्ती' मार्फत आलेल्या एका कामगिरीमुळे एप्रिल महिन्यात माझी खूप पळापळ झाली. 'यूथ रिव्ह्यू'चे संपादन बरीस व्लासोव व मरीना ब्लागोनरावोवा पाहत होते. इगर दोन वर्षांपूर्वीच नव्या दिल्लीतील सोविएत माहिती खात्याच्या कचेरीत काम करायला गेला होता. त्याच्याबरोबर त्याची बायको नतालिया व नतालियाचा मुलगा राहात होते. 'प्रगती' मधील अरिष्ट मिटवून आणि मुंबईतील सूटकेस प्रकरण आटोपून दिल्लीमार्गे मॉस्कोला परतताना इगरची दिल्लीत भेट घेतली. इगर-नतालियासमवेत जेवण घेतले. त्यांचा आनंदाचा संसार पाहून मनाला समाधान वाटले. 'नोवोस्ती' मध्ये नियमांची बरीच उलटापालट झाली होती. मला मुंबईत नोकरी मिळू शकत नव्हती. दिल्लीतील सोविएत माहिती खात्याच्या कचेरीचे प्रमुख अकुलोव होते. त्यांना भेटून सर्व परिस्थिती सांगितली. पण पटकन प्रश्न सुटत नव्हता.

मॉस्कोत परतल्यावर 'प्रगती'ची नोकरी स्थिरावली. कारण नवा अनुवादक ताबडतोब येणे शक्य नव्हते. 'प्रवाहाच्या मध्यभागी घोडा बदलणे' ही गोष्ट अनिसोवना मंजूर नव्हती. माझा करार १९८२ पर्यंत लांबविण्यात आला. तेवढ्यात लग्नाची परवानगी आली. त्यातच कीयेवची सफर ठरली. प्रथम काम महत्त्वाचे होते. 'यूथ रिव्ह्यू' साठी चार-पाच लेखांची माला मुक्रर करण्यात आली. त्याच्या जोडीने 'किर्लोस्कर'साठी एक सविस्तर लेख मी तयार केला.

'यूथ रिव्ह्यू' मध्ये ताबडतोब जून महिन्यात इंग्रजी लेख प्रसिद्ध झाले.

'किर्लोस्कर' मध्ये १९८१ च्या जानेवारी महिन्याच्या अंकात लेख प्रसिद्ध झाला. माझ्या पूर्वीच्या लेखनाचा नमुना म्हणून प्रस्तुत ठिकाणी जसाच्या तसा लेख सादर करतो :

## कीयेव

*आजच्या सोविएत युक्रेनची राजधानी. प्राचीन कीयेव-रूस राज्याची राजधानी. सुमारे पंधराशे वर्षांपूर्वी द्नीपर नदीकाठी उंच टेकाडावर वसलेली ही रम्य नगरी. रशियन नगरींची माता. युक्रेनी संस्कृतीचे माहेरघर. अत्याधुनिक वैज्ञानिक उपकरणांच्या निर्मितीचे स्थळ.*

*अशी ही कीयेव नगरी मॉस्कोपासून अवघी सहा-सातशे किलोमीटर दूर. विमानाने फक्त सव्वा तासाच्या अंतरावर. पण काही ना काही कारणाने मॉस्कोच्या सात वर्षांच्या वास्तव्यात कीयेवला जाण्याचे राहून गेले होते.*

*कीयेवमधला वसंत फार प्रसिद्ध. सूर्यप्रकाशित 'हिरवे शहर' अशी कीयेवची ख्याती ! युक्रेनी भाषेत 'कश्तान' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या चेस्नटच्या झाडाची बहार कीयेवच्या रस्त्यावर फुललेली पाहायची होती.*

*मार्च ते जून हा इथला वसंताचा मोसम. तेव्हा एप्रिलच्या अखेरी, म्हणजे वसंताच्या ऐन बहरात, मॉस्कोहून कीयेवला भरारी घेतली. इथे सोविएत संघात रुळावरचा प्रवास करण्यास किंवा आकाशसंचार करण्यास साधारण सारखाच खर्च येतो. उलट आकाशसंचारात वेळेची अफाट बचत होते. रात्रभर रुळांवरून जाण्यापेक्षा मी आपला सव्वा तासात कीयेवच्या बरीसपोल विमानतळावर उतरलो. पण जमिनीवर उतरताच डोक्यावर पर्जन्यधारा पडू लागल्या. कुठला वसंत आणि कुठले ऊन ! एरवी थंड असणारे मॉस्कोच त्या दिवशी कीयेवपेक्षा बरेच गरम होते !*

*सुदैवाने माझ्या सोबतीला पत्रकार मरीना होती. आमच्या कीयेव सफरीनंतर लवकरच ती तीन महिन्यांसाठी भारताच्या दौऱ्यावर जाणार होती. म्हणून आमच्या विमानप्रवासात ती जवाहरलाल नेहरूंचे रशियनमध्ये अनुवादित झालेले 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' वाचत बसली होती.*

*तर ह्या मरिनाने आपल्या चतुर संयोजनाने बरीसपोल विमानतळावर*

आधीच मोटार मागवून ठेवली असल्याने, पावसाच्या दोन-चार शिंतोड्यांना झेलून पटकन मोटारीत बसलो. सुंदर मैत्रिणीबरोबर पावसात भिजणे ही भारतीय कल्पना येथे रम्य ठरू शकत नाही. कारण इथला पाऊस फार गार असतो.

रुंद, प्रशस्त रस्ते आणि दुतर्फा दाट झाडी हे दृश्य विमानतळ ते शहर ह्या अंतरात एव्हाना सोविएत संघात सर्वत्र अतिपरिचित झाल्याने डोळ्यांना 'कवतिक' नव्हते. पण ज्नीपर नदीचे विशाल पात्र दिसू लागले. तिच्यावरील प्रचंड लोखंडी पुलावरून आमची मोटार जाऊ लागली. उजव्या अंगाला टेकडीवर रशियन धाटणीच्या चर्चचे सोनेरी घुमट झाडांमधून डोकावू लागले तेव्हा मात्र नजर चौकस बनली. वळणावळणाच्या अरुंद रस्त्यांनी मोटार ते टेकाड चढू लागली तेव्हा क्षणभर भास झाला की, महाराष्ट्रामधल्या थंड हवेच्या ठिकाणाला आपण चाललोय.

आणि खरोखर कीयेव शहर असेच उंच-सखल पातळ्यांवर वसलेले आहे. अशी दंतकथा आहे की, कीय, श्चेक व होरीव ह्या तीन भावांनी हे शहर वसविले. सर्वांत मोठ्या भावाचा मान राखायचा म्हणून त्याचे नाव शहराला देण्यात आले व कीयेव असे नाव पडले. ही घटना सहाव्या शतकामधली. आठव्या-नवव्या शतकात कीयेव हे स्लावांचे महत्त्वाचे आर्थिक, राजकीय आणि सांस्कृतिक केंद्र होते. ९ व्या १० व्या शतकात कीयेव-रूस हे प्राचीन रशियन राज्य अस्तित्वात आले व कीयेव त्याची राजधानी बनली. सुमारे तीनशे वर्षेपर्यंत कीयेव नगरी जुन्या रूसची राजधानी होती. ह्या काळात येथे साहित्य, कला, वास्तुशिल्प यांना बहर आला. जुन्या कीयेवच्या भव्यतेची आणि सौंदर्याची तुलना त्या काळी केवळ रोम आणि कॉन्स्तन्तिनोपल यांच्याशीच होत असे. पुढे तेराव्या शतकात खान बातीयच्या मंगोल-तातार झुंडींची कीयेववर धाड आली. एका शतकाहून अधिक काळपर्यंत कीयेवने तातारांच्या जुलमी राजवटीचे जोखड सोसले. पुढे लिथुआनियाच्या, पोलंडच्या सरदारांच्या ताब्यात हा मुलुख गेला. शेवटी १६५४ मध्ये युक्रेन आणि रशिया यांचे पुन्हा एकीकरण झाले. इतिहासाच्या ह्या विविध खुणा अंगावर बाळगून आजचे २० लाख वस्तीचे कीयेव उभे आहे. त्यात क्रेश्चातिक नावाचा सर्वांत लांब रस्ता शहरातून जातो. ह्या रस्त्याच्या आरंभी उभ्या असलेल्या 'ज्नीपर' हॉटेलात

आम्ही मुक्काम टाकला. ज्या नदीच्या काठी एखादे गाव वसते त्या नदीच्या नावाचा महिमा गावामध्ये ठायी ठायी जाणवत राहतो, ह्या सर्वसाधारण नियमाला कीयेव अपवाद नाही.

'द्नीपर' हॉटेलात खोलीच्या चाव्या घेण्यापासून ते त्याच हॉटेलच्या 'रेस्तराँ'मध्ये युक्रेनी भोजन घेण्यापर्यंत पार पडले तरी पावसाच्या सरी कोसळतच होत्या. कधी पुणेरी झिमझिम, तर कधी मुंबईच्या मुसळधार सरी. पहिली भेट ठरली होती, 'व्सेस्वित' (दुनिया) मासिकाच्या कचेरीला. ह्या मासिकानेच आपल्या अरुण साधूंच्या 'मुंबई दिनांक'चा युक्रेनी अनुवाद १९७६ साली प्रथम प्रसिद्ध केला होता. मी 'मराठी माणूस' म्हणून मरीनाने 'युक्रेनी-मराठी भाई भाई' अशा विचाराने ही नांदीची भेट ठरविली होती. मासिकाची कचेरी जवळच होती. टॅक्सी मिळण्याची शक्यता नव्हती. 'कम सामान बहुत आराम' हे भारतीय प्रवासातील घोषवाक्य माझ्या मनावर अजूनही प्रभाव ठेवून असल्यामुळे, मी 'छत्री' नामक वस्तू आणलेली नव्हती. एक स्त्री ह्या नात्याने मरीना छत्रीसह चोख आली होती. 'पुरुषदाक्षिण्य' म्हणून तिने आपल्या छत्रीत मला वाव दिला व अर्धभिजल्या अवस्थेत आम्ही 'व्सेस्वित' कचेरीत पोचलो.

मासिकाचे मुख्य सह-संपादक डॉ. अलेग मिकीतेन्को जय्यत वाट पाहत होते. त्यांच्या जोडीने मासिकाच्या आफ्रो-अशियाई विभागाचे तेरेख बसले होते. पहिल्या सलामीतच मी स्पष्ट सांगून टाकले की, 'मुंबई दिनांक'चा सोविएत संघातील पहिला अनुवाद 'व्सेस्वित' मासिकाने केलेला मला माहीत आहे आणि एक 'मराठी भाषक' म्हणून आपुलकीने त्यांच्या कचेरीच्या भेटीला मी आलोय. ('मुंबई दिनांक'चा रशियन अनुवाद लेनिनग्रादच्या प्राच्यविद्यापंडिता, नीना क्रास्नोदेम्बस्काया यांनी 'द्येन बाम्बेया' नावाने केला असून, मॉस्कोत ज्या 'प्रगती प्रकाशन'मध्ये मी काम करतो त्याच प्रकाशनसंस्थेने ते पुस्तक प्रसिद्ध केले आहे. पहिली आवृत्ती ३० हजारांची आहे.) स्तुती कोणालाही प्रिय असते आणि तिच्यामागे सत्य असले तर तिचा गोडवा वाढतो. तात्काळ माझ्यात व डॉ. मिकीतेन्को आणि तेरेख यांच्यात आपुलकीचा दुवा सांधला गेला. डॉ. मिकीतेन्को यांनी १९७५ मध्ये भारतातील प्रमुख शहरांचा दौरा करून भारतीय साहित्यिकांच्या भेटी घेतल्या होत्या व आधुनिक भारतीय साहित्याचा कानोसा

घेतला होता. त्याचे फळ म्हणजे १९७६ साली 'व्सेस्वित'चा प्रसिद्ध झालेला भारतीय साहित्य विशेषांक : यात श्री. साधूंच्या 'मुंबई दिनांक'चा अनुवाद होता, तसेच श्री. नारायण सुर्वे यांच्या कविताही युक्रेनी भाषेत अवतरल्या होत्या.

'व्सेस्वित' मासिक १९२५ मध्ये स्थापन झालेले. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात प्रकाशन थांबले होते. पुन्हा १९५३ मध्ये ते सुरू झाले. २४० पानांच्या ह्या मासिकाचा अर्धा भाग विदेशी कादंबरीच्या युक्रेनी अनुवादाने व्यापलेला असतो. खास अपवाद वगळता हे अनुवाद संपूर्ण असतात. त्यांना संक्षिप्त करीत नाहीत. स्तेपान नलीवायको नावाचा हिंदी भाषा जाणणारा तरुण पत्रकार बहुतांश भारतीय साहित्यांचे युक्रेनी अनुवाद करतो. कादंबऱ्यांचे अनुवाद क्रमशः प्रसिद्ध होतात आणि एखादा अनुवाद खूप वाचकप्रिय ठरल्यास पुढे तो पुस्तकरूपाने प्रसिद्ध होतो. 'व्सेस्वित'चा खप सुमारे ५० हजार प्रती आहे. 'भारतीय साहित्य विशेषांका'च्या ७५ हजार प्रती निघाल्या होत्या. मासिकाचा उरलेला अर्धा भाग साहित्यिक टीका, युक्रेनचे इतर देशांशी असलेले सांस्कृतिक व मैत्रीचे संबंध वगैरे विषयांना वाहिलेला असतो. लवकरच श्री. रमेश बक्षी यांच्या '२७ डाऊन'चा अनुवाद प्रसिद्ध होणार आहे.

निरोपाची वेळ झाली तरी डॉ. मिकीतेन्को गप्पांमध्ये खूप रंगले होते. त्यांना भेट म्हणून मिळालेल्या मराठी पुस्तकांच्या प्रती त्यांनी मला आवर्जून दाखविल्या. त्यात श्री. विद्याधर गोखले यांच्या चार-पाच नाटकांचा समावेश होता. परदेश वास्तव्यात माणूस जास्त जास्त 'राष्ट्रीय' होतो हे खरे ! कुठे मुंबई— कुठे कीयेव ! त्या दूर अंतरावर परिचयाच्या माणसांची मराठी पुस्तके पाहिली तेव्हा गळ्यात 'कुठेतरी' दाटल्यासारखे झाले. 'व्सेस्वित'ची मराठी बरोबरची भाषिक बांधिलकी पुढे चालावी म्हणून आठ-दहा मराठी लेखकांच्या पुस्तकांची नावे डॉ. मिकीतेन्को यांच्यासमोर बडबडून टाकली. न जाणो, एखाद्या मराठी पुस्तकाच्या युक्रेनीमध्ये लाखभर प्रती निघायच्या आणि त्या अनुषंगाने इतर सोविएत प्रजासत्ताकीय भाषांमधून ! मराठी लेखकांनी ध्यान देण्यासारखे हे क्षेत्र आहे.

दुसऱ्या दिवशीची सकाळ मात्र सुरेख उगवली. स्वच्छ ऊन, आल्हादक हवा. केवळ शर्ट आणि पँट एवढ्या पोषाखावर फिरणे शक्य होते. वर्षाचे दहा महिने, बाहेरील तपमानानुसार वेगवेगळ्या कोटांची खोगिरे अंगावर

चढविणाऱ्यांनाच हा शर्ट-पँटचा आनंद समजू शकतो. कीयेवमधील वासंतिक सकाळची रम्यता अनुभवीत आम्ही 'रानक' नावाच्या युवा-मासिकाच्या कचेरीत पोचलो. 'रानक' म्हणजे 'सकाळ.' हे खास युवकांचे मासिक कीयेवमधून १९५३ पासून प्रकाशित होत आहे आणि ह्या घटकेला त्याचा खप १ लाख ८२ हजार आहे. वय वर्षे १५ ते ३० हा याचा वाचकवर्ग. युक्रेनी युवकांच्या समस्या, त्यांना व्यवसाय मार्गदर्शन, त्यांच्या कौटुंबिक समस्या, त्यांचे काम, वगैरे विषय हे सचित्र मासिक हाताळते. जाता जाता सांगायचे म्हणजे युक्रेनच्या ५ कोटी लोकसंख्येत ६० लाख तरुण-तरुणी, 'कम्सोमोल' ह्या युवक संघटनेच्या सदस्य आहेत. 'कम्सोमोल'मध्ये १६ ते २८ वर्षांपर्यंत राहता येते.

आनंदाची आणि आश्चर्याची बाब म्हणजे 'रानक'चा संपादकवर्ग चक्क 'तरुण' होता. मुख्य संपादक वरावान हे खूप मोकळे आणि प्रांजळ बोलत होते. घटस्फोट ही तरुणांची फार मोठी समस्या झाल्याचे त्यांनी मान्य केले. अपरिपक्व, लवकर वयात आजकाल विवाह होऊ लागले आहेत हे त्याचे मुख्य कारण आहे, असे ते म्हणाले. 'रानक'ची संपादक मंडळी पत्रकार-लेखक होती. त्यांच्या प्रत्येकाच्या खाती किमान दोन-तीन पुस्तके जमा होती. त्यांच्यात गालीना पालामार्चुक ह्या कवयित्रीचाही परिचय घडला. 'जुलैमधील स्ट्रॉबेरी' हा तिचा कविता-संग्रह गाजलाय. 'रानक'च्या संपादकांना भारतीय युवकांसंबंधी खूप उत्सुकता होती. युवकांच्या समस्या, युवकांची मासिके, वर्तमानपत्रे इ. इ. विषयांसंबंधी त्यांनी मला खूप प्रश्न विचारले. भारतीय युवकांविषयीची फार थोडी वास्तव माहिती त्यांना होती. आगामी काळात 'रानक'च्या वाचकांना आजच्या भारतीय युवाजीवनाचे दर्शन घडवू, असे त्यांनी मला भरघोस आश्वासन दिले.

चित्रपट म्हणजे माझे पहिले प्रेम. आयुष्यातील काही काळ पुणे-मुंबई-कोल्हापूर येथील स्टुडिओमधील 'फिल्मी जीवन' अनुभवलेले. आता कॅमेऱ्यापुढून बाजूला होऊन दहा वर्षांचा काळ लोटला, तरी 'अभ्यासू प्रेक्षक' ही भूमिका चालू आहे. आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवांना पत्रकार या नात्याने हजर राहतोच आहे. तेव्हा कीयेवमध्ये जाऊन जर मी 'दोवझेन्को स्टुडिओ' पाहिला नसता तर करंटाच ठरलो असतो ! 'ट्रॅक्टर ड्रायव्हर', 'श्रीमंत सूनबाई', 'इंद्रधनुष्य' असे एके काळी गाजलेले चित्रपट दोवझेन्को स्टुडिओचे.

पैकी 'इन्द्रधनुष्य' (रादुगा) या चित्रपटाला तर १९४५ मध्ये ऑस्कर पारितोषिक मिळालेले.

दोवझेन्को स्टुडिओची प्रमुख इमारत जुनी दिसली. लाल विटांची बांधणी. बाहेरून एखाद्या फॅक्टरीसारखे रूप. आवारात शिरल्यानंतर मुख्य कचेरीपर्यंत जाण्याच्या रस्त्यावर उजव्या अंगाला स्टुडिओने निर्माण केलेल्या पारितोषिक-विजेत्या चित्रपटांची पोस्टर्स उभी होती. चित्रसृष्टीत स्टुडिओने गाजविलेल्या पराक्रमाच्या त्या जणू ध्वजा फडकत होत्या. अगदी स्थापनेपासून ते आजतागायत. छान वाटले पाहायला.

सोविएत चित्रसृष्टी सरकारी मालकीची आहे हे आता काही नव्याने सांगायला नको. तेव्हा चित्रपट व्यवसायाची येथील रचनाही थोडी वेगळी आहे. येथील चित्रपट स्टुडिओचे मुख्य चालकत्व 'डायरेक्टर' या व्यक्तीकडेच असते. हा चित्रपटाचा 'डायरेक्टर' नव्हे ! चित्रपट दिग्दर्शित करतो तो 'रेजिस्सोर' ! पण 'डायरेक्टर'च्या मार्गदर्शनाखाली स्टुडिओचा संपूर्ण कारभार चालतो. दोवेझेन्को स्टुडिओचे डायरेक्टर आल्बर्त पूतीन्त्सेव यांच्याशी माझी भेट झाली आणि जवळजवळ तासभर त्यांनी दोवझेन्को स्टुडिओविषयी रंजक माहिती सांगितली.

गंमत म्हणजे दोवझेन्को स्टुडिओचे पूर्वी नाव होते 'किनो फाब्रिका गीगान्त !' म्हणजे 'जायंट फिल्म फॅक्टरी !' १९२८ साली तिची स्थापना झाली. त्याआधी याल्टा, अदेस्सा, कीयेव येथे खाजगी मालकीचे छोटे छोटे स्टुडिओ होते. ४ मार्च १९२८ ला ह्या फॅक्टरीतून पहिला चित्रपट निर्माण झाला. तेव्हापासून आतापर्यंत ५५० चित्रपट आणि ६०० टी. व्ही. सिरियल येथून बाहेर पडल्या आहेत. ख्यातनाम युक्रेनी चित्रपट दिग्दर्शक दोवझेन्को यांच्या स्मृत्यर्थ पुढे हा स्टुडिओ त्यांच्या नावाने संबोधला जाऊ लागला. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात स्टुडिओ अश्खाबादला हलविण्यात आला होता. जर्मनांनी कीयेव व्यापल्यानंतर स्टुडिओची सामग्री त्यांनी जर्मनीत लुटून नेली व स्टुडिओची घोडशाळा बनविली. पुढे १९५४ मध्ये दोवझेन्को स्टुडिओ परत पूर्वीच्या जागी आला. आपली अश्खाबाद येथील सामग्री त्याने अश्खाबाद स्टुडिओला भेट दिली.

सध्या दोवझेन्को स्टुडिओ वर्षाला १२ चित्रपट आणि टी. व्ही. साठी १६

चित्रपट बनवितो. त्याशिवाय ४-५ लघुपट, चित्रपट शिक्षण संस्थेचे स्नातक तयार करतात. विशेष म्हणजे हे सर्व चित्रपट युक्रेनी भाषेत बनतात. सोविएत संघात प्रत्येक प्रजासत्ताकाचा स्वतःचा स्टुडिओ आहे आणि प्रत्येक प्रजासत्ताकाची स्वतःची भाषा ही तेथील मुख्य भाषा मानली जाते व रशियन भाषा ही दुय्यम. जर केंद्रीय चित्रपट समितीने सार्वत्रिक वितरणासाठी एखादा प्रजासत्ताकीय चित्रपट घेतला तर तो रशियन भाषेत 'डब' करण्यात येतो. 'डबिंग'ची कला येथे उत्तम अवगत आहे. गाजलेले विदेशी चित्रपट 'डब' करायला पहिल्या प्रतीच्या नट-नटींना पाचारण करण्यात येते व चित्रपटाच्या श्रेय-नामावलीत यांची नावे झळकतात. मॉस्को, लेनिनग्राद येथील स्टुडिओप्रमाणे दोवझेन्को स्टुडिओही चित्रपट-निर्मितीशिवाय 'डबिंग'चे काम करतो. वर्षाला सुमारे ४० चित्रपट येथे 'डब' होतात. मी स्टुडिओत होतो त्या वेळी 'राजा जानी' ह्या हिंदी चित्रपटाचे रशियनमध्ये 'डबिंग' चालू होते.

डायरेक्टर आल्बर्त पूतीन्त्सेव म्हणाले की, दोवझेन्को स्टुडिओ तीन मुख्य विषयांवर चित्रपट निर्माण करतो. एक— ऑक्टोबर क्रांतिविषयक, ऐतिहासिक. दोन— दुसऱ्या महायुद्धावरील विषयांवर. या क्षेत्रात स्टुडिओचे प्रावीण्य आहे. आणि तीन— आजच्या जीवनाच्या प्रश्नांवर. ह्या आधुनिक विषयांवरील चित्रपटांच्या निर्मितीत दोवझेन्को स्टुडिओला यश लाभलेले नाही, असे पूतीन्त्सेव यांनी प्रांजलपणे कबूल केले. स्टुडिओत सध्या २१०० कर्मचारी कामावर आहेत. १२० नट-नटी पटावर आहेत. गेल्या पाच वर्षांत स्टुडिओने ३० तरुण दिग्दर्शकांना पुढे आणलेय. स्टुडिओत चित्रीकरणासाठी चार दालने आहेत. त्यांतील सर्वांत मोठे दालन ३३०० चौ. मी. आहे. युरोपात हे सर्वांत मोठे चित्रीकरण-दालन मानले जाते. कर्मचाऱ्यांच्या मुलांसाठी सुंदर बालवाडी आहे. सुट्टीत आराम करण्यासाठी उत्तम विश्रामधामे आहेत. खास रोगचिकित्सालय आहे. स्टुडिओला होणारा नफा स्टुडिओच्या कर्मचाऱ्यांच्या कल्याणासाठी खर्च होतो. स्टुडिओच्या पुनरुज्जीवनासाठी सोविएत सरकारने नुकतीच एक कोटी रूबलची रक्कम मंजूर केलीय. कीयेवजवळ २०० हेक्टर जमिनीवर 'खुला स्टुडिओ' उभा होतोय. निसर्गचित्रणासाठी आता दूर जावे लागणार नाही. इतर सोविएत प्रजासत्ताकांबरोबर आणि परदेशांबरोबर दोवझेन्को स्टुडिओच्या सह-निर्मिती चालू आहेत. कीयेवच्या १५०० व्या

वर्षानिमित्त, १९८२ साली, दोवझेन्को स्टुडिओ एक भव्य, ऐतिहासिक, महत्त्वाकांक्षी चित्रपट निर्माण करीत आहे. कीयेवच्या इतिहासातील 'शहाणा यारोस्लाव' ह्याच्या जीवनावर. ह्या चित्रपटाच्या निर्मितीसाठी सुमारे ३० लाख रूबलचा खर्च होईल.

कला आणि व्यवसाय यांची येथे उत्तम सांगड घातल्याचे मला जाणवले. प्रत्येक गोष्ट योजनाबद्ध घडते. अस्थिरतेचा लवलेश दिसला नाही. नंतर काही तरुण युक्रेनी नट-नटी स्टुडिओच्या आवारात भेटले. त्यांच्याशी गप्पा मारल्या. बहुतेक कलाकार रंगभूमी आणि सिनेमा अशा दोन्ही ठिकाणी काम करतात. त्यांना अस्थिर भविष्याची भीती नाही. प्रत्येकाला पेन्शन ही म्हातारपणी मिळणारच. कलाक्षेत्रात नवनवीन पराक्रम करून दाखविण्यासाठी या कलाकारांना खूप वाव आहे. अर्थात त्यातील स्पर्धेला तोंड द्यावे लागणारच !

ठरलेल्या वेळेपेक्षा उशिरा जाण्यात आपण भारतीय मंडळी प्रसिद्ध आहोत. माझ्या नेहमीच्या सवयीत मी 'परदेशी' आहे. पण कीयेवमधील इवान फ्रँको थिएटरच्या 'रेजिस्सोर'ना त्यांच्या नटनट्यांना भेटताना चुकून मी भारतीय परंपरा पाळली. त्याला कारण पाऊस आणि थिएटरच्या इमारतीत प्रवेश देणाऱ्या व्यक्तीचा घोटाळा !

थिएटरच्या दुसऱ्या मजल्यावरील खोलीत ऐन दुपारी तीन वाजता पोचलो तेव्हा रेजिस्सोर व्लादीमिर अग्लोबिन, दोन तिशीतल्या अभिनेत्री, एक तिशीतील अभिनेता व विशीतील अभिनेते— जोडपे एवढी, मंडळी ह्या 'भारतीय पाहुण्या'ची वाट पाहत होती. मी उशिरा पोचल्याबद्दल दिलगिरी वगैरे व्यक्त करीत होतो, तेवढ्यात रेजिस्सोरनी बैठकीचा ताबा घेतला आणि आमची बैठक संपेपर्यंत तो सोडला नाही. ज्यांना नाट्याची हौस वगैरे आहे आणि मिसरूड फुटायच्या वयात माझ्याप्रमाणे जे 'डावा पाय पुढे, उजवा पाय मागे' अशा संथा घोटीत नाट्यशिक्षणातून गेले आहेत, त्यांच्या डोळ्यांसमोर 'रेजिस्सोर' म्हणताच जे व्यक्तिमत्त्व उभे राहील ते अग्लोविन यांना तंतोतंत लागू होते. माणूस खूप अनुभवी. युक्रेनी आणि रशियन रंगभूमीवर बराच काळ नट म्हणून वावरलेला. नव्या नटांच्या दोन-तीन पिढ्या तयार केलेला आणि या घटकेलाही नवे रक्त 'मुरब्बी' बनवायला बसलेला. त्याने आपल्या चेल्यांची जुजबी ओळख करून दिली, पण संभाषणाचे सूत्र सतत आपल्या हाती धरले.

अर्थात तसा त्याचा अधिकार होता.

ठरीव प्रश्नोत्तरांमधून समजले की, इवान फ्रँको नाटक मंडळीला साठ वर्षे पूर्ण झाली आहेत. युक्रेनी रंगभूमीवरील ८० टक्के नट-नटी ह्या मंडळींच्या रंगमंचावर अभिनयाचे पहिले धडे गिरवून गेलेली आहेत. नाट्यव्यवसायातील सर्व चढ-उतार ह्या मंडळीने पाहिले. ह्या घटकेला, वयोमानानुसार तीन पिढ्यांचे ८० नट-नटी कंपनीच्या पटावर आहेत. वाद्यवृंद वगैरे वेगळाच. एकेकाळी टेलिव्हिजनच्या स्पर्धेमुळे नाटकावर परिणाम झाला होता. आता मात्र युक्रेनी रंगभूमीला परत वैभव आले आहे. सांस्कृतिक खात्याचा मंत्री नाट्यप्रेमी आहे. त्याचाही हितकर परिणाम घडलाय. युक्रेनमध्ये सध्या नवनव्या नाटकमंडळ्यांचे पेव फुटलेय. रेजिस्सोर अग्लोबिन यांचे वैशिष्ट्य म्हणजे बोलताना सारा वेळ ते छताकडे नजर लावून बोलत होते. हळूहळू संभाषणाचा ओघ मॉस्कोतील नाटकांवर वळला आणि मरीनाशी गप्पा मारण्यात त्यांची तार जुळली. तेव्हा मी बाकीच्या मंडळींशी परिचय करून घेतला.

अभिनेत्री लारीस्सा होरोवेत्स ही नाटककारही होती. अभिनयाची मर्यादा अपुरी वाटल्यामुळे आपण नाट्यलेखनाकडे वळलो असे ती म्हणाली. 'माझं वय ३०' आणि 'भोंगा' ही तिची दोन नाटकं रंगभूमीवर आली आहेत. त्यांचे अनुवाद होऊन बल्गेरियातही ती यशस्वी झाली आहेत. पण जेथे ती काम करते, त्या फ्रँको नाटक मंडळीने मात्र अद्याप तिचे नाटक रंगभूमीवर आणलेले नाही. अभिनेता अलेक्सांद्र बुईस्रूकिन दहा वर्षे तोंडाला रंग फासतोय. ह्या नटाने यश-अपयश दोन्ही पाहिलेले जाणवले. पण चित्रसृष्टीत त्याचे अजिबात जमलेले नाही. साशा आणि इरिना हे नवविवाहित जोडपे अवघे दीड-दोन वर्षे नाटकात काम करीत आहे. इरिना लाजून बसलेली होती तर साशाला सक्तीच्या लष्करी सेवेचे बोलावणे आल्यामुळे किमान दोन वर्षे रंगभूमीला रामराम ठोकावा लागणार होता. राहता राहिली नताशा पर्चवस्काया. तिला मी आदल्या संध्याकाळी 'द्याद्या वान्या' (वान्या काका) ह्या चेखोवच्या गाजलेल्या नाटकात पाहिले होते. फ्रँको मंडळीने चेखोवचे हे नाटक युक्रेनी भाषेत सादर केले होते. नेपथ्य, प्रकाशयोजना, अभिनय ह्या बाबी येथील गाजलेल्या नाटकमंडळ्यांमध्ये चोख असतात. मूळ नाटक माहीत असल्याने, युक्रेनी भाषेचे ज्ञान नसूनही मी प्रयोग पाहण्यात रमलो होतो. ह्याच फ्रॅन्को नाट्य मंदिरात

एस्तोनियाच्या 'वानेमुईने' नाटकमंडळीचा 'परसदारी' हा देखणा नाट्यप्रयोग पाहिला. कर्णयंत्रांमधून रशियन भाषेत संवादांचा अनुवाद ऐकायची व्यवस्था असल्यामुळे प्रयोगात पूर्ण रस घेऊ शकलो. फिरत्या रंगमंचावरील दुमजली घराचे, पाच-सहा बिऱ्हाडांचे जीवन दाखवणारे नेपथ्य अचाट होते. तीस-चाळीस कलावंत एकसंधपणे किती सुरेख अभिनय करतात त्याचे 'परसदारी'मध्ये दर्शन घडते.

कीयेवमधील साहित्यिक, चित्रपट आणि नाट्यक्षेत्रामधील लोकांच्या भेटीबरोबरच कीयेव नगर सोविएतचे प्रथम उपाध्यक्ष लावरूखिन यांचीही भेट झाली. ह्या भेटीच्या वेळी समोरच्या टेबलावर भारत, युक्रेन आणि सोविएत संघ यांचे राष्ट्रध्वज फडकत होते. लावरूखिन यांनी कीयेव शहराची त्रोटक माहिती दिली. भारतीय पाहुणे कीयेवला क्वचित येतात असा निर्देश केला. त्यांच्याबरोबर कीयेव ऑलिंपिक पूर्वतयारी समितीचे प्रमुख बेलाऊस बसले होते. त्यांनी कीयेवमधील ऑलिंपिकच्या पूर्वतयारीची माहिती सांगितली.

साठी ओलांडलेले बेलारूस, सेंट्रल स्टेडियम दाखविण्यासाठी जातीने माझ्याबरोबर आले होते. ऑलिंपिकचे प्राथमिक फूटबॉल सामने ह्या स्टेडियमवर झाले. त्याच्या लगत नव्याने बांधलेल्या 'होटेल रूस'चे वैशिष्ट्य म्हणजे खोलीत बसल्याबसल्या स्टेडियमवरील सामना पाहण्याची सोय. ह्या स्टेडियमचा एक इतिहास आहे. २२ जून १९४१ रोजी ह्या स्टेडियमचे उद्‌घाटन व्हायचे होते व त्यानिमित्त तेथे होणाऱ्या फूटबॉल सामन्याची १ लाख ४० हजार तिकिटे विकली गेली होती. पण त्याच दिवशी सकाळी फॅसिस्ट जर्मनीने सोविएत संघावर आक्रमण केले. कीयेववर पहिल्याच दिवसापासून हिटलरी फौजांचा मारा होता. स्मृती म्हणून लोकांनी त्या न झालेल्या सामन्याची तिकिटे जपून ठेवली. युद्धानंतर आढळले की, सुमारे ४० हजार तिकिटे लोकांपाशी सुरक्षित राहिली होती. युद्धानंतर जेव्हा कीयेवच्या सेंट्रल स्टेडियमवर पहिले फूटबॉल सामने झाले, तेव्हा ह्या तिकीटवाल्यांना मोफत प्रवेश देण्यात आला.

फूटबॉलचा आणखी एक मृत्यू-सामना कीयेवच्या इतिहासात नमूद आहे. जर्मनांनी कीयेव काबीज केल्यानंतर कीयेव दीनामो फूटबॉल संघाचे काही खेळाडू त्यांच्या हाती सापडले. जर्मनांनी त्यांना सक्तीने सामना खेळण्यास भाग पाडले. जर्मनांना त्यांनी हरविले तर मृत्युदंडाची शिक्षा मिळेल अशी त्यांना

आधीच ताकीद देण्यात आली होती. तरीही त्यांनी जर्मनांना हरविले व मृत्यूला स्वीकारले. ह्या सामन्याच्या मैदानावरील स्मारकाची डागडुजी चालू असल्याने त्या स्थळाला भेट देता आली नाही.

कीयेवमधील मुक्कामाच्या अखेरच्या दिवशी शहरातील प्रेक्षणीय स्थळांना धावती भेट दिली. सोबतीला 'वसेस्वित'च्या आफ्रो-आशियाई विभागाचे तेरेख होते, त्यामुळे कीयेवची वेगवेगळी प्रार्थना मंदिरे सजग झाली. त्यांच्या भित्तिचित्रांनी आपापल्या कहाण्या सांगितल्या. त्यांचे ऑर्गन संगीत अंतःकरणाला समजले. रसिक, जाणकार तेरेख यांच्या संगतीत कीयेवची प्रेक्षणीय स्थळयात्रा संस्मरणीय झाली.

आम्ही 'बाबीयार'ला गेलो. जर्मनांनी इथे अफाट हत्याकांड केले. दुसऱ्या महायुद्धात कीयेव शहर ७७८ दिवस जर्मनांच्या ताब्यात होते. युद्धाच्या पहिल्या दिवशी कीयेवमध्ये ८ लाख ४२ हजार नागरिक होते. युद्ध संपले त्या वेळी अवघे १ लाख ५० हजार लोक कीयेवमध्ये जिवंत होते. २ लाखांपेक्षा अधिक कीयेववासींना जर्मनांनी हालहाल करून ठार मारले तो कटु, अप्रिय इतिहास 'बाबीयार'चे स्मारक पाहताना पुन्हा एकदा डोळ्यांसमोर आला. स्वतः तेरेख युद्धावेळी आठ-दहा वर्षांचे होते. जर्मन कब्जात त्यांनी काही काळ काढलेला आहे. सोविएत माणसाने किती विलक्षण हलाहल पचविले आहे त्याची प्रचीती अशा माणसांच्या भेटी झाल्या म्हणजे येते. अगदी परत निघता निघता कीयेवच्या प्रसिद्ध गुंफा पाहिल्या. 'कीयेवस्काया लावरा' म्हणून त्या ओळखल्या जातात. ११ व्या शतकात कीयेव-रूसमधील संन्यासी आपल्या भारतीय योग्यांप्रमाणे ह्या गुंफांमधून 'आत्मसमाधी' घेऊन देहत्याग करीत. त्यांचे अवशेष ह्या गुंफांमधून जतन करून ठेवलेले आहेत. चार दिवस कीयेवमध्ये खूप बागडल्यानंतर अखेरच्या दिवशी 'बाबीयार' आणि 'लावरा' यांनी मला परत 'चिंतन'पर मनःस्थितीत आणून सोडले. जगात कुठेही जा, आपला पिंड विरक्तीचा."

बरोबर दहा वर्षांपूर्वी लिहिलेला हा लेख वाचून मला जाणवले, माझ्या लेखनशैलीत फरक पडलेला नाही. अर्थात प्रस्तुत लेखातील आकडेवारी व नामनिर्देश तत्कालीन आहेत.

आणखी एक आठवण या सफरीची. अगदी आरंभी 'ग्लीपर' हॉटेलात आपापल्या खोल्यांमध्ये बस्तान बसविल्यानंतर मरीनाचा आणि माझा अफगाणिस्तान या विषयावर कडाक्याचा वाद झाला. त्यापूर्वी पाच-सहा महिने रशियन सैन्य अफगाणिस्तानमध्ये घुसले होते. कधी राजकारणावर न बोलणारा मी नेमका त्याच दिवशी बोललो. रशियाने अफगाणिस्तानवर आक्रमण केले होते आणि 'अमेरिकेची विएतनाममध्ये जशी अवस्था बनली तशीच रशियाची अफगाणिस्तानमध्ये दैना होईल' असे मी म्हणालो. साहजिकच मरीनाला ह्या विधानाचा राग आला. माझी ती भविष्यवाणी आज आश्चर्यकारक रीतीने खरी ठरली. कधी कधी माझ्या आतील आवाज जे बोलतो, तेच काही काळानंतर प्रत्यक्ष घडते. अनुभवांती हे विधान करतो. तसा मी द्रष्टा नव्हे.

*

# तमारासह भारतात

ज्यासाठी लग्नाचा अट्टाहास केला त्या गोष्टीचा पाठपुरावा करायला आरंभ केला. कारण तमाराला रशियाबाहेर भारतात नेणे महाकठीण होते. शेकडो अर्ज, विनंत्या, भरपूर खर्च घडणार होते. खुद्द लग्नाच्या बायकोला रीतसर निमंत्रणपत्र लिहायचे. त्यावर भारतीय दूतावासातील प्रथम सचिवाची सही घ्यायची. सोविएत सरकारच्या उत्तराची वाट चार महिने पाहायची. मग सोविएत सरकारला तिच्या व्हिसाचे दोनशे रूबल द्यायचे. नंतर विमान तिकिटांचे पैसे भरायचे. एवढे सव्यापसव्य होते. सुदैवाने भारतीय दूतावास एका दिवसात मोफत व्हिसा द्यायचा.

प्रत्यक्ष परवानगी ऑक्टोबर महिन्यात आली. जानेवारीत प्रवासाला प्रस्थान ठेवायचे ठरले. रशियन हिवाळा टाळायचा. जेव्हा जायचे पक्के ठरले तेव्हा तमाराची आई घाबरल्या चेहऱ्याने एके दिवशी मला भेटायला आली. तमाराचे कुटुंब थोडके होते. तिची आई वयाच्या पस्तिसाव्या वर्षी युद्धकाळात विधवा बनली. तमाराचे वडील दुसऱ्या महायुद्धाच्या आरंभीच मॉस्कोनजीक धारातीर्थी पडले होते. तमाराचा मोठा भाऊ मॉस्कोत होता. त्याची बायको व दोन मुली यांच्याशी आमचे संबंध जुजबी होते.

तमाराच्या पेन्शनर आईला तिच्या शेजारणींनी घाबरवले होते की, "पहा, तो परदेशी माणूस तुझ्या मुलीला विकून टाकील. मुलीला परदेशात पाठवू नको !"

पूर्वी काही अरबांनी आपल्या रशियन बायकांना विकले होते म्हणे ! माझा त्यावर विश्वास बसला नाही. कारण रशियन बायकांचा स्वभाव भलता

खमक्या ! उलट त्याच नवऱ्याला विकून टाकतील ! मला हसू आले. गंभीरपणे सासूची समजूत घातली.

योगायोग असा की, आमच्याच विमानाने घाटणेकर दांपत्य रशिया कायमचा सोडून दिल्लीला जाणार होते. नेमक्या त्या काळात राजदूत श्री. इंद्रकुमार गुजराल यांची रशियातील मुदत संपली होती. पर्यायाने बाळासाहेबांचा मुक्काम हलला. असे मजेदार योगायोग आयुष्यात येतात.

हा योगायोग जमवायला माझा दम निघाला होता. तमाराचे 'एअर इंडिया'चे तिकीट काढण्यात फार त्रास झाला. 'एअरोफ्लोत'ने आक्षेप घेतला. ती अद्याप सोविएत नागरिक होती. सोविएत नागरिकांनी परदेशी विमान कंपन्यांची तिकिटे खरेदी करायची नाही असा म्हणे अलिखित कायदा. मी युक्तिवाद केला. मी तिचा भारतीय नवरा आहे. तिचे तिकीट मी माझ्या पैशाने विकत घेणार. म्हणून मी 'एअर इंडिया'नेच तिला नेणार ! रशियन लोकांना जरा ठासून, ओरडून सांगितले तरच समजते. आपसूक वळणावर येतात. हे कामगारांचे राज्य महारांगडे होते. मैत्री वगैरे बासनात गुंडाळून ठेवतात. व्यासपीठावर भाषणांमध्ये मैत्री बोलण्यापुरतीच असते. प्रत्यक्षात दर पावली अडवणूक होते. आमच्यासारखे नोकरदार नोकरी टिकावी म्हणून काही वेळा गप्प बसायचे. हे गप्प बसणे मला पटत नव्हते. व्यापारानिमित्त येणाऱ्या व्यापारी मंडळींची अशीच पावलोपावली अडवणूक होते. रशियाशी व्यापार करताना प्रचंड नफा मिळतो म्हणून तेही गप्प बसतात. विद्यार्थ्यांबाबत काही बोलायला नको. तथाकथित फुकट शिक्षण. रूबल, रुपये, डॉलर या चलनांचा सर्रास काळाबाजार चालतो. दारू, सेक्स, मुबलक उपलब्ध. अभ्यास कोण करतो ? रशियात शैक्षणिक पदव्यांची खैरात व्हायची. राजनैतिक संबंधांवर ही बाब प्रामुख्याने अवलंबून होती. वस्तुतः जुईला मी मॉस्कोला बोलावू शकलो असतो आणि तिचे शिक्षण फुकट झाले असते. मी ही गोष्ट कटाक्षाने टाळली. आपल्या मुलांना शिक्षणासाठी रशियाला घाईने पाठविणाऱ्या भारतीय पालकांची कीव वाटायची. एके काळी भारतीय मेडिकल कौन्सिल रशियन पदवीला मान्यता देत नव्हते. योग्य निर्णय होता. पण कालांतराने कुठेतरी चाव्या फिरल्या. आपण पदवीला मान्यता दिली. काही अपवादभूत विद्यार्थी हुशार असतात. पण एकूण शिक्षणाचा दर्जा भिकार आहे. विद्यार्थी जगताचे काही ओझरते दृश्य दिसले ते

अत्यंत वाईट होते.

५ जानेवारी १९८१ रोजी 'एअर इंडिया'च्या ७०७ बोईंग विमानात तमाराने पहिल्यांदा पाऊल टाकले. प्रशस्त आसने, नयनरम्य सजावट, मंद वाद्यसंगीत इत्यादी गोष्टी पाहून ती एकदम खूष झाली. 'एअरोफ्लोत' च्या विमानात प्रचंड गोंगाट, खेचाखेच, आरडाओरडा चालतो. अगदी आपली एस. टी. बस वाटते.

मामाचा फ्लॅट घाटकोपरच्या हाऊसिंग बोर्डाच्या इमारतीत होता. म्हणजे एकूण आनंद होता. समोर दर मिनिटाला धडधडत जाणाऱ्या लोकल गाड्या. विमानतळावरून झेपावणाऱ्या आणि विमानतळावर उतरणाऱ्या विमानांचे प्रचंड आवाज. ह्या गजबजाटाने डोके भणाणून जायचे. त्यातच मुंबईचा उकाडा. घराची स्वच्छ गच्ची हेच संध्याकाळी विसाव्याचे ठिकाण.

या वेळी घरात आई म्हणजे आजी नव्हती. १६ जून १९८० रोजी ती झोपेतच वारली म्हणे. तिच्या मृत्यूची वार्ता देणारे मामाचे पत्र नंतर मिळाले होते. वर्षा-दोन वर्षांपूर्वी तिचा निरोप घेताना मी तिला सांगितले होते की, लौकरच मी लग्न करीन. माझ्या लग्नानंतर अल्पावधीत ती या जगात नव्हती. तिचे नेमके वय काय होते याची कल्पना नाही. घरातील एक शांत-समाधानी चेहरा नाहीसा झाला होता.

काही दिवस पपांकडे राहिलो. मग टॅक्सीमधून मुंबईदर्शन, खरेदी वगैरे. साठेसाहेबांनी तात्काळ जेवायला घरी बोलाविले. मॉस्कोतील पाहुणचाराची उत्तम परतफेड करणाऱ्या मराठी माणसांपैकी साठेसाहेब प्रथमपासून अग्रगण्य होते. प्रत्येक भारत सफरीत मी त्यांच्याकडे जायचो. बासू बी, आणि बासू सी, गुलझार यांनीही ताबडतोब घरी भोजनांना बोलाविले. बासू चतर्जींचे मित्र रंजन बोस यांनीही स्वतःच्या घरी आवर्जून बोलाविले. हिंदी चित्रसृष्टीतील ही मोठी माणसे कमालीची प्रेमळ, आतिथ्यशील ठरली.

मुंबईहून पुण्यात आलो. डेक्कन जिमखान्यावरच्या पूनम हॉटेलात उतरलो. तेथे जॉन, श्याम धाडगे वगैरे जुनी मित्रमंडळी भेटली. अर्थात शिंद्यांना भेटलो. तमाराचे साधे वागणे पाहून शिंद्यांनी दुपारचे जेवण गच्चीत आयोजित केले. त्या वेळी त्यांचे जुने स्नेही श्री. बाबूराव नाईक आले होते. श्री. बाबूराव आणि सौ. शांताबाई हे दांपत्य शिंद्यांमुळे माझ्या परिचयाचे झाले होते. माझ्या धडपडीच्या

दिवसांत बाबूराव प्रेमाने घरी बोलवायचे. गच्चीवर तंबू उभारणाऱ्या ह्या रसिक माणसाने एकदा छानपैकी स्कॉच व्हिस्की पाजली होती. स्कॉच व्हिस्की आयुष्यात प्रथम घेतली ती त्यांच्या घरी. बाबूराव, शिंदे, तमारा आणि मी यांची छान मैफल जमली. तमारा तुटक मराठी शब्द बोलायची. योग्य वेळी नेमका शब्द वापरायची. तिने मला काही रशियन वाईट शब्द शिकविले. म्हणजे मला उद्देशून जर कुणी कधी त्यांचा वापर केला तर मला समजावे म्हणून. त्याचप्रमाणे मी तिला मराठी अपशब्द शिकवले. घाटकोपरच्या रेल्वे ओव्हरब्रिजवरून ती जात होती तेव्हा कुणीतरी तिच्या पृष्ठभागाला चिमटा काढला. ती पटकन त्या माणसावर ओरडली, "मुस्काट फोडीन !" तो माणूस एकदम पसार झाला.

तसेच रशियन लोकांना केळ्यांचे फार अप्रूप. 'पूनम'च्या खाली केळीविक्रेता उभा होता. तमारा तरातरा एकटीच गेली. तिने केळ्यांचा भाव विचारला. केळीवाल्याने गोरी बाई पाहून भलतीच किंमत सांगितली. त्यावर ती उद्गारली, "अरे वा !" हे ऐकताक्षणी विक्रेत्याने भाव एकदम कमी केला.

शिंद्यांच्या गच्चीवर एक संध्याकाळ रंगली. सतीश-मधुरा आले होते. तात्या खानोलकर हजर होते. शिवाय डॉ. अशोक व डॉ. सुलभा देशपांडे हे जोडपे आले होते. त्यांची ओळख सुधीर मोघेमुळे पूर्वी घडली होती. या जोडप्याने काही वर्षे झांबियात लुसाका येथे वास्तव्य केले होते. नंतर लंडनमध्ये ते स्थायिक झाले.

तमारासारखे मॉडेल दिसल्यानंतर शिंदे आणि तात्या खानोलकर यांनी आपापले कॅमेरे सरसावले. 'पूनम' मधील आमच्या खोलीत एक फोटोसेशन जमले. तमाराच्या जोडीला मधुरा होती. रंगीत फोटोत चक्क पौर्णिमा आणि अमावस्या दिसल्या.

अर्थात सतीश-मधुराच्या घरी फेरी झाली.

इकडे आमचे मित्रवर्य एम. पी. राव यांनी 'थरमॅक्स'मार्फत अजिंठा आणि वेरूळची टूरिस्ट टॅक्सीने सहल आयोजित केली. या अत्यंत सुखदायी सहलीने तमाराला आणि मला खूप आनंद झाला. औरंगाबादनजीक रस्त्यावर माकडे दिसल्यानंतर टॅक्सीतून उतरून तमारा त्यांना बोलावू लागली. मी तिला कसेबसे आवरले.

अजिंठा-वेरूळहून पुण्याला परतलो. मग टॅक्सीने परत मुंबई. या वेळी

भिन्न संस्कृती, भिन्न भाषा यांच्यामुळे बरीच कसरत झाली. तमाराला उन्हाचे फार वेड. स्विमिंग ड्रेस घालून ती गच्चीवर ऊन खायला गेली. भोवतालची मध्यमवर्गीय मंडळी पटापटा डोकावू लागली. ते पाहून जुई मला सांगायला आली. स्त्रीचे अर्ध अनावृत शरीर पाहणे म्हणजे इथे भयंकर ! कसेबसे तमाराला समजावले. ती माझ्यावर चिडली.

मग मी तिला गोव्याला नेले. इंडियन एअरलाईन्सच्या एअरबसच्या प्रवासाने ती सुखावली. गोव्यात एका पत्रकार मित्रामार्फत कलंगुट बीचवरच्या सरकारी हॉटेलात खोल्या आरक्षित केलेल्या होत्या. ही अप्रत्यक्ष मदत श्री. दत्ता सराफांची होती. त्यांनी त्या पत्रकाराचे नाव कळविले होते. तेव्हा मी त्या माणसाशी पत्राने संपर्क साधला. सारांश, रशियन बायकोला काही दिवसांसाठी भारतात आणायचे म्हणजे कित्येक महिने आधी पूर्वतयारी केली पाहिजे.

गोव्याचा समुद्रकिनारा अद्याप स्वच्छ होता. हिप्पी तुरळक होते.

सकाळ-संध्याकाळ समुद्रकिनाऱ्यावर मी रपेट मारायचो. तमारा दिवसभर वाळूत झोपून ऊन खात 'टॅन' व्हायची. हे 'टॅन' होणे तापदायक होते. पाठीची साले निघायची. दोन दिवसांचे दुखणे व्हायचे. प्रत्येकाचे आपापले नाद असतात.

मोडकं कोकणी बोलून एक टॅक्सीवाला पटवला. दोन-तीन दिवस त्याच्या टॅक्सीतून तमाराला नवे-जुने गोवा दाखविले. सर्व मंदिरे व चर्चेस दाखविली. झांट्यांचा काजूचा कारखाना दाखवला. त्या भ्रमंतीत पणजीमध्ये दोना पावला येथे एक सुंदर हॉटेल दिसले. प्रशस्त, स्वच्छ खोल्या होत्या. खिडकीशी समुद्राच्या लाटा आपटत यायच्या. समोरच्या किनाऱ्यावर वास्कोचे बंदर दिसायचे. अशा रम्य ठिकाणी चार दिवसांचा मुक्काम करण्याचे ठरविले. कलंगुटचे सरकारी हॉटेल फारच स्वस्त होते. पण अस्वच्छ होते. म्हणून दोना पावलाला जेव्हा राहायला आलो, तेव्हा माणसात आल्यासारखे वाटले. अशीच भावना मला औरंगाबादच्या स्टेट हॉटेलात जाणवली. महाग, सुंदर, स्वच्छ स्थळे मला फारच आवडतात. स्वस्त गोष्टींच्या मागे जाणे मला पसंत नाही. तेथे दुसऱ्या दृष्टीने जास्त किंमत द्यावी लागते. जेथे मनाला आनंद मिळतो तेथे शक्यतो राहावे. हौसेने प्रवासाला निघतो तेव्हा पैसा खर्च करायला निघतो ना ? मग दर पावलाला काटकसरीचा विचार करू नये. त्यापेक्षा प्रवास करूच नये !

दोना पावला येथे राहत असताना तमाराचा वाढदिवस आला. तेथेच

असलेल्या उत्तम रेस्तराँमध्ये 'थंड वाईनची बाटली' बुक केली. तिथला वेटर वेगळ्याच प्रकारचा तरुण होता. मूळचा तो गोव्याचा. पण मोझाम्बिकमध्ये स्थायिक होता. तेथे रशियनांचे अरेरावी वर्तन कसे चालते याची माहिती त्याच्याकडून समजली.

संध्याकाळी वाईनचा टोस्ट प्यायल्यानंतर तमाराने रशियन पद्धतीप्रमाणे मागे न पाहता काचेचा चषक पाठीमागच्या बाजूला फेकला. चषकाचा खळ्ळकन आवाज झाला. अर्थात याबाबत मी वेटरला पूर्वसूचना दिली होती. त्याने अनुमती दिली. पण भोवतालचे लोक बिचकले. तमाराचा चेहरा लालबुंद दिसत होता. तिने सोनेरी केस मोकळे सोडले होते. भोवतालचे लोक समजूतदार होते.

त्या दिवशी एक सुंदर आठवण मनात सामावली.

सुंदर मुक्काम संपत आला. परतीचे वेध लागले. विमानाची किंवा बोटीची तिकिटे मिळेनात. पत्रकार मित्रामार्फत बोटीच्या फर्स्ट क्लासच्या केबिनची तिकिटे कशीबशी मिळाली. गोव्यात ही कटकट कायमची. बोटीवर सहप्रवासी छान भेटले. जर्मनीत स्थायिक झालेला गोवेकर, गोव्याचा एक तरुण डॉक्टर आणि त्याची तरुण पत्नी. दारू पिण्यात आणि गप्पा मारण्यात प्रवास संपला.

या वेळी मुंबईत वरळीच्या पूनम इंटरनॅशनल हॉटेलात आमच्या राहण्याची सोय झालेली होती. रशियाला पेट्रोल पंप विकणाऱ्या मिडको कंपनीने ही व्यवस्था केलेली होती. मिडकोचे श्री. आर. एम. शाह यांची ओळख पूर्वी श्री. गडकरी यांनी करून दिलेली होती. पुढे प्रत्येक रशिया भेटीत श्री. शाह यांचा माझ्या घरी फोन यायचा. कधी आमच्या गाठीभेटी होत. नंतर त्यांची सुरेख पत्नी जागृती परिचयाची झाली. सिनेतारका टीना मुनीम जागृतीची सर्वांत धाकटी बहीण. शहा दांपत्य पूर्वी केनियात स्थायिक होते. तमाराच्या पहिल्या भारत सफरीनिमित्त हॉटेलातील आठवडाभराच्या आमच्या वास्तव्याचा खर्च त्यांनी सोसला. व्यापारी वर्गातील माणसांबरोबर वावरण्याची कला मॉस्कोतील वास्तव्यात मी अवगत केली. श्री. शहा सौनाबाथचे खास षौकिन. सौना भरपूर कसा घ्यावा, मसाज कसा करून घ्यावा या गोष्टी मी त्यांच्यापासून शिकलो. मॉस्कोत अनेक वेळा मी त्यांच्याबरोबर वावरत होतो. त्यामुळे मी त्यांच्या व्यापाराचे कामकाज पाहत असावा अशी अनेकांची गैरसमजूत बनली. ह्या

गैरसमजुतीपायी एका मोठ्या कंपनीच्या जनसंपर्क विभागातील उत्तम पदाची नोकरी हुकली. सौना बाथ महागात पडला. अन्यथा या दशकापूर्वी आयुष्याला वेगळे वळण लागले असते.

हॉटेलच्या स्विमिंग पूलमध्ये डुंबण्यात तमारा एवढी रमली होती की, जाण्याची वेळ होऊनसुद्धा ती पाण्याबाहेर येईना. भिकार घाटकोपरला जाण्यास ती तयार नव्हती. प्रिय मित्र प्रभाकर प्रभू मोटार घेऊन आला. त्याने थेट विमानतळापर्यंत सोडले.

परतीच्या प्रवासात दिल्लीत तीन दिवस मुक्काम होता. घाटणेकरांचे बस्तान अद्याप व्यवस्थित बसले नव्हते. ते त्यांच्या थोरल्या बंधूंकडे राहत होते. म्हणून मी 'जनपथ' हॉटेलात खोली घेतली. नेमकी त्याच दिवशी खोलीच्या दरामध्ये वाढ झाली. आणखी एक संतापदायक प्रकार घडला. हॉटेलच्या बारमध्ये दारू पिण्यासाठी खाली गेलो तर मी भारतीय नागरिक असल्यामुळे मॅनेजरने दारू देण्यास नकार दिला. परदेशी नागरिक तेथे पीत होते. 'खोलीत प्या' असा सल्ला मिळाला. धातूच्या पेल्यात लपवून दारू देतो असे वेटर म्हणाला. मला तसे करणे पटले नाही. मायदेशात अशी वागणूक दिल्याबद्दल खूप चीड आली. त्या वेळी रशियनांच्या दुःखाचा अर्थ समजला. त्यांना मायदेशात 'डॉलर शॉप' मध्ये खरेदीस मनाई असायची. तमारा अनेक वेळा चिडायची. आता मला तिच्या चिडीचा पूर्ण अर्थ समजला.

दिल्ली ते आग्रा मोटार टॅक्सीने जाण्या-येण्याची सोय एम. पी. रावांनी 'थरमॅक्स' कंपनीमार्फत केली होती. तमाराचे भारतदर्शन सुखद करण्यात त्यांनी फार मोठी मदत केली. ताजमहाल पाहायला घाटणेकर दांपत्याला सांगाती घेतले. प्रवासात मॉस्कोच्या आठवणी काढल्या. खूप हसलो.

पण येताना वाटेत मोटार नादुरुस्त झाली तेव्हा सर्वांचे हसू मावळले.

दिल्लीतील त्या मुक्कामात दोन मराठी पत्रकारांची ओळख झाली. टाईम्स ऑफ इंडियाचा खास वार्ताहर सुभाष किरपेकर आणि आताच्या 'सकाळ'चा दिल्ली प्रतिनिधी विजय नाईक— दोघांच्या घरी जेवणाचा जल्लोष उडाला. या दोन मित्रांमुळे आणि बाळासाहेब घाटणेकरांमुळे दिल्ली आपलीशी वाटू लागली.

तमाराला नवी दिल्ली खूपच आवडली. हपापल्याप्रमाणे ती कपडे खरेदी

करीत होती. रशियात चांगल्या कपड्यांचा दुष्काळ. तेव्हा इथे तिला काही सुचेना. बहुतेक रशियन बायकांची भारतात खरेदी करताना अशी संभ्रमावस्था होते. तशीच अवस्था भारतीय बायकांची सिंगापुरात होते. जगभरच्या बायका सारख्याच ! अखंड खरेदी ! ! जसे जगभरचे पुरुष सारखे असतात ! भरपूर मद्यपान, धूम्रपान !

लग्नानंतर तमारा भारतात प्रथमच आली होती म्हणून मी तिला मंगळसूत्राबद्दल विचारले. तिने काळ्या मण्यांचे मंगळसूत्र घालण्यास नकार दिला. काळा रंग त्यांना अशुभ वाटतो. अशा बाबतीत मी आग्रह करीत नाही. पश्चिमी थाटाची कर्णफुले व अंगठी विकत घेतली. युरोपीय स्त्रियांना चौदा कॅरेट सोन्याचे दागिने आवडतात. भारतीय स्त्रिया वापरतात ते पिवळेधमक सोने त्यांना आवडत नाही. मला पूर्वी या विषयांमध्ये गती नव्हती. तमारामुळे कपडे, दागिने, मौल्यवान खडे, परफ्यूम्स या गोष्टींची उत्तम माहिती झाली. एखाद्या गोष्टीत लक्ष घातले तर पार खोलपर्यंत जायचे !

मॉस्कोत परतल्यावर तमाराने खरेदीचा सर्व ढीग तान्याच्या हवाली केला. आईने मुलीला कपडे देणे ठीक होते. पण तमारासाठी मी घेतलेले दागिनेसुद्धा तिने तान्याला दिले हे मला खटकले. आत्तापर्यंत तमाराने जुईसाठी एक कोपेक खर्चला नव्हता. कधी एखादी साधी वस्तू भेट दिली नव्हती. मला हे विचित्र वाटायचे. खरे म्हणजे आमच्याकडून तान्याकडे वस्तूंचा सतत एक्सपोर्ट व्हायचा. आता तान्या तमाराच्या अपार्टमेंटमध्ये स्वतंत्र एकटी राहत होती.

तान्याचे शालेय शिक्षण पूर्ण होताच धूर्त आजीने नातीला वेगळे केले. तमाराचे अपार्टमेंट तान्याच्यासुद्धा मालकीचे होते. म्हणून तान्या तेथे राहत होती. त्यासाठी नवे जर्मन फर्निचर विकत घेतले होते. त्याचे पैसे तमाराने माझ्याकडून उपटले होते. बाईची हौस म्हणून या खर्चाकडे मी दुर्लक्ष करीत होतो. घरखर्चाचे पैसे पुरत नाहीत अशी तक्रार प्रत्येक गृहिणी करते. नवरा विशेष लक्ष देत नाही. पण दुकानांमध्ये जाऊन मी बारकाईने एकूण खर्चाचा अंदाज घेतला. प्रत्यक्ष खर्चापेक्षा तमाराला जरा जास्त पैसे दिले. ती बेसावध होती. एकदा प्रत्यक्ष खर्चाचे आकडे तिच्यासमोर दाखविले. ती मला फसवत होती हे शांतपणे दाखवून दिले. त्या क्षणापासून तिचा आवाज बंद झाला. माझ्या दारूच्या,

सिगारेटच्या आणि टॅक्सीच्या खर्चावर टीका बंद झाली.

पूर्वी तमारा म्हणायची, "मी तुझ्या पायांपाशी मांजरीसारखी गुपचूप बसून राहीन." पण आता लग्नानंतर ह्या मांजरीचे रूपांतर गुरगुरणाऱ्या वाघिणीत झाले होते.

अनुवादाचे काम चांगले चालले होते. माक्सिम गोर्कीची आत्मचरित्रात्मक पुस्तकत्रयी अनुवादासाठी आली होती. त्यातील 'बालपण' ह्या पुस्तकाच्या लागोपाठ दोन आवृत्त्या प्रकाशित झाल्या. गोर्कीचे हे पुस्तक लेखनाच्या दृष्टीने चांगले जमलेय. त्यानंतरच्या पुस्तकाचे रशियन शीर्षक 'माणसांमध्ये' आणि इंग्रजी शीर्षक 'माय अॅप्रेंटिसशिप' असे आहे. त्याला मराठी शीर्षक द्यायला मी खूप वेळ आणि काळ घालविला. गोर्कीच्या जीवनातील वणवणीचे वर्णन त्यात आहे. शेवटी एका संध्याकाळी शीर्षक सुचले, 'दाही दिशा'. अपार्टमेंटमधील हॉलमध्ये संध्याकाळी सात ते नऊ या वेळेत माझे एकट्याचे व्हिस्कीपान चालायचे. त्या काळात अनेक विषयांवर चिंतन व्हायचे. नव्या कल्पना, नव्या योजना मनात यायच्या. ही सवय मुंबईपासूनची होती. मुंबईत संध्याकाळी फिरणे व्हायचे. इथे मॉस्कोत हवामान परिस्थितीमुळे फिरणे हमखास घडेना. तमारा जरी साथीला राहत होती तरी फिरण्याच्या बाबतीत क्वचित एकमत व्हायचे. तिला दुकानांमध्ये डोकवायची हौस होती. मला विलक्षण तिटकारा. दोघांच्या आवडी दोन ध्रुवांइतक्या दूर. मात्र टापटीप आणि स्वच्छता व वक्तशीरपणा यात आमचे छान जमत होते.

तिचा मराठी शब्दकोश वाढत होता. लक्ष्मी म्हणजे मोलकरीण. गणपतराव म्हणजे झिंगलेला दारुडा. कधी कधी सकाळी उठल्यानंतर म्हणायची, "पांडुरंगा नारायणा, विठ्ठला, सोडव रे बाबा !" अर्थात ही शिकवणी अस्मादिकांची.

*

# वार्ना चित्रपट महोत्सव

वार्ना हे बंदरगाव बल्गेरियातले. काळ्या समुद्रतीरी हे एक रम्य स्थळ आहे. अर्धे शहर बंदरापाशी व अर्धे टेकाडावर वसले आहे. बल्गेरिया हा बाल्कन देश आहे. एके काळी जर्मनांच्या ताब्यात हे लोक होते. दुसऱ्या महायुद्धानंतर रशियनांच्या ताब्यात. पूर्व युरोपातील छोट्या देशांची हीच अवस्था होती. खऱ्या अर्थाने ते स्वतंत्र नव्हतेच. कुणा ना कुणाचा तरी बडगा असायचा. म्हणून बल्गार भाषेबरोबर जर्मन व रशियन भाषा प्रचलित होत्या. इंग्रजी काही थोडे लोक बोलत होते. डोंगराळ बल्गेरियाच्या सीमांना रुमानिया, ग्रीस, तुर्कस्तान, युगोस्लाविया हे देश भिडलेत.

१९८१ च्या जून महिन्यात भरणाऱ्या वार्ना चित्रपट महोत्सवाचे निमंत्रण मला आले. दर दोन वर्षांनंतर हा महोत्सव भरतो. बल्गेरियाच्या रेड क्रॉस आणि रेड क्रीसेन्ट या संघटना हा महोत्सव आयोजित करतात.

लीपझिगमध्ये भेटलेल्या बल्गार मित्रांनी स्वतःचा शब्द पाळला होता. मी तयारी सुरू केली. तमाराने आक्षेप घेतला. आमंत्रण फक्त मला एकट्याला होते. बल्गेरिया हा देश मी अजून पाहिला नव्हता. आता मी लग्नाच्या बेडीत अडकलो होतो. तमाराचा विरोध धुडकावून देऊन मी निघालो. तिने घर सोडण्याची धमकी दिली. प्रवासाला निघताना मन शांत नव्हते.

वार्नाला जाणाऱ्या आगगाडीला फर्स्ट क्लासचा डबा नव्हता. चार प्रवाशांचा कूपे होता. बर्थ नरम नव्हत्या. तब्बल तीन दिवसांचा प्रवास होता. वाटेत रुमानिया देश ओलांडायचा होता. म्हणजे ट्रान्झिट व्हिसा घ्यायचा.

रुमानिया त्या वेळी भारताशी विशेष गोड वागत नव्हता. म्हणून मॉस्कोतील रुमानियन वकिलातीत व्हिसासाठी प्रदीर्घ प्रतीक्षा करावी लागली. तुटक, रूक्ष भाषा ऐकावी लागली. त्याउलट बल्गेरिया चक्क सीमेवर व्हिसा द्यायचा.

आगगाडी सोविएत युक्रेन आणि मोल्दाविया पार करून रुमानियात शिरली. रुमानियन सीमारक्षक आडदांडपणे वागले. माझ्या कूपेमध्ये एक रशियन तरुणी होती. तिचा नवरा बल्गार होता. त्यांचे छोटे मूल होते. तरुणी प्रथमच सासरी निघाली होती. अनेक बल्गार पुरुष रशियात लाकूडतोड्याचे काम करीत होते. त्यांची उत्तरेत मोठी वसाहत होती. तो बल्गार अबोल होता. रशियन तरुणी मात्र खूप बडबडत होती. घरापासून प्रथमच दूरदेशी जात होती. मनात धास्तावली होती. रशियन सीमारक्षक माझ्याशी अदबीने वागलेले पाहून मी मोठा माणूस आहे असा तिचा समज झाला. रुमानियन रक्षकांनी माझा पासपोर्ट परत द्यायला खूप विलंब केला. प्रवाशाला जास्त मानसिक ताण द्यायची ही साधी युक्ती होती. बुखारेस्ट स्टेशन ओझरते पाहिले. रुमानिया देश पाहावा अशी इच्छा कधी झाली नव्हती. त्या देशाबद्दल चांगले उद्गार क्वचित ऐकू येत.

बल्गेरियाच्या सीमारक्षकांनी मोठ्या उत्साहाने स्वागत केले. माझ्यापाशी एक सूटकेस आणि एक हँडबॅग एवढेच सामान होते. तेव्हा सामान तपासण्याचा प्रश्न नव्हता. इतर प्रवाशांची वस्तू लपविण्यात तारांबळ उडाली होती. विशेषतः रशियन तरुणीची धांदल जास्त झाली. तिने सोबत जास्त रूबल आणले होते. शेवटी मुलाच्या अंगावरच्या कपड्यांमध्ये तिने ते बेकायदेशीर रूबल कोंबले. माणसे काय काय युक्त्या योजतात !

वार्ना महोत्सव समितीने माझ्या राहण्याची उत्तम व्यवस्था केली. हॉटेल 'शिपका' उंच ठिकाणी होते. गावापासून खूप दूर. टॅक्सीने जाण्याची सोय होती. जगभरच्या टॅक्सीवाल्यांचे मी देणे आहे अशी ठाम भावना असल्यामुळे टॅक्सीचे पैसे देताना कधी दुःख होत नाही.

या महोत्सवाला दिल्लीच्या पत्रकार श्रीमती अमिता मलिक ज्यूरी होत्या. त्या आणि मी असे दोनच भारतीय होतो. त्यांची पूर्वी मॉस्को चित्रपट महोत्सवात भेट झाली होती. मी त्यांना नावाने ओळखत होतो. त्या मला केवळ चेहऱ्यावरून ओळखत होत्या. त्यांच्याशी दोन-तीनदा नमस्कार चमत्कार झाले.

महोत्सवात चित्रपटांचा दर्जा चांगला होता. निष्कारण हा महोत्सव प्रसिद्धीच्या झोताबाहेर आहे. उत्तम संयोजन, उत्तम स्थळ, छान हवेचा मोसम. ह्या महोत्सवानंतर मॉस्कोत जब्बार पटेल भेटला. त्याच्यापाशी मी ह्या महोत्सवाबद्दल बोललो. नंतर जब्बारने 'उंबरठा' चित्रपट ह्या महोत्सवासाठी धाडला. त्यात पोरितोषिक मिळाले असे ऐकले.

वार्ना महोत्सव समितीने आसपासच्या प्रेक्षणीय स्थळांची सहल आयोजित केली. आमच्या बसमध्ये एक उत्साही बल्गार तरुणी सतत गाणी गात होती. तिच्या शेजारी बसलेल्या एका छोट्या मुलाला उद्देशून ती ही गाणी म्हणत होती. एका ग्रीक ज्यूरीची ती दुभाषी होती. ग्रीक, तुर्की, रशियन आणि बल्गार या भाषा तिला अवगत होत्या. लिली देखणी नव्हती. पण चटपटीत होती. गप्पा मारता मारता आमची मैत्री जमली. ती एका छोट्या गावी पत्रकार होती. बल्गार पत्रकारांच्या समस्या तिच्याकडून समजल्या. अपुरे वेतन हीच कहाणी. पस्तिशी ओलांडलेली अविवाहित लिली महोत्सवाच्या शेवटी शेवटी निकट आली. तोवर आम्ही एकमेकांना दुरून पाहत होतो. त्यापूर्वी वालेंतिन नावाचा तरुण पत्रकार ओळखीचा झाला. दारू पिता पिता वालेंतिनने एकदम मला त्याच्या गावी येण्याचे आमंत्रण दिले. मला आश्चर्य वाटले. रशियात आल्यानंतर इतक्या वर्षांत युरोपात नव्या परिचयानंतर घरी बोलावणारा वालेंतिन पहिलाच होता. त्याच्या घरी त्याची दोन मुले व पत्नी होती. वालेंतिन आणि मी बसमध्ये बसलो. बल्गेरियात आपल्यासारखाच मुक्त संचार होता. परदेशी लोकांच्या संचारावर बंधने काही नव्हती. सुमारे चार तासांनी आम्ही सिलिस्त्रा गावी पोहोचलो. दान्यूब नदीच्या तीरावर सिलिस्त्रा गाव वसले आहे. नुसता एक रस्ता ओलांडला तर रुमानियाची हद्द चालू होते.

गावात प्रवेश करण्यापूर्वी एक गलिच्छ वस्ती दिसली. बल्गेरियात आणि रुमानियात जिप्सींची लोकसंख्या फार आहे. त्यांची ही वस्ती होती. चक्क भारतामधील गावाची आठवण झाली. माझ्या पायांत सुद्धा कोल्हापुरी चप्पल होती. उन्हाळ्याचे दिवस होते. बल्गेरियात सूर्यप्रकाश भरपूर. डोंगराळ मुलुख.

वालेंतिनचे तीन खोल्यांचे अपार्टमेंट आपल्यासारखेच होते. पण खूप टापटीप. जेवणाच्या टेबलावर वालेंतिनचा शेजारी मित्र आलेला होता. बल्गार लोक जेवणापूर्वी एक-दोन घोट वोदका पितात. नंतर वाईन भरपूर पितात.

काकडीपासून बनविलेले सूप छान चवदार असते. फळांची रेलचेल असते. माझी बायको रशियन आहे हे ऐकताच वालेंतिनच्या बायकोचा विरस झाला. भारताबद्दल सर्वांना खूप कुतुहल होते. इंदिरा गांधी लोकप्रिय होत्या आणि अर्थात राज कपूर. वालेंतिनचे घर आणि कुटुंब छान होते. दुसऱ्या दिवशी सकाळी तो त्याच्या आईकडे घेऊन गेला. आईने आस्थेने वोदका पाजून विचारपूस केली. नंतर वालेंतिनच्या थोरल्या भावाकडे गेलो. वालेंतिनच्या वृत्तपत्राच्या कचेरीत गेलो. अगदी कराड, सांगलीमधील वृत्तपत्राची कचेरी वाटली.

चेरीची फळे खात खात दान्यूबच्या तीरावर तासभर दोघे बसलो. वालेंतिनने रस्त्यापलीकडचा रुमानिया दाखवला. ह्या सर्व काळात एक जिप्सी पोरगा सारखा माझ्या मागे मागे फिरत होता. शेवटी वालेंतिनने त्याला हाकलून दिले.

दुपारी सिलिस्त्रा सोडताना जड वाटले. आतापर्यंतच्या भ्रमंतीत भावनेने प्रथमच गुंतत होतो. बल्गेरियात राहत्या जागांचा प्रश्न होता. वालेंतिनला लौकरच ती जागा सोडावी लागणार होती. एकूण आपल्यासारखीच माणसे. आपल्यासारखीच परिस्थिती. आपल्यासारख्या समस्या. खरे तर रशियापेक्षा बल्गेरिया जास्त जवळचा वाटला.

हे जवळपण शेवटच्या दिवशी लिलीमुळे जास्त जाणवले. वार्नामधून मी दोन दिवस गायब झाल्यामुळे ती चिंताग्रस्त बनली होती. मला पाहताच धावत आली आणि मिठी मारून विचारपूस करू लागली. वालेंतिन तिच्या माहितीचा होता असे आढळले. मग वार्नातील तिच्या मावशीच्या घरी मला घेऊन गेली. तेथे गप्पा आणि मद्यपान घडले. लिलीने माझ्याबद्दल खूप माहिती जाणून घेतली. मी नेहमीच्या मोकळेपणाने बोललो. रात्री बारा वाजता वार्ना बंदरापाशी भटकत असताना ती माझ्या प्रेमात पडली होती असे मला समजले. तिच्या शब्दांपूर्वी तिच्या घट्ट आलिंगनाने आणि उत्कट चुंबनाने सारे काही सांगितले. वार्नामधील तो शांत रस्ता. दुतर्फा झाडे निश्चल उभी होती. दूर कुठेतरी पर्यटकांच्या हसण्याचे आवाज येत होते. लिलीला आणि मला एकमेकांमध्ये सामावण्याची उत्कट इच्छा झाली. पण त्या क्षणी ते शक्य नव्हते. जवळच असलेल्या तिच्या हॉटेलमधील खोलीत एवढ्या रात्री मला जाणे शक्य नव्हते.

शिवाय दूर असलेल्या माझ्या हॉटेलातील खोलीत रात्रीच्या वेळी येणे तिला शक्य नव्हते. दुसऱ्या दिवशी दुपारी माझ्या 'शिपका'वरच्या खोलीत संकेतभेट ठरली.

दुसऱ्या दिवशी सकाळी जॉन वॉरिंग्टन या ब्रिटिश फिल्मी पत्रकारापाशी बी.बी.सी. साठी मुलाखत देण्यात मी गुंतलो होतो. वार्ना चित्रपट महोत्सव, हिंदी चित्रपट वगैरे विषयांवर मुलाखत होती. वॉरिंग्टन अनेकवेळा भारतात गेले होते. बासू भट्टाचार्यचे चांगले स्नेही होते. त्यांना भारतीय चित्रपटसृष्टी उत्तम माहीत होती.

मुलाखतीमधून मोकळा होतो न होतो तोच लिली आली. एखाद्या मीलनोत्सुक नायिकेसारखी. परस्परांना आवडलेल्या दोन प्रौढ व्यक्ती एकमेकीत सामावल्या. मीलनानंतर विरह अटळ असतो. फक्त या वेळी चटकन विरह होता. तोसुद्धा कायमचा.

*

## ‘रादुगा’ प्रकाशन

आतापर्यंत ‘प्रगती’ प्रकाशनाच्या मराठी विभागात मी एकटाच अनुवादक होतो. अरिष्टानंतर श्री. श्रीनिवास कोर्लेकर दुसरे अनुवादक म्हणून आले. मुंबईतील ‘सोविएत देश’ कचेरीत अनेक वर्षेपर्यंत ते मॅनेजर होते. तेथून निवृत्त झाल्यानंतर पत्नीसह ते मॉस्कोला आले. अर्थात आमचा पूर्वीचा परिचय होता. माझ्यापेक्षा वयाने वडील असूनसुद्धा ते माझ्या लेखनाचे व अभिनयाचे चाहते होते. ते मूळचे कम्युनिस्ट होते त्यामुळे लोकवाङ्मयवाल्यांचा प्रश्न मिटला होता. मराठी विभाग पुन्हा सुरळीत चालू झाला. तेवढ्यात सोविएत सरकारच्या अर्थखात्याने जास्त रूबल रुपयांत करण्याची परवानगी दिली. पूर्वी महिन्याला ८० रूबल पाठवत. आता १८० रूबल जाऊ लागले. त्यातच रूबलचा भाव चढला. भारतामधील महागाईबरोबरच आम्हाला या प्रमाणात वाढते रुपये मिळू लागले. थोडेसे आर्थिक स्थैर्य लाभले.

‘प्रगती’ प्रकाशनची विभागणी करण्याचे ठरविण्यात आले. ‘प्रगती’ मध्ये राजकीय, सामाजिक, आर्थिक विषयांवरील पुस्तके प्रकाशित करणार होते. नव्याने स्थापन झालेल्या ‘रादुगा’ मध्ये कादंबरी, कथा, बालसाहित्य वगैरे प्रकाशित होणार होते. कोणत्या प्रकाशनसंस्थेत काम करायचे ह्या निवडीचा अधिकार सर्व कर्मचाऱ्यांना मिळाला. मी अर्थातच ‘रादुगा’ची निवड केली. राजकीय पुस्तकांचा अनुवाद करण्याची ब्याद कायमची टळली. कोर्लेकर ‘प्रगती’ मध्ये राहिले. सारी विभागणी समाधानकारक घडली. मुख्य नियंत्रक

संपादकपदी तात्याना वेर्बित्सस्कायाची नेमणूक झाली. तिला फार मोठा आर्थिक लाभ घडला. कनिष्ठ संपादक निकोलाय सिदेलेव बनला. कॉपी लेखक झिनैदा इवलेवा राहिली. तीच मुद्रिते तपासायची. 'रादुगा' म्हणजे इंद्रधनुष्य.

'प्रगती' सोडता सोडता जवाहरलाल नेहरूंच्या चरित्राच्या पुस्तकाबाबत एक भानगड निर्माण झाली. दोन सोविएत लेखकांनी हे पुस्तक लिहिले होते. त्यातील एकाने 'जवाहरलाल नेहरू' या भारत-सोविएत संयुक्त वार्तापटाची पटकथा लिहिली. श्याम बेनेगल यांनी भारताच्या बाजूने दिग्दर्शन केले होते. प्रस्तुत पुस्तक इंग्रजीत प्रकाशित झाले होते. त्यातील काही मजकुरावर भारतात आक्षेप घेण्यात आले. म्हणून मराठी पुस्तक छापखान्यात कंपोजला असतानाही प्रकाशन काही काळ थांबविण्यात आले.

कालांतराने जुना मजकूर काढून टाकण्यात आला. नव्या मजकुराची भर आली. पर्यायाने नव्याने अनुवाद केला. पुस्तकाचा एकसंधपणा मोडला. संपादनासाठी मसाल्किना आणि कोर्लेकर यांनी काम केले. अखेर पुस्तक प्रकाशित झाले. मागे वळून पाहण्याची इच्छा नव्हती. 'रादुगा' मध्ये नवनवी पुस्तके मिळू लागली. रशियात ज्या उद्दिष्टासाठी मी आलो होतो ते उद्दिष्ट साध्य झाले होते. रशियन व सोविएत ललित साहित्य मराठीत रूपांतर करू लागलो. ल्येव तल्स्तोय, फ्योदर दस्तायेवस्की, पूष्कीन, गोगोल अशा अभिजात रशियन लेखकांच्या साहित्यकृतींना मराठी रूप देऊ लागलो. शिवाय वासिली शुकशिन या नट, दिग्दर्शक, लेखकाचा कथासंग्रह अनुवादित केला. फार गुणी माणूस होता. सैबेरियातील या मनस्वी कलावंताची रशियन नोकरशहांनी फार मुस्कटदाबी केली. त्याच्या हयातीत त्याला अनेक अन्याय सहन करावे लागले. फक्त सत्तेचाळीसाव्या वर्षी मेलेल्या या कलावंताचे गुणगान आजच्या रशियात करतात. त्याचा कथासंग्रह अनुवाद केल्यानंतर मलाही अन्यायाची झळ लागली. 'मला जगायचंय' नावाची कथा विलक्षण होती. ही कथाच प्रेस कमिटीमधील एका म्हाताऱ्याने गाळून टाकायला लावली. म्हणजे डेन्मार्कच्या राजपुत्रविना 'हॅम्लेट' अशी अवस्था बनली. ही कथा इंग्रजी संग्रहात प्रसिद्ध झालेली आहे. पण मराठीत छापू दिली नव्हती. अशा गोष्टी मनाला लावून घ्यायच्या नसतात असे शहाणपण काही लोक शिकवतील, पण मनस्वी माणसांना अशा गोष्टींचा फार त्रास होतो. नाटक, चित्रपट, साहित्य या क्षेत्रांमध्ये माणूस जेव्हा प्रवेश करतो

ते केवळ मनाच्या समाधानासाठी. पैशांचे तेथे मोजमाप नसते. अर्थात पैसे आवश्यकच असतात. पण त्याहीबरोबर त्या माणसाच्या मनाची कदर झाली तर उत्तमच. दुर्दैवाने अनेक वेळा अत्यंत क्रूर वागणूक मिळते. जीवनाच्या वाटचालीत झालेले मनावरचे घाव प्रदीर्घ काळ ओले राहतात.

दरम्यान तिसरा करार संपत आला होता. चौथा करार बिनबोभाट झाला. म्हणजे १९८५ पर्यंत रशियातील मुक्काम ठरला. 'पर्मनंट' हा शब्द माझ्या जीवनात नव्हता. 'करार' हा शब्द कायम सांगाती आहे. या कराराची मुदत वेळोवेळी ठरते. म्हणून तर आयुष्यात सतत बदल, नावीन्य घडते. त्यात मजा आहे. मन सारखे ताजे राहते.

हिवाळ्यात सुटीवर जाणार होतो. कचेरीने मुंबईपर्यंतचे परतीचे तिकीट दिले. या वेळी तमारालाही तिकीट दिले. आता ती माझी कायदेशीर बायको होती. या क्षणापासून तिने नोकरी कायमची सोडली. अर्थात 'एअरोफ्लोत'ने प्रवास करण्याची सक्ती होतीच. दिल्लीत बाळासाहेब घाटणेकरांना सरकारी भाड्याचे घर मिळाले होते. आता ते टेलिफोन व दळणवळण खात्यात काम करीत होते. दिल्लीत चार दिवस राहण्याची सोय झाली. माझी सारखी पंचाईत व्हायची. भारतात राहायचे कुठे ? कुणाकडे ? सारखे पत्रव्यवहार ठेवून कशीबशी सोय करायची. महिना दोन महिने हॉटेलात राहण्याची ऐपत नव्हती.

मुंबईत मामा व बेबीकडे काही दिवस तळ टाकला. मॉस्कोत थीबाराजाने त्याच्या जुहूच्या प्रशस्त फ्लॅटवर राहण्याचे आमंत्रण दिले होते, म्हणून फोन करून त्याला भेटायला गेलो. तेथेही समस्या होती. थीबाचा जुना नोकर काम सोडून गेलेला होता. घरात धान्य, साखर अजिबात नव्हते. थीबाने माझ्या हाती किल्ली सोपवली. तो किमान पंधरा-वीस दिवस मुंबईबाहेर जाणार होता. घाटकोपरला घरी आलो तेव्हा विलक्षण विनोदी दृश्य होते. सोफ्यावर एका बाजूला तमारा बसली होती, मध्ये जुई आणि दुसऱ्या बाजूला भारती. माझ्या दोन बायका शांतपणे एकमेकींशेजारी बसलेल्या होत्या. पहिली खूप बुद्धिमान, दुसरी खूप सुंदर. दोघींनी लग्नानंतर नोकऱ्या सोडून दिल्या होत्या. दोघींच्या मुलींना प्रत्यक्ष अप्रत्यक्ष मी पोसत होतो. एकाही मुलीने आजपर्यंत एकदाही जेवण बनवून दिले नाही. कायदेशीरपणा किती गंमत करतो. एका सहीमुळे किती फरक पडतो. बायका हे मान्य करतात, नाहीतर संशयपिशाच्चांनी पछाडून

जातात. पुरुषाला आयुष्य असह्य करतात. आता दोघी निवांत बसल्या होत्या. स्त्रीसुलभ कुतूहलाने तमाराला बघायला भारती आली होती. तमारा तोपर्यंत जुईबरोबर व्यवस्थित वागायची. नंतर अचानक ती तिचा राग राग करू लागली. मॉस्कोत गेल्यानंतर अर्वाच्य शब्द उच्चारायची. हा अचानक बदल का घडला हे मला आकळेना.

थीबाच्या प्रशस्त अपार्टमेंटमध्ये उत्तम फर्निचर होते. एखादा अविवाहित पुरुष इतका नेटकेपणाने राहतो हे पाहून आश्चर्य वाटले. घर कसे ठेवावे हे एखाद्या गृहिणीने शिकावे. मी आणि तमाराने आमचा तात्पुरता संसार सुरू केला. दुकानात जाऊन वाणसामान मी आणले. तमारा स्वयंपाक करू लागली. मुंबईत तसे जगणे सोपे होते. अन्नपदार्थ दुकानात मुबलक होते. पैसे खर्च केले म्हणजे सारे सोपे होते. मॉस्कोतील जीवन अवघड होते. तेथे पैसे असूनसुद्धा पदार्थ मिळत नसत. तास तास रांगेत उभे राहावे लागायचे. जुहूला अडीच महिने मुक्काम होता. त्या काळात एक सोविएत आधुनिक नाटक मराठीत रूपांतरित करण्याचा मी प्रयत्न केला. सुभाष आणि कुंदा कान्हेरेने त्यांच्या घरी वाचन ठरविले. निर्माते मोहन तोंडवळकर ऐकायला आले. त्यांना नाटक आवडले नाही. लेखन मला जमले नाही. मराठी मातीत रुजण्यासारखे नाटक नव्हते.

तमाराबरोबर खरेदीसाठी दुकानांमध्ये जाण्याची कटकट टाळण्यासाठी मी एक युक्ती योजली. मी तिच्या हाती सरळ दहा हजार रुपये दिले. खारला लिंकिंग रोडवर ती टॅक्सीने जायची-यायची. तसेच दिल्लीत यशवंत प्लेसमध्ये मोठी खरेदी व्हायची. लेदर ओव्हरकोट व फरचे कोट घ्यायची. त्यामुळे ती खूष आणि मला शांतता लाभायची. त्यानंतरच्या प्रत्येक भारतभेटीत मी असे करायचो.

मुंबईत उभय बासू, गुलझार, साठेसाहेब भेटले. अमोल पालेकरने घरी जेवायला बोलाविले. जानेवारीत दिल्लीत आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सव भरणार होता. बासूद्वयाने आमच्या पासांची सोय केली. मग राजधानी एक्सप्रेसने दिल्ली गाठली. पण प्रवासाचा त्रास झाला. रात्री पाठ दुखू लागली. सतत लेखनाचे काम केल्यामुळे मला पाठदुखी जडली होती. उजवा हात फार दुखायचा. हिवाळ्यात बोटे दुखत. भारतीय मित्रांमुळे दिल्लीत महोत्सव छान वाटला. शिवाय रशियन पत्रकार मित्र लिओनिद अब्रामोव दिल्लीत सोविएत

माहिती कचेरीचा मुख्य होता. अब्रामोव काही काळ मुंबईत व्हाईस कौन्सल होता. त्याची आणि माझी मुंबईत ओझरती गाठ पडली होती. या वेळी त्याची व त्याच्या पत्नीची सविस्तर भेट घडली. ल्योन्या-आलीना हे जोडपे माझे चाहते बनले. तमारा-आलींना ही जोडी खरेदीसाठी भटकू लागली. ल्योन्याला व मला गप्पा मारायची संधी मिळाली. ल्योन्या हा अस्सल रशियन. स्वतःच्या रीतीरिवाजांचा त्याला फार अभिमान. नवनवे साहित्यिक रशियन शब्द सांगायचा. सध्या तो 'न्यू टाईम्स' साप्ताहिकाच्या संपादक मंडळात आहे. समव्यवसायी मित्राबरोबर गप्पा मारण्यात आनंद असतो.

दिल्लीहून परत मुंबई गाठली. या वेळी पुण्यातील मुक्कामाची सोय एम.पी. रावांनी 'थरमॅक्स'च्या गेस्ट हाऊसमध्ये केली होती. आता पुण्यात शिंदे नव्हते. आम्ही येण्यापूर्वीच घशाच्या कर्करोगाने शिंदे वारले होते. जवळचे एकेक माणूस जग सोडून जात होते. शिंद्यांच्या शेवटच्या हालांची हकीगत सतीश-मधुराकडून समजली.

एम्. पी.रावांनी महाबळेश्वरची सहल सहकुटुंब आयोजित केली. सौ. राव आणि कु. सोनाली राव सहलीला आल्या. दोन दिवस खूप मजा आली.

पुण्यात नवे अपार्टमेंट विकत घेण्यासाठी मी प्रयत्नांची शर्थ केली. मला पुढचा काळ चिंतित करत होता. त्या वेळी अपार्टमेंटांचे दर माफक होते. तरीही पैसे अपुरे होते. शेवटी औंधला एक अपार्टमेंट खरेदी करण्याचा निश्चय केला. पण ऐन वेळी बिल्डर गायब. ते अपार्टमेंट दुसऱ्या कुणाचे होते म्हणे. योग जमला नव्हता. घर आणि लग्न या गोष्टी योगाने जमत असतात.

या वेळी तमाराला भारतातील उष्ण हवेचा व धुळीचा त्रास झाला. आता नवलाई संपली होती. मला हे अपेक्षित होते. ती भारतात स्थायिक होऊ शकणार नव्हती हे मला पक्के माहीत होते. भावनांपेक्षा विचारांचे मनावर प्राबल्य होते. पण पपा जागीरदार आणि बासू चटर्जी माझ्याबद्दलच्या पुढच्या विचारांनी अस्वस्थ व्हायचे. उत्तर वयात जीवनाचा साथीदार बरोबर राहणार नाही ? हा विचार त्यांना भयंकर वाटत होता. मला तसे वाटत नव्हते. कारण त्या मानाने अजून मी लहान होतो. अंगात रग होती, धमक होती. परदेशात माणसाचे जेव्हा जुळत नाही तेव्हा त्याचे किती हाल होतात हे मी अनुभवत होतो. तमाराचे उत्तरायुष्यात भारतात हाल व्हावेत अशी माझी इच्छा नव्हती. तिला तिच्याच

देशात ठेवण्याचा इरादा होता. माझ्या तिच्यावरच्या प्रेमाचे ते निदर्शक होते. स्वार्थासाठी तिला भारतात राहायला लावले असते तर तिचे फार हाल झाले असते. अनेक वर्षे नशापाणी करूनही शुद्धीवर राहून डोळसपणे विचार आणि कृती करीत होतो. प्रत्येक कृतीच्या दूरगामी परिणामाची दखल घेत होतो. पण ह्या गडबडीत स्वतःकडे लक्ष देणे राहून गेले. प्रत्येक वसंताच्या मोसमाच्या आरंभी माझी घुसमट जास्त व्हायची. ओव्हरकोट घातल्यानंतर जीव घाबराघुबरा व्हायचा. मेत्रोमध्ये आत शिरल्यानंतर श्वास थांबायचा. गरम कपडे घातल्यानंतर कोरडी ओकारी यायची. या गोष्टी काही क्षण घडायच्या. म्हणून मी त्यांच्याकडे दुर्लक्ष केले. आयुष्य थांबत नव्हते. डॉक्टरी सल्ला घेणे रशियात सोपे नव्हते. रांगांमधून उभे राहून जीव मेटाकुटीला आला असता. मोफत वैद्यकीय उपचारांवर माझा विश्वास नव्हता. सहनशीलता या बाबतीत पुढे नडली.

खरे म्हणजे माझ्याकडून या वेळी फार मोठी गफलत झाली. मुंबईत दोन चांगले डॉक्टर घनिष्ट परिचयाचे झाले. थीबाचे मोठे बंधू डॉक्टर एस्.एस्. ठाकूर म्हणजे आमचे डॉक्टरभाई छान मित्र बनले. त्यांचे मित्र डॉ. सुरेंद्र दळवी व डॉ.सौ. अंजेलिका दळवी ही मंडळी मित्रपरिवारात जमा झाली. दळवी दांपत्य अनेक वर्षे पश्चिम जर्मनीत काम करीत होते. त्यांच्या लोणावळ्यातील बंगल्यात आम्ही दोन दिवसांची सफर केली. त्या काळात माझ्या प्रकृतीबद्दल मी अवाक्षर काढले नव्हते. खरे म्हणजे माझ्या किरकोळ तक्रारी मी गंभीरपणे घेतल्या नाहीत.

मॉस्कोत परतल्यानंतर माझ्या ध्यानात आले की, तमारा जास्त प्रमाणात भारतीयांवर टीका करू लागली होती. भारतीय गृहिणी घरात झाडलोट, कपडे धुणे वगैरे कामे करीत नाहीत. त्या मोलकरणींवर ही कामे टाकतात हे तिच्या ध्यानात आले. म्हणून घरकामाबद्दल तिची कुरबुर सुरू झाली. मोलकरणींच्या मार्फत आपण घरात झोपडपट्टीतील घाण व रोगराई घेतो असा तिचा दावा होता. या गोष्टींबाबत वाद घालणे मी टाळत होतो.

तिला भारतदर्शन घडविण्यात माझा उद्देश वेगळा होता. प्रत्यक्षात त्याचे पडसाद भलतेच ऐकू येत होते. तिने नोकरी सोडल्यामुळे ती कायमची घरात राहू लागली. म्हणजे दोघे सतत एकत्र. मला ही बाब त्रासदायक व्हायची. तसे बोलूनही दाखवत होतो. नोकरी न करणे आणि गृहिणीपद सांभाळणे तिला खूप आवडत होते. कर्तृत्वाचा कोंडमारा वगैरे काहीही होत नव्हता. भरपूर पैसे घेऊन

दुकानांमध्ये चकरा मारायची. अर्थात माझ्या सुखसोयींकडे खूप लक्ष द्यायची. माझ्यासाठी उत्तमोत्तम बूट विकत आणायची. रशियात उत्तम बूट विकत मिळणे अवघड. कधी कधी माझ्या बुटांनाही पॉलिश करून द्यायची.

घराची नवी मांडणी करण्याचा उद्योग तिने सुरू केला. ऑफिसचे भाड्याचे फर्निचर परत देऊन टाकले व नवे सुंदर चेक बनावटीचे फर्निचर विकत घेतले. आरामशीर सोफासेट आणि कपाटे व बार घरात उभे राहिले. बारमध्ये माझा कट ग्लासचा संग्रह उभा राहिला. अनुवादित पुस्तकांच्या प्रतींसाठी चेक बनावटीची काचेची फडताळे आणली. माझ्या पुस्तकांना जरी ती वाचू शकत नव्हती तरी तिला मूळ रशियन पुस्तके माहीत होती. माझ्या बुद्धिमत्तेचे तिला कौतुक होते. 'राजुल्या' असे लाडाने हाक मारायची. या कौटुंबिक आनंदात तिची मुलगी मिठाचा खडा टाकायची. तान्याचा स्वभाव विचित्र बनला होता. तिच्या चष्म्याचा नंबर फार मोठा होता. म्हणून तिच्यात न्यूनगंड निर्माण झाला होता. रूपाने तशी ती छान दिसत होती. पण योग्य मित्र किंवा नवरा सापडत नव्हता. त्या वेळी लौकर लग्न करण्याची फॅशन होती. विशीपलीकडे गेलेल्या तरुणीला 'स्ताराया देवा' म्हणजे 'प्रौढ कुमारी' असे नाव मिळायचे. माय-लेकीची क्वचित भेट व्हायची. पण तेवढ्या अल्पकाळात तान्याच्या मागण्यांची यादी फार मोठी असायची. दोघींचे कडाक्याचे भांडण व्हायचे. मला आश्चर्य वाटायचे की, ह्या मुलीचा बाप मॉस्को शहरात राहत असूनही ती त्याला कधी भेटली नव्हती किंवा तोसुद्धा तिला भेटायला कधी आला नव्हता. तान्या मला माझ्या नावाने सरळ हाक मारायची. 'पपा' वगैरे फालतूपणा नव्हता. मात्र साधा कपभर चहा करून देत नव्हती. विलक्षण स्वार्थी, लाडावलेली कार्टी. तमाराने कुठेतरी वशिला लावून तिला नोकरी मिळवून दिली होती. तान्या नाममात्र स्वावलंबी बनली होती. पण एकटी असूनही वाह्यात जगत नव्हती. मॉस्कोच्या जीवनात असे वर्तन कौतुकास्पद होते, विरळा होते. ती मद्यपान व धूम्रपान अजिबात करीत नव्हती. छचोर जगत नव्हती. आईप्रमाणेच तिला छानछोकीच्या कपड्यांची आवड होती. सुंदर स्त्रियांच्या दृष्टीने अशी आवड असणे स्वाभाविक होते असे मला वाटायचे. पण परदेशी कपड्यांची आवड मला त्रासदायक आणि खर्चिक वाटायची.

या कंटाळवाण्या दिनक्रमापासून दूर पळायची संधी आली. सुभाष कान्हेरे

म्हणाला की, त्याचे लंडनमध्ये दीड महिना पोस्टिंग ठरले होते. त्या काळात दुसऱ्या मराठी पर्सरबरोबर तो लंडनच्या एका उपनगरात भाड्याच्या घरात राहणार होता. त्याने मला निमंत्रण दिले. राहण्याच्या जागेचा प्रश्न मिटला. ताबडतोब विमानाचे सवलतीचे तिकीट काढले. जून महिन्यात लंडनची ट्रिप ठरली. दहा दिवस मुक्काम केला. सुभाषने आणि त्याच्या मित्राने शशिकांत सावंत-देसाईने माझी खूप सरबराई केली. पूर्णार्थाने आराम मिळाला. विशेष धावपळ केली नाही. मॉस्को ते लंडन विमानप्रवासात आर.एम्.शहा सांगाती होते. त्यांच्यामुळे एका मराठी माणसाची नवी ओळख झाली.

श्रीनिवास बर्वे लंडनमध्ये स्थायिक होण्यापूर्वी केनियातून आला होता. त्याची आई पुण्यात राहत होती. त्याची बायकोसुद्धा पूर्वी आफ्रिकेत राहत होती. श्रीनिवास-रेखा यांच्या घरी एका संध्याकाळी पाहुणचार अनुभवला.

शिवाय डॉ. अशोक व डॉ. सुलभा देशपांडे लंडनमध्ये होतेच. त्यांच्याबरोबर ब्रायटनला एक दिवसाची सहल केली.

मित्रांच्या संगतीत लंडनचा मुक्काम आनंदाचा झाला. पण थकवा खूप वाटत होता.

घरी आल्यानंतर तान्याने व तमाराने त्या आनंदावर विरजण पाडले. त्यांना हवे ते कपडे मी आणले नव्हते म्हणून. लंडनमध्ये पैसे मर्यादित होते. मॉस्कोची गोष्ट वेगळी. हे त्या बायकांनी समजून घेतले नव्हते.

सुबत्ता असूनही घरात समाधान नांदत नव्हते. मनाची अस्वस्थता बंद करण्यासाठी मी कामात गुंतवून घेत होतो. दिवसाचे सहा-सात तास टेबलापाशी बसून राहत होतो. कधी तरी संध्याकाळी वेरोनिकाला भेटत होतो. वेरोनिका मॉस्को टी.व्ही. ची पत्रकार होती. आठवड्यातून किमान दोनदा मॉस्कोच्या वार्तापत्रांमध्ये तिचे टी. व्ही. वर दर्शन व्हायचे. वेराला इंग्रजी व फ्रेंच भाषा अवगत होत्या.

एका सभेच्या ठिकाणी आमचा परिचय झाला. परिचयाचे रूपांतर मैत्रीत झाले. वेरा घटस्फोटिता होती. तिला मूलबाळ नव्हते. तिचे वडील लाल सेनेत कर्नल होते. दुसऱ्या महायुद्धात लढले होते. एका रात्री स्तालिनचे हस्तक त्यांना पकडून घेऊन गेले. नंतर दहा वर्षे सैबेरियात श्रम छावणी. वेराची आणि तिच्या मोठ्या बहिणीची शाळेत इतर मंडळींनी फार विटंबना केली. 'देशद्रोह्याच्या

मुली' म्हणून त्यांची हेटाळणी केली. उन्हाळ्याच्या सुट्टीत क्रिमियातील मावशीच्या घरी त्या जायच्या. भूक भागविण्यासाठी समुद्रातील कालवे पकडून खायच्या. स्तालिनच्या मृत्यूनंतर सात वर्षांनी वेराचे वडील मुक्त झाले. युद्धातील बहादुरीबद्दल सोविएत सरकारने त्यांचा गौरव केला. त्यांच्यासारख्या कहाण्या रशियात खूप आहेत. हळूहळू वेरा आणि मी नजीक येत होतो. रशियात पूर्वापार एक प्रघात आहे. विवाहित पुरुषाबरोबर लैंगिक संबंध ठेवणाऱ्या स्त्रीला त्याची 'ल्यूबोवनित्सा' म्हणतात. वेरा स्वखुषीने माझी 'ल्यूबोवनित्सा' बनली. मॉस्कोतील एका राजरस्त्यावरच्या मोठ्या इमारतीत एका सामायिक अपार्टमेंटमध्ये तिच्या नावावरची एक खोली होती.

मॉस्कोत अशी सामायिक अपार्टमेंट अनेक आहेत. जागेच्या टंचाईवरचा हा उपाय आहे. तीन-चार खोल्यांमध्ये वेगवेगळी दोन-तीन कुटुंबे राहतात. स्वयंपाकघर, टॉयलेट, न्हाणीघर यांचा सामायिक वापर होतो. जर सर्वजण समजूतदार असतील तर जीवन बिनबोभाट चालते. जर भांडकुदळ असतील तर असह्य होते. वेराच्या शेजारणी, दोन जख्ख म्हाताऱ्या होत्या. ती तिच्या खोलीत मला गुपचूप न्यायची. एका खोलीत आटोपशीर अत्यावश्यक फर्निचर होते. त्या खोलीत शांततेचा आणि समाधानाचा लाभ मिळायचा.

वेराचे म्हातारे आई-वडील दुसऱ्या एका स्वतंत्र अपार्टमेंटमध्ये राहत. वेरा कधी कधी त्यांच्याबरोबर राहायची.

कालांतराने त्या नात्यातील नवलाई संपली. वेराच्या मागण्या सुरू झाल्या. पुन्हा कपडे. घरात ह्या कपड्यांपायी मी पिडलो होतो. तेव्हा वेराकडे जाणे हळूहळू थांबले होते. सर्वच रशियन तरुणींना परदेशी कपड्यांचे वेड. परदेशी माणसाकडे परदेशी पैसे असतात म्हणून त्यांच्याकडून परदेशी वस्तूंची भेट अपेक्षित होती. ज्या गोष्टीत आनंद नाही ती गोष्ट थांबवायची. म्हणून एक दिवशी मी तो संपर्क थांबविला.

*

# ग्रुझिया

जॉर्जिया हे सोविएत संघातील कॉकेशसमध्ये स्वतंत्र प्रजासत्ताक आहे. रशियनमध्ये त्याला 'ग्रुझिया' म्हणतात. या प्रदेशाचा काही भाग डोंगराळ आहे. काही भाग काळ्या समुद्रतीरावर आहे. त्यात अबखाझिया हे स्वतंत्र स्वायत्त प्रजासत्ताक आहे. ग्रुझियाचा समुद्रतीराचा काही उत्तम प्रदेश रशियन फेडरेशनमध्ये जोडलेला आहे. त्याबद्दल ग्रुझिन लोकांचा राग आहे. त्यांचे अबखाझिनांशी पटत नाही. अबखाझियाच्या डोंगराळ भागात शतायुषी माणसे खूप आहेत. अशा शतायुषी माणसांचा एक गानवृंद जगप्रसिद्ध बनलाय.

ग्रुझियाचा इतिहास ज्वलंत आहे. लढाऊ बाण्याची ही माणसे तापट स्वभावाची असतात. त्याचबरोबर विनोदबुद्धी त्यांना उपजत असते. 'ग्रुझिया फिल्म'चे चित्रपट विनोदी म्हणून प्रसिद्ध आहेत. त्बिलीसी हे राजधानीचे शहर. पूर्वी त्याला तिफ्लिस असे म्हणत. स्तालिन मूळचा ग्रुझिन. सध्याचे सोविएत परराष्ट्रमंत्री एदुआर्द शिवर्दनाद्झे हे सुद्धा ग्रुझिन. काही ग्रुझिन आडनावे 'द्झे' या अंतिम अक्षरांसह असतात. काही आडनावे 'श्विली' या अंतिम अक्षरांसह असतात.

नेल्ली टोटलाद्झेची ओळख पिचुंदा या विश्रामस्थळी झाली.

किनाऱ्याजवळच्या रस्त्यावर फिरताना नेल्ली भेटली. तिनेच प्रथम बोलणे सुरू केले. तमाराच्या आणि तिच्या गप्पांमधून असे आढळले की, नेल्ली मॉस्कोत आमच्या घरापाशीच होस्टेलमध्ये पूर्वी राहत होती. तिने आम्हाला पूर्वी पाहिले होते. आता ती त्बिलिसीमध्ये एका तंत्रविद्यालयात अध्यापिका होती.

निरोपाच्या वेळी त्बिलिसीला तिच्या घरी येण्याचे निमंत्रण देऊन गेली.

एक दिवस खरोखरच त्बिलिसीहून नेल्लीचा फोन आला. ग्रुझिनांच्या रशियन बोलण्यातील एक खास हेल आहे. तसाच आर्मेनियनांचा हेल आहे. पण त्यात थोडासा फरक आहे. ग्रुझिन शांतपणे बोलतात. आर्मेनियन आपापसात बोलतात तेव्हा भांडतात असे भासते. ग्रुझिन भाषेत 'हो' शब्द आहे. मराठीप्रमाणेच 'हो'चा अर्थ आहे. ग्रुझिन लिपी आपल्या दक्षिण भारतीय लिपीसारखी दिसते.

नेल्लीच्या आमंत्रणाप्रमाणे मी आणि तमारा त्बिलिसीला विमानाने निघालो. मॉस्कोतील न्वुकोवो विमानतळावरून त्बिलिसीला विमाने जातात. दोन तासांचा प्रवास. आगगाडीने तीन दिवस लागतात. विमानात ग्रुझिनांपाशी हातातील सामान भरपूर असते. त्यामुळे बसायला अडचण होते.

परगावी कुणाच्या घरी राहणे मी शक्यतो टाळायचो. सोविएत संघात तर विशेषत्वाने हॉटेलात राहत होतो. कारण कुणाच्या घरी राहायचे म्हणजे पोलिसाकडे नोंद करायची वगैरे कटकटी होत्या. नेल्लीमार्फत 'त्बिलिसी' हॉटेलात खोल्या बुक केल्या होत्या. आता प्रेस कमिटीने आमच्यासाठी खास सोय केली होती. प्रवासाला निघण्यापूर्वी व्हिसाबरोबरच प्रकाशन गृहामार्फत एक पत्र मिळायचे. परगावातील हॉटेलच्या मॅनेजरला उद्देशून ते पत्र असायचे. आम्हाला रूबलमध्ये पगार मिळतो व सोविएत नागरिकांप्रमाणे खोलीचे भाडे घ्यावे असा त्यात मजूकर होता. म्हणून आम्ही निश्चिंत होतो.

त्बिलिसीच्या विमानतळावर आम्हाला भेटायला आलेल्या नेल्लीचा व तिच्या धाकट्या बहिणीच्या नवऱ्याचा, लेरीचा चेहरा उतरला होता. हॉटेल बुक करताना तेथील मॅनेजरने त्यांना दम भरला होता की, एका खोलीला एक दिवसाचे ८० रूबल भाडे पडेल. जेव्हा मी पत्र सादर केले तेव्हा मॅनेजरचा चेहरा पडला. मग नेल्ली व लेरीचे चेहरे उजळले. बहुतेक ग्रुझिनांप्रमाणे लेरी मोटार चालविण्यात कुशल आहे. लेरी लोलाश्विली पूर्व ग्रुझियातील होता. नेल्लीच्या धाकट्या बहिणीशी, नाथेलाशी त्याने प्रेमविवाह केला. नाथेला नेल्लीपेक्षा जास्त देखणी. त्यांना गिया नावाचा दहा वर्षांचा मुलगा व माया नावाची चार वर्षांची मुलगी आहे. नेल्ली अजून अविवाहित होती. नेल्लीचे आई-वडील खारेली खेड्यात स्वतःच्या मालकीच्या घरात राहत होते. हे खेडे त्बिलिसीपासून सुमारे

१७५ कि.मी. दूर होते. त्या खेड्याच्या जवळपास स्तालिनचे जन्मगाव गोरी होते.

त्बिलिसीतील दुसऱ्याच दिवशी लेरी व नेल्लीने सुचविले की, खारेलीला राहायला जायचे. माझ्यापाशी त्बिलिसीचा चार दिवसांचा व्हिसा होता. हॉटेलात राहिल्यामुळे आपोआप पोलिस ठाण्यावर नोंद झाली होती. माझ्यापाशी खारेलीचा व्हिसा नव्हता. त्बिलिसीपलीकडे जाणे मना होते. पण लेरीने धुडकावून लावले. लेरी, नेल्ली, तमारा यांचे म्हणणे होते की, खारेलीला जायचे. तेव्हा मी कायदा धाब्यावर बसवून लेरीच्या मोटारीत बसलो. वाटेत कुणीही अडविले नाही. गोरी गावी स्तालिन ज्या घरात जन्मला होता ते घर पाहिले. त्याचे म्युझियम बनविले आहे. या गावात स्तालिनचा पुतळा उभा आहे. क्रुश्चेवच्या काळात ग्रुझिनांनी हा पुतळा पाडू दिला नाही. अनेक मालमोटारींमध्ये ड्रायव्हरांनी स्तालिनचे फोटो लावलेले पाहिले. स्तालिनवर ग्रुझिनांचे प्रेम असणे स्वाभाविक आहे. पण स्तालिनने ग्रुझिनांसाठी खास काही केले नाही.

खारेलीत नेल्लीच्या वडिलांचे घर पाहून आश्चर्य वाटले. चक्क दोन मजली बंगला होता. खाली अंगणात मातीचे मोठमोठे बुधले होते. घरात गाळलेली दारू ठेवण्यासाठी. ग्रुझियात घरोघरी द्राक्षांची दारू गाळतात. दारूबरोबर वोदकाही बनते. जास्त दारू पिण्यामुळे व तिखट खाण्यामुळे ग्रुझिनांना पोटाचे विकार जास्त प्रमाणात आहेत.

नेल्लीची आई शांत, सोज्वळ चेहऱ्याची बाई दिसली. नेल्ली साक्षात पितृमुखी. लादो टोटलाद्झेचे नाक मोठे बाकदार. छोटी माया उत्तेजित बनली होती. घर सधनतेची साक्ष देत होते. फर्निचर उत्तम होते. बिलोरी काचेची झुंबरे होती. कट ग्लासची रेलचेल होती. नेल्ली पियानो वाजवू लागली. जुन्या रशियातील सधन कुटुंबांमधील ही पद्धत अजून शिल्लक राहिलीय. घरात एक उत्तम पियानो असतो. घरातील मुलगी पियानो शिकून घेते.

जेवणासाठी लांबलचक टेबल सजले होते. ग्रुझिनांचे जेवतेवेळी टोस्ट प्रख्यात असतात. हे टोस्ट कसे बोलायचे त्याचे एक शास्त्र आहे. जो संयोजन करतो त्याला 'तमादा' म्हणतात. 'तमादा'ने परवानगी दिली तरच टोस्ट बोलता येतो. सर्वांत प्रथम पाहुण्याच्या माता-पित्यांना उद्देशून टोस्ट असतो. जर ते हयात असतील तर त्यांना आरोग्य चिंतले जाते. हयात नसतील तर त्यांच्या

आत्म्यांना शांती मिळो असे म्हणतात. मात्र या वेळी चषकावर चषक आपटायचा नाही. टोस्टविना चषक उचलायचा नाही असा दंडक असतो. आपोआप मद्यपानावर नियंत्रण घडते. तीन-चार तासपर्यंत जेवण व टोस्ट यांचा कार्यक्रम चालतो.प्रथम प्रथम याची मजा वाटते. नंतर नंतर फार कंटाळा येतो.

नेल्लीच्या घरातील वोदकामध्ये तार्खून नावाच्या गवताचा अर्क मिसळला होता. गडद हिरव्या रंगाचा हा अर्क पेपरमिंटासारखा लागतो. ग्रुझिनांचे जेवण चवदार असते. कोंबडीपासून चखाक बेली नावाचा पदार्थ छान बनवितात. गाजरे किसून त्यात आक्रोडांचे कूट व स्मिताना मिसळतात. ही कोशिंबीर छान लागते. आपल्या नानसारखी रोटी भाजतात. तांबड्या चवळीची भाजी बनवतात. म्हणून तर मॉस्कोत 'आराग्वे' रेस्तराँत भारतीय माणसे आवर्जून जातात. 'चोर्नी डॉक्टर' नावाची तांबडी मदिरा प्यायलो. ही उत्तम मदिरा स्तालिनची आवडती होती म्हणे. सध्या दुर्मिळ आहे.

छोटी माया आजोबांबरोबर मजेने मदिरा पीत होती. ती शिंगामधून मदिरा पीत होती. नक्षीकाम केलेली धातूची पट्टी बसविलेली ही शिंगे ग्रुझियात सूवनीर म्हणून मिळतात.

लादो टोटलाद्झे इंजिनिअर म्हणून काम करीत होते. हे घर त्यांनी स्वतःच बांधले होते. नेल्लीच्या आईने आयुष्यात कधी नोकरी केलेली नव्हती. छोट्या मायाचा प्रतिपाळ आजोबा-आजी प्रेमाने करीत होते. लेरी त्या घरात मजेने वावरत होता. फार दिवसांनी एक सुखी कुटुंब पाहत होतो.

दुसऱ्या दिवशी दोन मोटारी बाहेर निघाल्या. लादो व लेरी मोटारी चालवत होते. ग्रुझियात प्रत्येक घरटी किमान एक मोटार असते. मोटारींचा षौक ग्रुझिनांना व आर्मेनियनांना फार आहे. पेट्रोलची टंचाई कायम असते. शनिवारी-रविवारी पेट्रोलसाठी लांबलचक रांगा. काही वेळा सरकारी मालमोटारींचे ड्रायव्हर काळया भावाने पेट्रोल विकत होते.

बर्झोमी गावी औषधी खनिज पाण्याचे झरे आहेत. म्हणून बर्झोमी खनिज पाण्याच्या बाटल्यांना फार मागणी आहे. डिसेंटरीचा ज्यांना त्रास होतो, त्यांना हे पाणी फार उपयोगी पडते. बर्झोमी प्यायल्यानंतर पोट साफ होते. ह्या पाण्याचा प्रत्यक्ष झरा पाहिला. नंतर बुकुरियानी गाव पाहिले. निसर्गरम्य ग्रुझिया पाहिला. उंच उंच डोंगर, दाट झाडी. खळखळते झरे. काही काळ गोव्याची व कर्नाटकाची

आठवण झाली. शरदाचा मोसम ग्रुझियात देखणा असतो.

लादोने घराभोवती द्राक्षांच्या वेली लावल्या होत्या. त्बिलीसीला परत जाण्याच्या दिवशी त्या वेलींवरील द्राक्षे तोडण्याचा बेत बनला होता. त्या वर्षी फळे भरघोस लगडली होती. हातात कात्री घेऊन मी उत्साहाने द्राक्षे तोडत होतो. शेवटी हाताच्या बोटाला जोरात वेदना झाली. मोठ्यांदा ओरडलो. इतरांना वाटले की, माझे बोट कापले. बोटाला गांधीलमाशी डसली होती. तमाराने तिच्या डंखाच्या जागी अडकलेला तिच्या नांगीचा तुकडा ताबडतोब उपसून काढला व बोटावर मुतायला सांगितले. त्या उपायांमुळे बोट विशेष सुजले नाही. पण रात्री मॉस्कोत पोहोचेपर्यंत बारीक ठणक होती. सर्वांनी माझ्या 'मिलियन डॉलर' बोटाची थट्टा केली.

त्या प्रेमळ कुटुंबाचा निरोप घेणे फार जड वाटले. आदल्या दिवशी माझ्या हातातील चांदीच्या अंगठीबद्दल छोटी माया कुतुहल दाखवत होती. घरातून बाहेर पडताना ती अंगठी तिच्यासाठी म्हणून तिच्या आजीपाशी दिली. म्हटले, काही वर्षांनी ही माया 'द्याद्या' अनिलची म्हणजे अनिल काकाची आठवण काढेल.

खरोखर मायाची आज इंग्रजी पत्रे येतात. बालिका माया आता किशोरी माया बनली आहे. माया हे नाव आपल्या सोयीसाठी मी असे लिहितो. खरा उच्चार माय्या असा आहे.

परतीच्या प्रवासात त्बिलीसीतील नेल्लीच्या डोंगरावरच्या घरात जेवणाची धमाल झाली. डफवादक शेजारी ओतार एव्हाना ओळखीचा झाला होता.

माझ्या नकारांकडे दुर्लक्ष करून नेल्लीने व लेरीने सफरचंदाच्या पिशव्या तमाराच्या हवाली केल्या. म्हणून खास ग्रुझिनांप्रमाणे सामानाने लगडून मॉस्कोत परतलो. ते सामान टॅक्सी स्टँडपर्यंत न्यायला घाम फुटला. तमाराने माझ्या शिव्या मुकाट खाल्ल्या. माझ्या संतापाकडे दुर्लक्ष करण्याची कला तिला अवगत झाली होती.

जुन्या आठवणींना उजाळा देण्यासाठी दोन-तीन वर्षांनंतर त्बिलीसीला पुन्हा धावती सफर केली. नेल्लीचे आईवडील भेटण्यासाठी मुद्दाम आले होते. जास्त थकलेले दिसले. या वेळी माय्या भेटली नाही. गिया जास्त थोराड दिसत होता.

*



# ख-दुःखाची पाठशिवण

तमाराच्या मोठ्या भावाच्या धाकट्या मुलीचे ल्येनाचे लग्न ठरले. हे लग्न यथासांग पार पडले. एका विधीची मौज वाटली. नवरी मुलगी कितपत घर स्वच्छ राखेल याची कसोटी पाहण्याचा तो विधी होता. नवऱ्या मुलीभोवती लोकांनी फेर धरला. गाणी गाता गाता व नाचता नाचता मध्यभागी बशा फरशीवर फेकू लागले. नवरी केरसुणीने फुटके तुकडे भराभर गोळा करू लागली. त्या फुटक्या तुकड्यांवर लोक नाणी व नोटा उधळू लागले.

लग्नाचे जेवण अर्थात शँपेनसह व टोस्टसह झाले. जेवता जेवता एकदम ओरडा झाला 'गोर्का गोर्का' म्हणजे 'कडू कडू' तेव्हा नवरा-नवरी चुंबन घेऊ लागले. म्हणजे चुंबनाने त्यांनी गोडवा निर्माण केला. चुंबन जास्तीत जास्त प्रदीर्घ झाले पाहिजे म्हणून लोक पुन्हा पुन्हा गोर्काचा ओरडा करू लागले. चुंबनाच्या काळात एकपासून दहापर्यंत अंक मोजू लागले.

नवरा-नवरी तरुण होते. दोघांचे पहिलेच लग्न होते म्हणून एकूण वातावरणाला ताजेपणा होता. विवाह प्रासादात सह्या केल्यानंतर त्यांनी एकमेकांच्या बोटांमध्ये अंगठ्या घातल्या. उजव्या हाताच्या करंगळीनजीक अंगठी म्हणजे विवाहित. डाव्या हाताच्या त्याच बोटात अंगठी म्हणजे घटस्फोटित, अशा रशियात खुणा आहेत. ह्या अंगठी समारंभानंतर सजवलेल्या भाड्याच्या मोटारीत नवरा-नवरी व करवला-करवली बसले. ह्या मोटारीच्या टपावर रेशमी फितींनी बांधलेले अंगठीसारखे कडे होते. पुढच्या भागात फितींनी बांधलेली बाहुली होती. 'आत्ताच लग्न झाले आहे' ह्याच्या या

खुणा होत्या.

क्रेमलिन भिंतीनजीकच्या अलेक्सांद्रोवस्की पार्कमधल्या अज्ञात सैनिकाच्या चिरंतन ज्वालेपाशी वंदन करायला वधू-वर गेले. हा मॉस्कोत प्रघात आहे. मग लेनिन टेकडीवर मॉस्को विद्यापीठासमोरच्या जागी गेले. त्या स्थळापासून मॉस्कोचे विहंगम दृश्य दिसते. वर वधूला तेथे मॉस्को दाखवितो. शँपेनचे चषक नाममात्र पिऊन मंडळी घरोघर परततात.

या लग्नानंतर अवघ्या दोन महिन्यांत झेन्या म्हणजे वधूपिता लिव्हरच्या आजाराने वारला. अतिमद्यपानाचा तो बळी ठरला. अनेक रशियन पुरुषांच्या नशिबी असे मरण येते. झेन्याच्या कपाळावरची जखम कायम ओली असायची अश्वत्थाम्याप्रमाणे. माणूस हसरा. सुस्वभावी होता. ज्या घरात लग्नाचा सोहळा नुकताच घडला तेथे अंत्यसंस्कार चालू होते. दफनपेटी आणि दफनाला जाणारे लोक यांना दफनभूमीत नेण्यासाठी एक खास मोटार भाड्याने मिळते. मॉस्कोबाहेर तीस-चाळीस कि.मी. अंतरावर ही दफनभूमी आहे. सपाट मैदानात हजारो क्रूस दिसतात. डी सिकाच्या 'द सनफ्लॉवर' चित्रपटातील दृश्याची आठवण झाली.

प्रेताबरोबर स्मशानात गेलेले लोक मृताच्या घरात जेवतात. ह्याला 'पामिन्की' म्हणतात. मृताच्या आठवणी काढून वोदका पितात. या वेळी चषक एकमेकांवर आपटायचे नसतात.

या मृत्यूनंतर सहा महिन्यांच्या अवधीत तमाराची आई अचानक मरण पावली. सत्तरी ओलांडलेली ही बाई एक दिवस घरात पडली. त्या निमित्ताने शेजाऱ्यांनी तिला इस्पितळात नेऊन ठेवले. सोविएत इस्पितळांमध्ये आजारी म्हाताऱ्या माणसांकडे फारच दुर्लक्ष व्हायचे. नर्सेसची संख्या कमी पडायची. मोफत वैद्यकीय उपचारांना अर्थ नव्हता. तमारा व तान्या सारखी धावपळ करीत होत्या. म्हातारीकडे नर्सेसनी लक्ष द्यावे म्हणून नर्सेसना पैसे चारत होत्या.

खोलीच्या खिडक्या उघड्या ठेवल्यामुळे म्हातारीला थंडी बाधली. न्यूमोनिया मृत्यूचे कारण ठरला. म्हाताऱ्यांना लौकर मारण्याचा हा ठरीव मार्ग होता. महिनाभरात सगळा कारभार आटोपला.

पुढे जे काही पाहिले ते संतापजनक होते. प्रेतागारामधून प्रेत बाहेर काढतेवेळी तेथील लोकांनी पैशांसाठी अडवणूक केली. दर पावली हातांवर

नोटा ठेवाव्या लागत होत्या. प्रेत उचलताना, दफनपेटी खड्ड्यात लोटताना. म्हातारीचे दफन मुलाच्या थडग्याच्या परिसरात घडले. तमाराने दफनाच्या जागेचे पैसे भरले होते. अशा जागा नंतर आरक्षित करून ठेवतात. म्हणजे एका पेटीवर दुसऱ्या पेटीची जागा रिकामी असते. ती रिकामी जागा तमाराने स्वतःसाठी भावी काळासाठी आरक्षित करून ठेवली. म्हातारीच्या प्रत्येक वर्षदिनाला तमारा दफनभूमीत जायची. आईच्या थडग्यापाशी खाद्यपदार्थ ठेवून यायची. आसपासचे तण तोडून जागा स्वच्छ करायची. आई मेल्यानंतर हे विधी मनःपूर्वक करायची. पण आई जिवंत असताना तिने आईकडे दुर्लक्ष केले होते. माफक पेन्शन असूनही तिच्या आईने तमारासाठी व तिन्ही नातींसाठी काही रकमा बँकेत ठेवलेल्या होत्या. सारे काही रीतसर केले. तमाराची आई मूळची जमीनदार घराण्यातील होती. तिच्या भावांना स्तालिनच्या कम्युनिस्टांनी क्रूरपणे ठार मारले.

मॉस्कोतील आमचे जीवन ठीक चालले होते. माझी कामाची आघाडी ठीक होती. एक नवीन मराठी कुटुंब आले होते. श्री. अरविंद व सौ. रजनी डबीर, मूळचे नागपूरचे. त्यांच्याकडे विजय पाध्ये व शेखर परांजपे या जोडीची ओळख झाली. हे दोघे रशियाला वेगवेगळ्या प्रकारच्या बॅटरीज विकत होते. विजय पूर्वी पुण्यात असताना मला ओळखत होता. मॉस्कोतील 'कॉसमॉस' हॉटेलात दोघे ओझरते दिसायचे. नंतर डबीरांच्या घरी घनिष्ट ओळख झाली.

'थरमॅक्स'चा रेसिडेंट मॅनेजर डॉ. गगन पटवर्धन मॉस्कोत परत स्थायिक झाला. गगन व त्याची बायको प्रतिभा हे पूर्वी मॉस्कोतील लुमुंबा विद्यापीठाचे विद्यार्थी होते. शिकताना दोघांना प्रेमाची बाधा झाली. भारतात लग्न करून दोघांनी मॉस्कोत शिक्षण पूर्ण केले. फार छान, एकमेकांना अनुरूप असणारे जोडपे आहे. शिक्षणानंतर गगन पुण्याच्या 'थरमॅक्स' मध्ये नोकरीला लागला. स्वतःच्या कर्तबगारीवर वरच्या पदी चढला. एका निर्यात कंपनीचा तो एक भागीदार आहे. प्रतिभा पुण्यात डॉक्टरी करते. डोळयांदेखत उत्तम विकास घडलेले हे जोडपे आहे. सतत हसणे व काम करणे गगनला जमते. प्रतिभासुद्धा कायम शांत स्वभावाची.

विजय, शेखर, अरविंद आणि मी यांच्यामुळे 'कॉसमॉस' हॉटेलातील सौना कधी कधी मराठी शब्दांनी दणाणून जायचा.

वरकरणी आयुष्य ठीक वाटायचे. संध्याकाळच्या वेळा कशा घालवाव्यात हा प्रश्न नेहमी पडायचा. आरंभीच्या वर्षांमध्ये उत्साहाने नाटके पाहायला जात होतो. भिकार नाट्यगृहे व तिकिटांची टंचाई यामुळे तो उत्साह लौकरच ओसरला. मग घरात टी.व्ही. समोर बसायचे. दिवसभर अभ्यासिकेत काम करीत बसायचे. संध्याकाळभर हॉलमध्ये टी.व्ही. बघायचा. म्हणजे दिवसाचे २२ तास मी घरात असायचो. दोन तास जवळच्या पार्कमध्ये किंवा स्टेडियमवर फिरायचो. व्यायामाच्या अभावी माझ्या सांध्यांमध्ये क्षार साचले. अंगातून घाम जात नव्हता. अतिथंड प्रदेशात सांधेदुखीचा आजार जडतो. पाठ आणि उजवा हात खूप दुखत. त्यांना मसाज करण्यासाठी तमाराने एका मध्यमवयीन बाईला आणले. गालीना आमच्या समोर राहणाऱ्या मास्तरणीला असाच मसाज करायची. तिच्या मसाजांचा काही काळ उपयोग झाला. गालीनापाशी अतिंद्रिय शक्ती होती. तिच्या पंजांमध्ये अद्‌भुत शक्ती होती. शरीरापासून पंजे दूर धरून रक्ताभिसरणावर परिणाम करू शकायची. देवाच्या प्रार्थना म्हणायची. त्या वेळी मी नास्तिक होतो. लहानपणापासून दादांनी मला कट्टर नास्तिक बनविला होता. कधी कधी संकटकाळी मला वाटायचे, आपल्याला एखादे श्रद्धास्थान असते तर बरे झाले असते. अनिश्चिततेपायी मन निराशेच्या टोकाला जायचे. रशियात मन रमत नव्हते. भारतात नीट निवारा नव्हता. आयुष्याची पुढील वाट दिसत नव्हती. सारे धूसर होते. जीवन कुठेतरी लोटले जात होते. पुस्तके प्रकाशित होत होती हे खरे.

त्यांच्या खपाची व्यवस्था करणारी प्रचंड यंत्रणा होती. कधीतरी एखाद्या वाचकाचे पत्र यायचे. पत्रातील भाषेवरून त्याची पातळी कोणती आहे हे समजायचे. मी कम्युनिस्ट नव्हतो म्हणून कम्युनिस्टांना माझ्याबद्दल राग. कम्युनिस्टांसाठी काम करीत होतो म्हणून प्रस्थापित माझ्या पुस्तकांना नाके मुरडीत होते. खरोखर दोन्ही घरचा पाहुणा होतो. दोन्ही देशांमध्ये सुखी नव्हतो. या अधांतरी मनःस्थितीचे झोपेवर परिणाम होत. त्या जोडीला दुःस्वप्ने पाठपुरावा करायची. रिकामा वेळ जावा म्हणून प्रवास करायचा.

एके दिवशी तमाराची एक आर्मेनियन मैत्रीण आमच्याकडे आली. लारीसा दावत्यान कृश शरीरयष्टीची, पण हसतमुख होती. तिच्यासोबत तिची भावजय आईदा आली होती. अगदी लॉरेल-हार्डीची जोडी. दोघी येरेवानमध्ये प्राथमिक

शाळेत शिक्षिका होत्या. दिलखुलास गप्पा जमल्या. त्यांनी सोबत आणलेल्या विख्यात आर्मेनियन कन्याकचे घुटके घेतले. मी माझी आवडती 'डनहिल' सिगारेट त्यांच्यापुढे धरली. लारीसाने नकार दिला. दुसऱ्या दिवशी समजले की, ती खरोखर धूम्रपान करायची. लाजेपायी तिने सिगारेट नाकारली. परदेशी सिगारेट ओढायची संधी गमावल्याबद्दल आईदाला हळहळ वाटली. आईदाने हे तिच्या मोठ्या आवाजात मोकळेपणाने सांगितले. मग मी लाराला नाव दिले 'हितराया लारा' म्हणजे 'धूर्त लारा'. नंतर नंतर हे नाव रूढ झाले. खुद्द लारा फोनवर बोलायची, "हितराया बोलतेय." त्या दोघींनी आम्हाला येरेवानचे निमंत्रण दिले. ऑक्टोबर महिन्यात आर्मेनियात हवा सुरेख असते म्हणे. आम्ही तात्काळ आर्मेनियाकडे विमानाने निघालो.

*

# आर्मेनिया

आरारात पर्वताच्या आसपास आर्मेनियाचा प्रदेश आहे. हिमाच्छादित पर्वतशिखरापलीकडे तुर्कस्तान आहे. काही सीमाप्रांत इराणच्या आसपास आहे. बाकदार नाकांचे, काळ्या व बदामी रंगांच्या डोळ्यांचे अतिउत्साही आर्मेनियन लोक जगभर पसरलेत. मुंबई, मद्रास व कलकत्ता या शहरांमध्ये आर्मेनियन चर्च आहे. सतत आक्रमणे, सतत मानवसंहार घडूनही आर्मेनियन संस्कृती टिकून आहे. आर्मेनियन लोकांना स्वतःच्या इतिहासाचा फार अभिमान. नव्या पिढीच्या मनात हा इतिहास प्रयत्नपूर्वक जागता ठेवला जातो. येरेवान शहर आर्मेनियाची राजधानी.

मॉस्कोपासून अडीच हजार कि. मी. अंतरावर येरेवान वसलेय. अडीच ते तीन तासांचा विमान प्रवास. दावत्यान कुटुंब आमच्या स्वागताला विमानतळावर आले. 'द्विन' हॉटेलात खोल्या बुक झालेल्या होत्या. त्याबद्दल एडिक व लारा नाराज झाले होते. मी त्यांची कशीबशी समजूत पटविली. लाराचा नवरा एडिक प्रथमदर्शनी धीरगंभीर वाटला. वोल्गा मोटार चालवताना तो रुबाबदार दिसत होता. पण त्याच संध्याकाळी त्यांच्या घरात जेवणाच्या टेबलाशी भरपूर मद्यपानानंतर एडिकचा चेहरा बालिश, मिस्कील दिसू लागला.

दावत्यान कुटुंबाचे दोन मजली जुने दगडी घर. त्यांच्या घराची गल्ली पाहताच मला माझ्या लहानपणीचे कोल्हापूर आठवले. तशीच बैठी दगडी घरे. तसेच धुळकट छोटे रस्ते. एडिकच्या वडिलांनी— दाविद यांनी उघड्या गच्चीत शाश्लिक भाजले. एडिकची आई सेदा स्वयंपाकाची लगबग करीत होती. लारा

आमची सरबराई करीत होती. छोटा आर्मान व त्याच्यापेक्षा जरा मोठा कॉन्स्तान्तिन मारामारी करण्यात गुंतले होते. ते कौटुंबिक दृश्य पाहून मनाला छान वाटले. जेवायच्या वेळी सबंध गल्लीतील घरांमधील माणसे हजर झाली. जिवंत भारतीय माणसाला पाहण्यासाठी. अशा प्रकारचे सौहार्द कित्येक वर्षांनंतर पाहायला मिळाले. जॉर्जियन लोक असेच अतिथीप्रेमी आहेत. पण आर्मेनियनांचे प्रेम जास्त दाट जाणवते. आर्मेनियन भाषेत 'छेः छेः' शब्द आहे. अर्थ मराठीसारखाच आहे. लिपी आपल्या दक्षिण भारतीय लिपीप्रमाणे कडबोळ्यांसारखी दिसते. प्रेमाखातर नावाच्या शेवटी 'जान' जोडतात. लौकरच मी सर्वांचा 'अनिलजान' बनलो. मोकळ्या वागण्याला मोकळा प्रतिसाद मिळाला.

दुसऱ्याच दिवशी आईदा तिच्या नवऱ्यासह व मुलीसह आली. राझमिकचे व्यक्तिमत्त्व आपले हिंदी नट श्री. के. एन. सिंग यांच्याप्रमाणे हुबेहूब आहे. नारीनेचे टपोरे डोळे नजरेत भरण्यासारखे आहेत. येरेवानच्या आसपासच्या प्रेक्षणीय स्थळांची यात्रा सुरू झाली. एचमियाझ्दिन येथील प्रार्थनामंदिरांचा समूह. तमारा साडी नेसून आली होती. तिने नारीनेलासुद्धा साडी नेसवली. फोटो वगैरे झाले. आईदा भोवतीच्या लोकांना थापा मारीत होती, 'हे त्या मुलीचे लक्षाधीश आईबाप आहेत.'

गार्नी मंदिर आणि गेहार्द मठ डोंगराळ भागात आहेत. दोन्ही स्थळे प्राचीन. आसमंत अत्यंत रमणीय. मोटारीचे सारथ्य एडिक करीत होता. फिरता फिरता भुका लागल्या. रस्त्याच्या कडेला 'लवाश' विकत होते. हे 'लवाश' म्हणजे प्रचंड चपात्या. तुर्की सीमेनजीक एका रेस्तराँमध्ये चवदार शाश्लिक मिळतात अशी चर्चा सुरू झाली. बोलण्यांच्या नादात एडिकने रहदारी नियमाचा भंग केला. पोलिसाने शिटी मारली. एडिक मोटारीतून उतरून पोलिसांच्या गाडीपर्यंत चालत गेला. लौकरच तो परत आला.

आमची मोटार पुढे निघाली. पण मोटारीतील पोलिसाने हातातील दंडुक्याने खूण केली 'आमच्या पाठोपाठ या.' सर्वांना या नव्या लचांडाची चिंता वाटू लागली. एडिक मुकाट पोलिसांच्या गाडीपाठोपाठ जात होता. अर्धा-पाऊण तासपर्यंत सस्पेन्स चालू होता.

शेवटी एका खेड्यातील पोलिस चौकीपाशी आम्ही थांबलो. प्रथम एडिक

चौकीत गेला. आम्ही सारे मोटारीत बसून होतो. मी, तमारा, लारा व दोन मुले. सर्वांचे चेहरे भुकेने व चिंतेने उतरले होते. वीस-पंचवीस मिनिटांनी लारा व तमारा चौकीत गेल्या. आणखी अर्ध्या तासानंतर मला पाचारण करण्यात आले.

एडिकने सगळा गोंधळ केलेला होता. काही महिन्यांपूर्वी त्याने अपघात केलेला होता. त्या वेळी त्याचा परवाना जप्त झाला होता. आज तो परवान्याविना मोटार चालवत होता. प्रथम पोलिसाने त्याला पकडले होते तेव्हा त्याने लौकर सुटावे या हेतूने सांगितले होते की, "माझ्याबरोबर माझा भारतीय मित्र आहे." नंतरच्या पाच मिनिटांत दुसऱ्या पोलिस अधिकाऱ्याच्या लक्षात आले की, त्या सीमाप्रदेशात परदेशी लोकांना संचार करण्यास मनाई होती. म्हणून 'पाठोपाठ या' अशी खूण केली व चौकशीसाठी चौकीत आणले होते. ठरीव प्रश्नोत्तरे झाली. तेथील के. जी. बी. कप्तानाने येरेवानच्या 'द्विन' हॉटेलात माझ्या दस्तऐवजांबद्दल चौकशी केली. के. जी. बी. म्हणजे 'कमितेत गसूदारस्त्वेन्निय बेझअपानस्त' म्हणजे सरकारी सुरक्षा समिती. त्याने मला केवळ ताकीद दिली. पण एडिक अडकला होता.

त्या वेळी भारतीय अंतराळवीर राकेश शर्मा सोविएत अंतराळवीराबरोबर अंतरीक्षात भ्रमण करीत होता. म्हणून कप्तानाने सोविएत-भारत मैत्रीची पोपटपंची केली. परतीच्या प्रवासात थेट येरेवानच्या वेशीपर्यंत पोलिसांच्या गाडीने सोबत केली.

या प्रसंगामुळे एडिकचा उत्साह कमी झाला नाही. दुसऱ्या दिवशी सेवान सरोवरापर्यंतची सहल आयोजित झाली होती. गल्लीतील सहा-सात झिगुली मोटारी जय्यत होत्या. मात्र एडिकला सारथीपद दिले नव्हते. सर्वांत उत्तम चक्रधराच्या मोटारीत मला व तमाराला बसविण्यात आले. आज तमारा पश्चिमी वेषात होती. सेवान सरोवर येरेवानपासून तीन तासांच्या मोटारप्रवासाच्या अंतरावर आहे. सरोवर फार रम्य आहे. त्याच्या किनारी एक सुंदर रेस्तराँ होते. आमचा कंपू किमान १५-२० माणसांचा होता. सर्व काही पूर्वनियोजित सुरळीत चालले होते. मॉस्को आणि येरेवान यांच्यातील जमीन-अस्मानाचा फरक जाणवत होता.

ज्या क्षणी सेवान सरोवरापाशी आलो त्याच क्षणी हलक्या हिमवर्षावाला आरंभ झाला. ते दृश्य अविस्मरणीय होते. भोवती डोंगर. सेवान सरोवराचे

निळेशार पाणी. शुभ्रधवल तरंगणारे हिमकण. हास्यकल्लोळात जेवण सुरू झाले. अर्थात मद्यपानही. मात्र मोटारी चालवणारे अजिबात पीत नव्हते. हा नियम सोविएत संघात कडक पाळतात. जर पोलिसाच्या ताब्यात सापडलात तर परवाना तात्काळ जातो. पुन्हा लवकर मिळत नाही. टोस्टची धमाल चालू झाली. मी बोलता बोलता रडू लागलो. तसे का झाले मला समजेना. कदाचित मद्याचा परिणाम झाला असेल किंवा फारा वर्षांत असा निरपेक्ष जिव्हाळा लाभला म्हणून असेल. सोबतीच्या आर्मेनियन तरुणांनी समजून घेतले. नाच सुरू झाले. तमाराने चक्क टेबलावर टॅप डान्स केला. मग आर्मेनियन पद्धतीचे नृत्य सुरू केले. सेवानहून येरवानला परतल्यावर आईदाने स्वतःच्या घरात जेवणाचा कार्यक्रम केला. क्यूफ्ता नावाचा मटणाचा चवदार पदार्थ बनविला. ह्या रशियन, जॉर्जियन, आर्मेनियन बायका स्वयंपाक बनविण्यात पटाईत आहेत. सहलीत धावपळ करतात, मद्य पितात, नाचतात. तरीही हसऱ्या चेहऱ्याने जेवण देतात. मोलकरीण हा शब्द त्यांच्या शब्दकोशात नाही.

नंतरचे चार दिवस कावकास्यान रस्त्यावरच्या प्रत्येक घरात जेवणांची मैफल चालू होती. विमानतळावर आम्हाला निरोप देण्यासाठी पाच मोटारींमधून पंचवीस माणसे आली होती.

नंतर मॉस्कोत फार उदास वाटले. वातावरणात फरक फार मोठा. दावत्यान कुटुंबाने अजूनपर्यंत मैत्री घट्ट ठेवलीय. त्यांच्यामार्फत इतरांचे नमस्कार येतात.

दोन-तीन वर्षांनंतर येरेवानला परत फेरी मारली. आर्मेनियाचा आणखी मुलुख पाहिला. लेनिनाकान गाव पाहिले.

*

# मॉस्कोतील गोर्की फिल्म स्टुडिओ

हाल्तुरिन्स्काया रस्त्यावरच्या घरात राहून नऊ-दहा वर्षांचा काळ लोटला. अजूनही शेजारच्या रशियन कुटुंबांनी विशेष ओळख वाढवली नव्हती. मी कुणाकडे जात नव्हतो. कुणी माझ्याकडे येत नव्हते. सारा मामला दुरून चालला होता. अर्थात सारे मला ओळखत होते. कारण त्या घरात मी एकटाच परदेशी होतो. एवढेच नव्हे, तर सबंध रस्त्यावर मी एकटा परदेशी राहत होतो.

एक दिवस दहाव्या मजल्यावरच्या गिल्या हुसैनोवने स्वतःच्या फ्लॅटमध्ये आम्हा दोघांना आमंत्रित केले. हा हुसैनोव तातार मुसलमान. त्याची बायको ल्यूबा रशियन. हुसैनोव एकेकाळी फूटबॉल खेळाडू होता. अनेक शहरांमध्ये व देशांमध्ये फूटबॉलचे सामने खेळला. हा नामवंत खेळाडू आता उपेक्षित जीवन जगतोय. वयोमानानुसार त्याचे खेळणे कमी झाले. पण अजून चपळ वावरत होता. जुन्या आठवणींवर जगत होता. तो बोलत असताना त्याच्या पावलांची हालचाल विशेष पाहण्याजोगी होती. अगदी कॅमेरा त्या पावलांवर रोखावा असे मला वाटले.

हुसैनोवला तमारा ओळखत होती. तिची ल्यूबाशी ओळख झाली म्हणून त्या दिवशी जेवणाचे निमंत्रण होते. निमित्त होते ल्यूबाचा वाढदिवस. भेटवस्तू आणि शँपेनच्या बाटलीसह आम्ही त्यांच्याकडे गेलो. घरात काळ्या रंगाचा छोटा केसाळ कुत्रा होता. जाझिक गिल्याचा लाडका होता. गिल्याला जाझ संगीत ऐकण्याची आवड होती म्हणून कुत्र्याचे नाव ठेवले होते जाझिक.

गिल्यापाशी जाझ संगीताच्या अनेक रेकॉर्ड होत्या. परदेश दौऱ्यांवरून त्याने त्या आणल्या होत्या. ती सारी संध्याकाळ वोदकाच्या आणि संगीताच्या धुंदीत गिल्या होता. बोलण्यातून समजले, एका शोकात्मक अपघातामुळे ह्या प्रेमळ जोडप्याची तीन वर्षांची मुलगी ठार झाली होती. उंच इमारतीमधल्या अपार्टमेंटच्या उघड्या खिडकीतून ती मुलगी खाली कोसळली होती. हा उल्लेख दोघांनी हळू आवाजात केला. त्यावर रडारड घडली नाही. जाझिकवर दोघे अपत्यवत प्रेम करीत होते. जाझिकने अनेक स्पर्धांमध्ये पदके मिळविली होती.

त्या दिवसानंतर गिल्याशी ओळख वाढली. तो अधूनमधून शाळकरी मुलांना फूटबॉलच्या खेळाचे प्रशिक्षण देत होता. पण स्वारीच्या तोंडाला वोदकाचा कायम भपकारा असायचा. एकदा जेव्हा त्याला समजले की, माझ्या फ्रीजमध्ये वोदकाची बाटली नेहमी उभी असते आणि मी इंग्लिश सिगारेट्स ओढतो तेव्हापासून त्याच्या माझ्याकडे वारंवार चकरा सुरू झाल्या. शेवटी तमाराने त्याला आवरले. बायकोला ह्या गोष्टी जमतात.

एका नववर्षाच्या पूर्वसंध्येला गिल्याकडे जेवण होते. ल्यूबाची एक मैत्रीण आली होती. चाळीशीची ती बाई मॉस्कोतील गोर्की फिल्म स्टुडिओत साहाय्यक दिग्दर्शिका होती. मुलांसाठी चित्रपट निर्माण करणे ही त्या स्टुडिओची ख्याती आहे. लौकरच एका वैज्ञानिक अजबकथेवर नव्या चित्रपटाचे चित्रीकरण होणार होते. त्यात एका भारतीय शास्त्रज्ञाची व्यक्तिरेखा होती. म्हणून त्या सहदिग्दर्शिकेने मला विचारणा केली. माझ्यापाशी वेळ मोकळा होता.

म्हणून ठरविल्याप्रमाणे गोर्की स्टुडिओतून फोन आला. दिग्दर्शकाने माझ्या हाती पटकथा-संवादांची झेरॉक्स कॉपी दिली. माझ्यासाठी जोधपुरी पद्धतीचा कोट शिवण्यास वेषभूषाकाराला सांगितले. चित्रपटाचे नाव होते 'सेम स्तीखिय' म्हणजे 'सात महाभूते'.

माझ्या वाट्याला चार-पाच सीन होते. पण महत्त्वाचे होते. मूळ कथेला कलाटणी देणारे. वाचनाच्या तालमी सुरू झाल्या. चित्रपटाची नायिका मॉस्कोतील नाट्य अभिनेत्री होती. नायक लात्वियन प्रजासत्ताकाची राजधानी रीगा ह्या शहरातील होता. बाकी कलाकार मॉस्कोतील रशियन नट होते.

रशियन नट विशेष बोलले नाहीत. फक्त लात्वियन नट गप्पा मारायचा.

दिग्दर्शकही मनमिळावू तरुण होता. त्याच्या दोन साहाय्यिका मनमोकळ्या बायका होत्या. एकूण युनिट छान होते.

मॉस्कोपासून दीड तासाच्या मोटार प्रवासाच्या अंतरावर असलेल्या एका उपनगरात शूटिंग ठरले होते. स्टुडिओची बस आम्हाला तेथे घेऊन गेली. समूहदृश्यासाठी काही आफ्रिकी व कोरीयन विद्यार्थी होते.

गावातील सांस्कृतिक प्रासादाच्या इमारतीमधील हॉलमध्ये चित्रीकरण होणार होते. आम्ही आपापल्या खोल्यांमध्ये विश्रांतीसाठी बसलो होतो. मी एकटाच बसलो होतो. तेवढ्यात एक साहाय्यक दिग्दर्शिका तेथे आली आणि 'बाहेर पडू नको' अशी ताकीद देऊन गेली. नंतर समजले की, त्या गावातील के. जी. बी. च्या माणसांनी परदेशी विद्यार्थ्यांना मॉस्कोला ताबडतोब धाडले होते. कारण त्या गावात परकीयांना मज्जाव होता. त्या विद्यार्थ्यांचे चित्रीकरण त्या दिवशी नव्हते. पण माझे प्रामुख्याने काम होते. म्हणून मला तात्पुरते दडवून ठेवले होते. नंतर बाहेरच्या एकाही व्यक्तीला चित्रीकरण स्थळी येऊ देत नव्हते.

खूप वर्षांनंतर माझ्यातील नट संचारला होता. कॅमेरा आणि लाईटस पाहून मला स्फुरण चढले होते. भराभर 'टेक' होत होते. दिग्दर्शक खूष होता. चित्रपट रंगीत होता. मला मेकअपची गरज नव्हती असे रंगभूषाकाराचे मत होते. दाढी-मिशांची भानगड नव्हती. रशियन शास्त्रज्ञाच्या एका प्रयोगाला भारतीय शास्त्रज्ञ प्रथम विरोध करतो. नंतर खात्री पटल्यानंतर पुष्टी देतो. सुमारे दीड आठवडाभर शूटिंग चालले होते. बाह्यचित्रण क्रिमियात होते. तेथे माझे काम नव्हते. चित्रीकरण संपल्यानंतर गोर्की स्टुडिओच्या लोकांनी दीडपट पैसे जास्त दिले. जेव्हा चित्रपट सिनेमा थिएटरांमध्ये प्रकाशित झाला तेव्हा चांगला चालला. श्रेयनामावलीत माझे नाव ठळक होते. तमाराच्या मैत्रिणीच्या मुलाने तो चित्रपट पाच वेळा पाहिला. ह्यानंतर चित्रपटात काम करणे घडलेच नाही. परदेशी असल्यामुळे वाव सीमित होता. खरे तर विशेष हौस उरली नव्हती. रशियात चित्रपटांमधल्या भूमिका सीमित होत्या. भारतात मला कुणी काम देत नव्हते.

या दरम्यान मित्रांची आयुष्ये बदलली होती. इगरच्या तिसऱ्या बायकोने त्याला घटस्फोट दिला होता. त्याला खूपच मनस्ताप झाला होता. पण सवयीप्रमाणे एका ज्यू तरुणीच्या प्रेमात पडला होता. ह्या ओल्गाचे अजून लग्न

झाले नव्हते. इगरला मी बजावले, “तुला मुलांची एवढी आवड आहे तर आधी स्वतःचे मूल निर्माण कर. मगच लग्नाचा विचार कर.” आश्चर्य म्हणजे इगर खरोखरीच असे वागला. त्याच्या लग्नात त्याची चौथी बायको मोठे पोट घेऊन वावरत होती.

मूल न होण्याच्या प्रश्नावरून ल्यूदाने वित्तरला घटस्फोट दिला. दुसऱ्या एका सापत्य घटस्फोटित तरुणाशी तिने लग्न केले. वित्तर एकटा पडला. त्याच्या ताब्यातून अपार्टमेंट गेले. त्यांच्या अपार्टमेंटची विभागणी घडली. योग्य काळात ल्युदाला निरोगी मुलगी झाली. वित्तर दोषी ठरला होता. त्याने नोकरीचे ठिकाण बदलले. त्याचा स्वर जास्त चढा वाटू लागला. त्याच्या ‘ल्यूबोवनित्सा’च्या घरी तो राहू लागला. चार-पाच वर्षांनंतर त्याने मारीयाशी म्हणजे ‘ल्यूबोवनित्सा’शी लग्न केले. मरीना अद्याप एकटीच होती. म्हाताऱ्या आईला व नोकरीला सांभाळत होती. सोविएत संघातील वैवाहिक जीवनाची एकूण कल्पना यावी म्हणून ही उदाहरणे एवढ्या विस्ताराने दिली आहेत. ‘मीच प्रथम घटस्फोट दिला’ अशी प्रौढी बहुतेक स्त्रिया मारतात. काहीवेळा सकारण, काहीवेळा विनाकारण वा निष्कारण. नंतर मात्र पूर्ण सुखी कुणीही होत नाही.

‘एअर इंडिया’तील फ्लाईट इंजिनिअर दिलीप बर्वे आणि डिस्पॅच मॅनेजर राजन शिरूर हे दोन नवे मराठी मित्र बनले. दिलीप नाटकवेडा आहे. मराठा तितुका मेळवावा हे आपले तत्त्व !

*

# रशियन धर्तीची विश्रांती

सोविएत संघात नोकरी करणाऱ्या व्यक्तीला वर्षातून चोवीस दिवसांची भरपगारी रजा मिळते. ह्या चोवीस दिवसांमध्ये लोक हमखास परगावी जातात. समुद्रकिनाऱ्याच्या एखाद्या रम्य स्थळी किंवा डोंगरगावी. कॉकेशसमध्ये काळ्या सागरतीरी जाण्याची प्रथा पूर्वी होती. पण आता दक्षिणेत विश्रांतीसाठी जाणे खेडवळपणाचे मानतात. बाल्तिकमध्ये विश्रांतीसाठी जाणे हे उच्चभ्रूतेचे लक्षण. लात्विया, एस्तोनिया, लिथुआनिया ही बाल्तिक प्रजासत्ताके. बाल्तिक सागर जरा जास्त थंड. तेथे जून-जुलैत विश्रांती घेणे चांगले. काळ्या सागरावर उबदार हवामान आहे. तेथे जून ते ऑक्टोबर विश्रांती घेता येते.

सुट्टी व विश्रांती घेण्याबाबत रशियन माणसे काटेकोर. शनिवारी-रविवारी कुणी काम करत नाही. सागरतीरावर गेल्यानंतर तेथे दिवसभर वाळूत लोळायचे. उगीच 'ल्ह्या ल्ह्या' करीत पोराबाळांसह गावोगाव फिरत नाहीत. विश्रांती म्हणजे खरोखरीची विश्रांती. वेळच्या वेळी जेवण, झोप, पोहणे, खेळणे वगैरे चालते. सरकारी विश्रामगृहे असतात. तेथील 'पूत्योवका' म्हणजे 'व्हाऊचर' ट्रेड युनियना स्वस्त देतात. पण ही 'व्हाऊचर' केवळ सुदैवी माणसांना मिळतात. परदेशी लोकांसाठी दामदुप्पट दर असतात. म्हणून माझ्यासाठी आणि तमारासाठी ही दामदुप्पट दराने 'पूत्योवका' मी दरवर्षी विकत घेत होतो. दक्षिणेत पिचुंदा येथे एकदा 'पूत्योवका' मिळाला. प्रथम प्रथम रशियन धर्तीने भरपूर आराम करणे मला जमेना.

पोहता येत नव्हते. उन्हात करपून घेणे मानवेना. मग सावलीतल्या बारमध्ये

बैठक टाकायची. किनाऱ्यावरच्या सुंदर तरुणींना पाहून डोळे शेकायचे. दुपारी तमाराबरोबर जेवण आणि संध्याकाळी किनाऱ्यावर रपेट. वेगवेगळ्या लोकांची ओळख करून घेण्याची तमाराला सवय होती. त्या लोकांना बरोबर घेऊन ती माझ्यापाशी यायची. मग मावळतीनंतर सर्वांचे मद्यपान घडायचे. संध्याकाळचे जेवण आठ वाजताच. जेवणानंतर अकरापर्यंत बार किंवा नाच आणि संगीत. हा असा कार्यक्रम अठरा दिवसपर्यंत चालायचा.

कधी पिचुंदाच्या जवळपास असलेल्या डोंगरातील रित्सा सरोवरापाशी दिवसा सहल जायची. कधी सुखुमी गावच्या मर्कटालयाला पाहायला जायचे. कधी क्रास्नादोरच्या चहापानगृहात. क्रान्सादोरचा चहा विख्यात आहे. चहाच्या मळ्यातच लाकडी ओंडक्यांचे चहापानगृह आहे. मोठमोठ्या समोवारांमध्ये पाणी उकळत ठेवतात. समोवार म्हणजे रशियन धर्तीची नळाची तोटी असलेली पाणी तापविण्याची धातूची किटली. त्या चहागृहात काळ्या चहाबरोबर वेगवेगळ्या रानफळांचे मुरंबे देतात. चहाबरोबर चमच्याने मुरंबा खाण्याची रशियन तऱ्हा आहे. किंवा चॉकलेट वा टॉफी खातात. काही बायका लिमलेटच्या गोळ्या चोखतात. नुसता चहा त्यांना जात नाही. दुधासकट चहा म्हणजे त्यांना नवल आहे.

विश्रामस्थळी तरुण-तरुणींची किंवा मध्यमवयीन स्त्री-पुरुषांची प्रेमप्रकरणे जमतात, एका बाईने मला स्पष्ट सांगितले, "वर्षभर ऑफिसच्या आणि घरकामाच्या रगाड्यात अडकून असते. प्रेम करायला सवड असते कधी ? म्हणून सुट्टीवर आल्यावर एखादा छान जोडीदार शोधते."

ह्या विश्रामस्थळांना तऱ्हेतऱ्हेची माणसे भेटली. केवळ परदेशी कपड्यांचा काळा बाजार करणारी युक्रेनी तरुणी आम्हाला भेटली. एकेक सुटकेस भरून परदेशी कपडे विकायची. पोलंड व जर्मनी येथून येणाऱ्या प्रवाशांकडून कपडे विकत घ्यायची आणि दामदुप्पट भावाने दूरदूरच्या गावांमधल्या ओळखीच्या लोकांना विकायची. तिने मला विचारणा केली तेव्हा मी ताबडतोब हात वर केले. शहाण्याने रशियनांशी असे व्यवहार करू नयेत. शिवाय मला असल्या उद्योगांमध्ये स्वारस्य नव्हते. माझ्या कायदेशीर व्यवसायात भरपूर पैसे मिळत होते. मग ही लफडी कशाला ? जिन कशी प्यायची एवढेच तिला शिकविले. तिचा बॉय फ्रेंड पूर्वी के. जी. बी. मध्ये होता. त्या दोघांना आमच्या खोलीत

येण्यास स्थानिक अधिकाऱ्यांनी मनाई केली. खरे खोटे कोण जाणे ! पण अचानक तो येण्याचे थांबला. दिलखुलास वातावरणाची टंचाई. रशियात इतर टंचाईबरोबर ही आणखी एक टंचाई.

असेच कपड्यांचे उद्योग करणारी मारीया नावाची पोलीश बाई भेटली. बोलायला आणि दिसायला प्रसन्न.

तैवानमध्ये तेरा महिने बंदिवास भोगलेला रशियन बोटीचा एक कप्तान क्रिमियातील मिसखोर या स्थळी भेटला. त्याची कहाणी चित्तथरारक होती. केवळ सुदैवाने तो चिन्यांच्या कैदेतून सुटला होता. क्रिमियात खाशा सरकारी पाहुण्यांच्या विश्रामगृहात तो राहत होता. कोणे एके काळी कलकत्ता बंदरात गेला होता. म्हणून त्याला भारतीयांबद्दल आपुलकी. त्याच्या विश्रामगृहात खाण्यापिण्याची सरबराई होती. सोविएत संघात हे भेद ठळकपणे दिसतात. समता हा केवळ पोकळ प्रचार. सर्वसामान्य लोकांसाठी अतिसामान्य विश्रामगृहे असतात. जेवण भिकार असते. युक्रेन  सॅनिटोरियममध्ये आम्ही राहिलो होतो. इमारत भव्य होती. परिसर रमणीय होता. कॉकेशसपेक्षा क्रिमियाची हवा व निसर्ग जास्त चांगले. या सॅनिटोरियममध्ये आपले माजी राजदूत श्री. के. पी. एस. मेनन राहिले होते म्हणे. मला मसाज करणाऱ्या नर्सने ही आठवण सांगितली. का. पे. शा. मेनोन तेथे अजूनही लोकप्रिय आहेत.

ॲडलरला परत गेलो. पण खाजगी घरात खोली घेतली नाही. ॲडलरच्या विश्रामगृहांच्या प्रचंड इमारतीत राहिलो. ठरलेल्या दिवशी व ठरलेल्या वेळी खोली मिळेना. तक्रारीसाठी ॲडमिनिस्ट्रेटरकडे गेलो. त्याचा पत्रकार मित्र खोली लवकर सोडत नव्हता. मी भारतीय दूतावासात काम करीत नव्हतो आणि रशियन संस्थेचा नोकर होतो हे समजताच त्याचा स्वर उर्मट बनला. स्थानिक सोविएतचा प्रथम सचिव त्याचा जावई होता असे त्याने सूचकपणे सांगितले. ब्रेझ्नेव काळातील रशियाचा सरकारी कारभार हा असा होता.

सोची येथे कॅमेलिया हॉटेलात उत्तम स्वीट मिळाला. बारा वर्षांची इच्छा पूर्ण केली. चेकोस्लोवाक तरुण-तरुणींचा कंपू ओळखीचा झाला. ऑलीविया नावाची सुंदर तरुणी माझ्याबरोबर व तमाराबरोबर सौनात आली. खास फिन्निश धर्तीने सौनात बाष्पस्नान केले. तमाराने तापलेल्या दगडांवर चुकून जास्त पाणी ओतले. वाफेचा लोट एकदम वरती उसळला. पूर्ण नग्नावस्थेत मी व

ऑलीविया वरती फळीवर बसलो होतो. दोघांचे हात वाफेने भाजले. हातांवर निभावले. चेक घरांमध्ये गाळलेली दारू अनुभवली. सोचीचा मुक्काम उत्तम झाला.

सोचीहून येरेवानला गेलो. येरेवानच्या प्रख्यात थिएटर चौकातील 'आर्मेनिया' या भव्य हॉटेलात उतरलो. दावत्यान मंडळींनी खोल्या बुक केल्या होत्या. पण सोचीमधल्या आलीशान राहणीला चटावलेल्या तमाराने स्वीटची मागणी केली. चौपट भाडे देऊन स्वीट मिळाला.

येरेवानपासून लेनिनाकान गावी गेलो. तुर्की हद्दीला पाहिले. येरेवान व लेनिनाकान या गावांना १९८६ मध्ये भेटी दिल्या. नंतर अवघ्या दोन वर्षांत तेथे महाभयंकर भूकंप झाला. लेनिनाकान तर पूर्ण जमीनदोस्त झाले. आता केवळ आठवणी उरल्यात. सुदैवाने येरेवानमधील मित्रमंडळी धडधाकट आहेत.

नावीन्य म्हणून एस्तोनियातील ताल्लिन शहरी जून महिन्यात गेलो. ताल्लिनला जाणारी विमाने मॉस्कोतील 'शेरेमेत्येवो-१' विमानतळावरून निघतात. हा पूर्वीचा आंतरराष्ट्रीय विमानतळ होता. ऑलिंपिक स्पर्धांनंतर त्याच्या अलीकडे 'शेरेमेत्येवो-२' विमानतळ आंतरराष्ट्रीय आहे.

ताल्लिनला जाणारी विमाने छोटी असतात. 'याक-४०' जातीची विमाने सुटसुटीत आहेत. त्यात हातातील सामान पाच किलोपेक्षा जास्त घेऊ देत नाहीत. म्हणून प्रवास सुसंस्कृत, आरामशीर होतो. ताल्लिन येण्यापूर्वी विमानात सांगतात की, ज्यांना विमानतळावर टॅक्सी बुक करायची आहे त्यांनी होस्टेसला सांगावे. त्यासाठी एक रूबल नाममात्र आकार घेतात. एक कागद देतात. विमानतळावर एका खिडकीपाशी कागद द्यायचा. तेथे टॅक्सीचा नंबर देतात. मॉस्कोपासून अवघ्या दीड तासाचा विमानप्रवास आहे.

ताल्लिनमधील 'वीरू' हॉटेलात आठवड्याचा मुक्काम सुखदायी ठरला. हा प्रांत रशियापेक्षा अगदी भिन्न. कर्मचारी सुसंस्कृत, चटपटीत काम करणारे आहेत. येथील नाईट क्लब सुरेख आहेत. जुने ताल्लिन शहर पाहण्यासारखे आहे. या मध्ययुगीन गावात मोटारींना फिरण्यास मनाई आहे. फक्त पादचारी फिरतात. ह्या भागात अनेक ऐतिहासिक चित्रपटांचे शूटिंग झाले. ताल्लिनमधील लोक टेलिव्हिजनवर हेलसिंकीतले कार्यक्रम पाहतात. एस्तोनियन भाषा फिन्निश भाषेच्या जवळपास आहे. एस्तोनियन लोकांना

रशियन माणसे आवडत नाहीत. एस्तोनियातील काही प्रदेशात परकीयांना संचार करण्यास मनाई आहे. हॉटेलच्या बारमध्ये फिन् प्रवाशांची गर्दी असते. ताल्लिनचा यॉट क्लब छान आहे.

लात्वियातील रीगा गावी गेलो. रीगा राजधानीचे शहर. ज्या हॉटेलला आरक्षणासाठी तार केली होती, त्याला तार मिळाली नव्हती. फार पंचाईत झाली. तमाराने स्थानिक सोविएत कचेरीत माझा 'परदेशी' चेहरा दाखवला. पाच तासांच्या रखडपट्टीनंतर बऱ्यापैकी हॉटेलात खोल्या मिळाल्या.

रीगा ऐतिहासिक शहर आहे. नव्या-जुन्या इमारतींचा संगम आहे. अमेरिकन विद्यार्थ्यांच्या गटात घुसलो. सिटी टूर घेतली. त्या मुलांचा मास्तर रशियन बोलत होता. तो मोकळेपणाने बोलला. पण मुले गप्प होती.

रीगापासून अर्ध्या तासाच्या टॅक्सी प्रवासानंतर यूर्माला नावाचे रम्य विश्रामस्थळ आहे. तेथील समुद्रकिनारा प्रसिद्ध आहे. तेथे हॉटेल नाही. फक्त कम्युनिस्ट पक्षाच्या सदस्यांसाठी राहण्याची सोय होती. सामान्य माणसे खाजगी घरांमध्ये खोल्या भाड्याने घेतात. चिनी मातीच्या चॉकलेटी रंगाच्या बाटल्यांमध्ये भरलेला 'बल्झाम' नावाचा तेहतीस वनस्पतींचा काळसर रंगाचा कडवट चवीचा अर्क रीगामध्ये प्रसिद्ध आहे. हे 'बल्झाम' कॉफीत मिसळून पितात. वोदकात मिसळलेले बल्झाम गुणकारी ठरते असे म्हणतात.

रीगा, ताल्लिन येथे वातावरण जास्त शांत, सुसंस्कृत वाटले. हवामान उन्हाळ्यातसुद्धा शीतल असते.

काळ्या समुद्रतीरी पिचुंदाच्या अलीकडे गाग्रा नावाचे रम्य स्थळ आहे. तेथील ताड वृक्ष प्रसिद्ध आहेत. गाग्रा येथे जॉर्जियन लेखक संघाच्या विश्रामगृहात दोनदा राहिलो. फिन्निश युद्धात लढलेला एक रशियन कवी भेटला. रशियात कवितेला मोबदला चांगला देतात. लेखकांपेक्षा कवी जास्त लोकप्रिय आहेत.

रशियाचा केंद्रभाग पाहिला. उत्तरेकडील लेनिनग्राद पाहिले. दक्षिणेत कॉकेशसमध्ये फिरलो. युक्रेनी प्रजासत्ताक, मध्य आशियाई उझ्बेक प्रजासत्ताक पाहिले. जॉर्जिया आर्मेनिया मनसोक्त फिरलो. फक्त अतिपूर्वेतील व्लादीवस्तोक पाहू शकलो नाही. सरकारी नियम आडवे आले. गंमत म्हणजे भारतीय नौदलात काम करणारे अनेक लोक व्लादीवस्तोकमध्ये आहेत. मॉस्को ते व्लादीवस्तोक

ट्रान्स सैबेरियन एक्सप्रेसने प्रवास करावा असे पूर्वी म्हणत. एखादी इच्छा अपूर्ण राहण्यात गंमत आहे. त्या अपूर्णतेमुळे नवी चालना मिळते. मिखायल गोर्बाचोव यांच्या कृपेने व्लादीवस्तोक शहर परदेशी प्रवाशांना लौकरच म्हणे खुले होणार.

*



# बई-कोवालम-सिंगापूर-बँकॉक

रशियातील विविध विश्रामस्थळी तमाराबरोबर मनसोक्त भटकल्यानंतर मनाशी विचार केला, भारतामधील एका नयनरम्य सागरतीरावर जुई, मामा, बेबी यांच्या संगतीत काही दिवस व्यतीत करावेत.

मॉस्कोमधून प्रयाणाचा दिवस आधी ठरविला. नेमक्या त्याच्या आदल्या दिवशी इंदिरा गांधींची हत्या झाली. ही बातमी बी. बी. सी. वर प्रथम ऐकली. सारेच हबकले. तमारा इंदिराभक्त आहे. जुन्या वर्तमानपत्रांतून शोधून काढलेल्या इंदिरा गांधींच्या फोटोसमोर तिने मेणबत्ती लावली.

योगायोगाने वित्तर झाखचा त्याच दिवशी वाढदिवस होता. त्याने आणि मारीयाने त्यांच्या घरी आम्हाला बोलाविले. वित्तरची वृद्ध आई इंदिराजींबद्दल खूप हळहळली.

संमिश्र भावनांसह दुसऱ्या दिवशी मॉस्को सोडले. इंदिराजींची अंत्ययात्रा आटोपल्यानंतर माझे विमान मध्यरात्रीनंतर दिल्ली विमानतळावर तात्पुरते थांबले. मुंबईचे उतारू विमानातच बसून राहिले होते.

मुंबईत घाटकोपरला मामा व बेबीकडे मुक्काम टाकला. थोड्या विचारविनिमयानंतर कोवालम बीचला जाण्याचे ठरले. मामा-बेबी नुकतेच काश्मीरची सहल करून आले होते. कोवालम बीचवर चार दिवस एखाद्या हॉटेलात राहायचे, त्रिवेंद्रम शहर ओझरते पाहायचे आणि पुढे कन्याकुमारीला विवेकानंद स्मारक पाहायचे असा बेत ठरला. जुई खूष झाली. मुंबई-त्रिवेंद्रम हा प्रवास इंडियन एअरलाईन्सच्या एअरबसने केला. जुई प्रथमच विमानात बसत

होती. मामा-बेबी यांनी आधी विमानप्रवास केला होता. माझ्या या भारत-भेटींच्या दरम्यान मी नेहमी नवनवी मराठी पुस्तके वाचायचो. विशेष करून आत्मचरित्रे. रिकाम्या वेळाचा सदुपयोग करायचा. त्यामुळे मराठी साहित्याशी ताजा संपर्क राहायचा. त्याच वेळी नवी गाजलेली नाटके पाहत होतो. त्यात 'पुरुष' फार आवडले. सिनेमा थिएटरात चित्रपट पाहणे केव्हाच बंद केले होते. श्री. विश्राम बेडेकरांचे 'एक झाड दोन पक्षी' सर्व आत्मकथनांमध्ये उत्तम आहे. 'रणांगण' पासून श्री. बेडेकरांचा मी चाहता बनलो होतो. श्री. व्यंकटेश माडगूळकर यांच्या लेखनाचा मी चाहता आहे. असा अस्सल, रगेल लेखक आणि माणूस मराठीत विरळा. लीला चिटणीस यांचे प्रांजल आत्मकथन आवडले. आपल्याकडे स्त्री लेखिका जास्त मनमोकळया शैलीत आणि धाडसाने खरे लिहितात. चांगली, स्तुत्य बाब आहे.

कोवालम येथील हॉटेल 'समुद्र'मधील चार दिवसांच्या मुक्कामात जुईच्या वर्तनातील बारकावे पाहायला मिळाले. तिचे शालेय शिक्षण पूर्ण होत आले होते. समजूतदार वयात प्रथमच ती माझ्याबरोबर राहत होती. जेव्हा मी रशियन बोलायचो तेव्हा फ्रेंचमध्ये उत्तरं द्यायची. हा प्रघात अजून चालू आहे.

कोवालम ते कन्याकुमारी टॅक्सी प्रवास खूप सुखद झाला. वाटेतील मंदिरांमध्ये आत गेलो नाही. धोतर वा लुंगी नेसण्याचा कंटाळा केला. कन्याकुमारीच्या किनाऱ्यावर उभे राहताना ऊर आनंदाने भरून आला. वेगवेगळया रंगांच्या वाळू भरलेल्या छोट्या पुरचुंड्या सांगाती घेतल्या. विवेकानंद स्मारकापाशी मन गंभीर, चिंतनशील बनले. नेहमीच्या धकाधकीतून विचार दूर क्षितिजाआड निघून गेले. आयुष्यातील छोट्या छोट्या इच्छा, महत्त्वाकांक्षा पूर्ण करीत आलो होतो. मन किंचित विरक्तीकडे वळत होते.

मुंबईला परतल्यावर मॉस्कोच्या परतीची तयारी करू लागलो. तिकिटाची भानगड निस्तरण्यासाठी नील साठेकडे गेलो. नील साठे हा साठेसाहेबांचा मुलगा. मी रशियाला प्रथम जात होतो तेव्हा नरीमन पॉईंटवरील 'एअर इंडिया'च्या कचेरीत तो नोकरी करीत होता. त्याच वेळी त्याची आणि माझी ओळख झाली. कालांतराने साठेसाहेबांच्या घरी वारंवार भेटी होत होत्या. मध्यंतरीच्या काळात तो आखाती देशांमध्ये वास्तव्याला गेला. तेथून परतल्यानंतर त्याने ट्रॅव्हल एजन्सी काढली होती. माझ्या तिकिटाचे काम त्याने

चुटकीसरशी केले. त्याच कामासाठी रशियनांनी फार सतावले होते. नीलच्या कचेरीत जाताना माझ्या सांगाती संजय हेमाडी होता. संजय मॉस्कोत वैद्यकीय डॉक्टर बनत होता.

नीलने आमच्यापुढे सिंगापूर-बँकॉक सहलीची योजना मांडली. आम्हाला ती आवडली. तेवढ्यात पटकथा लेखक व दिग्दर्शक प्रदीप दीक्षित तेथे आला.

प्रदीप मूळचा सुधीर मोघेचा मित्र. मी रशियाला जाण्यापूर्वीच तो माझा मित्र बनलेला होता. ह्या धडपड्या, कष्टाळू, कल्पक तरुणाला चित्रपट क्षेत्रात अद्याप भरघोस यश मिळाले नाही. नील साठेच्या कंपनीसाठी प्रदीप काही काम करीत होता. म्हणून तो सहलीत सामील झाला. नकळत मित्रांचा गट जमला. नीलच्या प्रवासी गटात एका बँकेचे कर्मचारी होते. सारे मराठी.

कॅथे पॅसिफिकच्या विमानाने बँकॉकला निघालो. प्रदीप प्रथमच परदेशी निघाला होता. त्याचे व इतर काहीजणांचे 'इमिग्रेशन क्लीअरन्स' नव्हते. बिचारा प्रदीप विमानतळावरून तात्पुरता परत गेला. दुसऱ्याच दिवशी समस्या सुटली. प्रदीप व उरलेले प्रवासी बँकॉकला आम्हाला येऊन मिळाले. सहलीचे संयोजन नीलने उत्तम केले. हॉटेल छान होते. थाय गाईड मजेदार होता. मारुती हा थाय देव होता असे ठासून सांगत होता.

बँकॉकमधील निशाजीवन रंजक होते. स्कॅन्डीनेवियातील क्लबांपेक्षा जास्त मजेदार आणि स्वस्त होते. हँड मसाज आणि बॉडी मसाजची लज्जत मनसोक्त अनुभवली. मसाज करणाऱ्या थाय तरुणी म्हणाल्या, "तू वेगळा भारतीय वाटलास. इतर भारतीय लोक आमच्या अंगचटीला येतात त्यामुळे त्रास होतो." एकूण परिस्थितीची कल्पना आली.

पटाया बीचवर स्मिर्नोफ वोदका मजेत प्यायलो. नील आणि त्याच्या मित्रांना रशियन पद्धतीने वोदका प्यायला शिकविली. स्मिर्नोफ वोदका जगात सर्वोत्तम वोदका आहे. मूळ रशियात खरे तर वोदका चांगल्या नसतात. रशियन वोदकांची प्रसिद्धी उगीचच आहे. त्यापेक्षा आपली भारतीय 'अल्काझार' वोदका छान आहे. चार दिवस बँकॉकमध्ये राहून सिंगापूरला आलो. आशियात एवढे शिस्तबद्ध, स्वच्छ शहर पाहून आश्चर्य वाटले. विषुववृत्तावर वसलेले सिंगापूर खूप गरम होते. सिंगापुरात वेश्या-व्यवसाय कायद्याने मना होता. बँकॉकमध्ये मसाज करणाऱ्या तरुणींनी मसाजनंतर विचारणा केली. पण त्या

वेळी तशी इच्छा झाली नाही. सिंगापुरात मात्र चिनी तरुणी हवी होती. फोनमार्फत एक तरुणी हॉटेलच्या खोलीत आली. ती एका बँकेत कर्मचारी होती. जाताना ती चिनी तरुणी म्हणाली, "तू वेगळा भारतीय आहेस. युरोपीय लोकांसारखा वागलास." मी गप्प राहिलो.

इतर प्रवाशांची खरेदीची घाई उडाली. मला विशेष खरेदी करायची नव्हती. मी नेहमीप्रमाणे 'ग्रीन चॅनलमधला' प्रवासी ! आठवडा मजेत गेला. नवनवे अनुभव मुक्तपणे भोगले. जुई, तमारा, तान्या यांच्यासाठी भेटवस्तू खरीदल्या. बेबी चॉकलेटप्रेमी आहे.

*

# बिऱ्हाड बदलले

सिंगापूर सफरीचा भरपूर आनंद सांगाती घेऊन मॉस्कोत परतलो. तेथे नव्या कटकटी वाट बघत होत्या. माझ्या अपार्टमेंटच्या वरच्या मजल्यावर एक दारूडे रशियन जोडपे राहत होते. बाहेर जाताना बाथरूममधील नळ बंद करायला विसरत होते. मग आमच्या घरात पाण्याच्या धारा. सारे छत खराब व्हायचे. तमारा जास्त आरडाओरडा करायची. तिला रिकामा वेळ होता म्हणून ती त्या जोडप्यामागे हात धुऊन लागली. कोणे एके काळी मंत्रालयात ती काम करीत होती. त्यामुळे सरकार-दरबारी अर्ज कसे करावेत याचे ज्ञान तिला उत्तम होते. मला ती कटकट नको होती. पण ती आवरेना. पूर्ण वर्षभर तो दंगा चालला होता. पोलिसांचे खेटे चालू झाले. प्रकाशन गृहातील कर्मचारी सारखे फेऱ्या मारू लागले. आयुष्य अगदी मनाविरुद्ध चालले होते. अखेर प्रकाशन गृहाने नवे अपार्टमेंट दिले.

हे नवे अपार्टमेंट सकोलनिकी पार्कजवळ होते. त्याचा आकार पूर्वीच्या अपार्टमेंटपेक्षा दीडपट जास्त होता. नवे घर सर्व दृष्टीने खूप जास्त चांगले होते. सकोलनिकी पार्कसारखा विशाल पार्क फिरायला जवळ होता. अपार्टमेंटची नवी डागडुजी मी स्वखर्चाने केली. भिंतींना उत्तम कागद लावण्याचे व छताला सफेदी करण्याचे काम तमाराच्या आतेभावाने केले. अनातोली व त्याची बायको तान्या अशी कामे जादा कमाईसाठी करायची. आपल्याच माणसांना पैसे दिले तर जास्त चांगले. रशियात अशी कामे चांगल्या रीतीने करणारी माणसे विरळाच.

चौथा करार करण्यापूर्वी एक आठवडा आधी मी नव्या घरात राहायला गेलो. फर्निचर हलविण्याची सर्व व्यवस्था तमाराने चोखपणे केली. अशी कामे करवून घेण्यात ती पटाईत आहे. तेथल्या तेथे पैसे मोजून देणे यातसुद्धा मी पटाईत आहे. नव्या घरात स्थिरस्थावर होतो न होतो तोच माझ्या संपादिकेचा फोन आला. मराठी विभागात कामाची टंचाई निर्माण झाली. शकुन चांगला नव्हता. 'रादुगा' प्रकाशनाने जरी माझ्याशी आणखी तीन वर्षांचा करार केला होता तरी पुरेसे काम नव्हते. तीन-चार महिने ताणात गेले. १९८८ सालापर्यंत करार होता. नवा करार झाल्यामुळे आम्हा दोघांना प्रकाशन गृहाकडून विमानाची तिकिटे मिळणार होती. डिसेंबर व जानेवारी हे दोन महिने भारतात राहायचा बेत केला.

जाण्यापूर्वी घरात एक नवी भानगड निर्माण झाली. अनातोली व तान्याने भिंतींना कागद चिकटविण्याचे काम पूर्ण केले. एक दिवस तमाराने तान्यावर चोरीचा आळ घेतला. वस्तू क्षुल्लक होती. तमाराची परदेशी मस्काराची डबी नाहीशी झाली. दोघींची बाचाबाची झाली. अनातोलीची आणि माझी पंचाईत बनली. त्यानंतर अनातोली व तान्या यांचे आमच्याकडे येणे थांबले. जवळची माणसे तोडणे हा तमाराचा स्वभावदोष आहे. दोन-तीन वर्षांनंतर अनातोली व तान्या यांच्याशी संबंध सुरळीत बनले. त्या तिघांना मजेत एकत्र बोलताना पाहून मला मनाशी आश्चर्य वाटायचे. जणू पूर्वी काही घडलेच नव्हते असे तिघे वागत होते.

नव्या घरात रुळतो न रुळतो तोच आम्ही भारताच्या प्रवासाला निघालो. आता 'एअरोफ्लोत' रशियन बनावटीची एअरबस वापरत होते. 'इल-८६' विमानाची बरीच टामटूम झाली. जणू एअरबस वापरणारा सोविएत संघ जगातील पहिलाच देश होता असा भास निर्माण करण्यात आला. एके काळी 'एअर फ्रान्स'ला मॉस्को विमानतळावर फ्रेंच एअरबस उतरवू देत नव्हते म्हणे. रशियन नेते आपल्या लोकांना अज्ञानात ठेवण्याचा सतत प्रयत्न करीत होते.

मॉस्को ते दिल्ली विमान रात्री दहा वाजता सुटणार होते. सर्व दुपारभर तमारा केस धूत बसली होती. केसांना धुणे, वाळविणे, नंतर त्यांना कर्लर्स लावणे हा कार्यक्रम कित्येक तास चालायचा. दोन सूटकेस व एक हँडबॅग यांच्यात तिने सामान भरले. हँडबॅगेत तिने धातूचे कर्लर घातले. सामान भरण्याची नित्याची

बाब होती म्हणून मी तिकडे विशेष लक्ष दिले नाही.

घरातून निघण्यापूर्वी आम्ही कपडे करून तयार झालो. तमाराचा थाट पाहून मी अवाक् झालो. तिने खऱ्या हिऱ्यांचे दागिने घातले होते. हे दागिने तिने मैत्रिणीकडून आणले होते. त्याबाबत मी चकार शब्द काढला नाही. जर बोललो असतो तर वस्सदिशी अंगावर आली असती.

'शेरेमेत्येवो-२' विमानतळावर कस्टम ऑफिसरने तमाराला सांगितले : "सोविएत नागरिकांना हिऱ्यांचे दागिने घालून परदेशी जाता येत नाही. केवळ अपवाद मोठ्या गायिकांचा वा कलावंतांचा. सर्वसामान्य महिलेला सोन्याचे फक्त तीन दागिने अंगावर घालता येतात. ते सुद्धा जाताना त्यांची नोंद केली पाहिजे. परतल्यानंतर ते नोंदलेले दागिनेच आणले पाहिजेत. न आणल्यास जबर दंड बसेल." हे ऐकून मला फार बरे वाटले. मला भारतीय कस्टमची काळजी होती. तमारादेवी मुकाट कस्टमच्या कचेरीत दागिने ठेवायला गेल्या. दरम्यानच्या अवधीत आमचे सामान तपासले जात होते. कस्टम अधिकारी इलेक्ट्रॉनिक उपकरणाने हँडबॅग पुन्हा पुन्हा तपासत होता. त्याने मला विचारले, "या बॅगेत सामान कुणी भरले ?" "बायकोने. का ?" "काही नाही." तोवर तमारा परत आली. ती आणि अधिकारी काही वेळ हँडबॅगेशी खटपटत होते. शेवटी तिच्या धातूच्या कर्लरच्या भोकात मौल्यवान खड्याचे भारतीय बनावटीचे कर्णभूषण अडकले होते. झाले ! चोरून दागिना नेण्याचा आरोप आला. त्यात माझा हात नव्हता हे अधिकाऱ्याच्या ध्यानात आले होते. मी काय बोलणार ? तमाराच्या मुस्कटात मारण्याची तीव्र इच्छा झाली. भारतीय दागिना ती भारतात का नेत होती ? मला समजेनाच. त्या स्थळी तिच्याशी कोणत्या भाषेत बोलणार ? एका गंभीर गुन्ह्यात ती अडकली होती. लगोलग दुसरे अधिकारी आले. माझ्या पासपोर्टची परत तपासणी झाली. वीस-पंचवीस मिनिटांनंतर मुख्य अधिकाऱ्याने मला सांगितले, "तुम्ही जाऊ शकता. मात्र तुमच्या बायकोला थांबवून ठेवतो." त्या गोष्टीला मी नकार दिला. मी त्याच्याबरोबर सामोपचाराने बोलणी केली. दागिना चुकून अडकला असावा. त्या चुकीबद्दल तेथल्या तेथे दंड भरण्याची तयारी मी दाखविली. अधिकारी कबूल झाला. त्याने तमाराला सोडले. मात्र आरोपपत्र नोंदीसाठी लिहिले. फक्त सहाशे रुपयांचे इअरिंग दीड हजार रूबल किमतीचे ठरविण्यात आले ! मर्जी

त्यांची ! यापुढे तमाराला परदेश प्रवासाला परवानगी मिळणे अवघड जाणार होते.

प्रशस्त रशियन एअरबसमध्ये जाऊन बसलो. तोंडाला कोरड पडली होती. होस्टेस लौकर पाणी देईना. शेवटी तमाराने स्वतःच खनिज पाण्याची बाटली आणून दिली. मी भराभरा व्हिस्कीचे चार पेग घेतले. 'सॉरी' तमारा म्हणाली. मी काहीच बोललो नाही. तीव्र संतापाच्या वेळी गप्प राहणे इष्ट. मनात रागाच्या उकळ्या फुटत होत्या.

दिल्लीत बाळासाहेब घाटणेकर विमानतळावर आले होते. मोटारीतून त्यांच्या घरी जातानाच तमाराने त्यांना रात्रीचा प्रसंग मोडक्या इंग्रजीत सांगितला. तपशीलवार सांगणे मला भाग पडले. तेव्हा मनात वाटले, खरोखर चुकून अडकला असावा दागिना.

मुंबईत थीबाच्या जुहूच्या फ्लॅटमध्ये मुक्काम टाकला. त्याचा नवा स्वयंपाकी कृष्णा तीन वर्षांपूर्वीच ओळखीचा झाला होता.

रीत म्हणून मामा-बेबीला भेटायला गेलो. घाटकोपरला टॅक्सीने जाण्या-येण्याचा त्रास झाला. प्रदूषणाचा फार ताप व्हायचा. त्या दिवशी माझे डोळे अचानक लालभडक बनले. भारतात आल्यानंतर दर वेळी मला जोरात सर्दी व्हायची. या वेळीही सर्दी झाली. तिच्या जोडीला डोळ्यांची भानगड उद्भवली

नववर्षाची पूर्वसंध्या जवळ आली होती. मॉस्कोतील पूर्वीचे मित्र कमोडोर पवन जैन मुंबईत कुलाब्यात सहकुटुंब राहत होते. नववर्षाच्या पार्टीला येण्याचे त्यांनी आम्हाला निमंत्रण दिले होते. तसाच लाल डोळ्यांसह मी गेलो. तमारा नेहमीच्या उत्साहात होती.

पार्टीला मॉस्कोतील जुने मित्र आले होते. स्टेट ट्रेडिंग कॉर्पोरेशनचे श्री. अजित पंत सपत्निक आले होते. 'एअर इंडिया'च्या मॉस्को ऑफिसचे माजी मॅनेजर श्री. तारापोर आले होते. तमारा सर्वांना हकीगत सांगत होती. रशियन कस्टम अधिकाऱ्यांना दूषणे देत होती. त्यांनी कर्णभूषणांना अवाच्या सव्वा किंमत लावली होती म्हणून तिला राग होता. मूळ दोष तिचाच होता हे तिच्या ध्यानात येत नव्हते. त्या रात्री माझी केवढी ताकद खर्च झाली ! कशाबद्दल मला ही शिक्षा ? अवघ्या तिसऱ्या भारत सहलीत ह्या बाईने स्वतःच्या लोभी

स्वभावाचा मासला दाखविला. आणि पुन्हा शिरजोरी ! तिच्या या बडबडीमुळे माझा राग वारंवार उसळत होता.

ज्या अर्थी भारतात आलो होतो तेव्हा कुठेतरी विश्रांतीला जायला पाहिजे होते. गोव्याला कोलवा बीचवर जायचे ठरविले. तेथे दहा दिवस राहायचे. नंतर बंगलोरला विजय पाध्येकडे चार दिवस मुक्काम. बंगलोरहून पुण्याला दादासाहेब आपट्यांच्या 'बाबुष्का' बंगल्यात चार दिवस राहून मुंबईला परतायचे. नंतर दिल्लीत चार दिवस घाटणेकरांकडे तळ टाकायचा. तमाराच्या खरेद्या आटपायच्या आणि तिच्या वाढदिवशी मॉस्कोतील उलीत्सा स्त्रोमिन्कावरच्या तेरा क्रमांकाच्या घराच्या आठव्या मजल्यावरच्या एकशेबावीस क्रमांकाच्या फ्लॅटमध्ये परत जायचे असा बंदिस्त कार्यक्रम आखला.

गोव्यातील कोलवा बीचजवळच्या गावातील एका बंगल्याच्या आऊट हाऊसच्या चार खोल्यांमध्ये पश्चिमी हौशी प्रवासी राहत होते. एका डॉक्टरचा तो बंगला होता. त्याची मालकीण विधवा होती. ती तिच्या मुलीसह बंगल्यात राहत होती. कोकणी किंवा पोर्तुगीज भाषा बोलायची. आमच्या टॅक्सीवाल्याने ह्या बंगल्यापर्यंत नेले. कारण महागडी हॉटेले परवडत नव्हती. छोट्या हॉटेलांच्या कर्मचाऱ्यांचे संप चालू होते. म्हणून आम्ही त्या बंगल्याच्या आवारात एक खोली भाड्याने घेतली. पश्चिमी पद्धतीचा संडास स्वतंत्र होता. माझी मुख्य गरज भागली. बंगल्यापासून दहा मिनिटेपर्यंत पायी गेले की किनारा यायचा. तेव्हा रशियन धर्तीवर गोव्यात विश्रांती घेतली. एक स्विस तरुणी आणि तिचा ब्रिटिश मित्र व आशा नावाची त्यांची दोन-तीन वर्षांची मुलगी आमचे शेजारी होते. त्यांच्याशी तमाराने पटकन मैत्री केली. माझेही त्यांच्याशी चांगले जमले. वर्षातून चार-पाच महिने भारतात राहायचे आणि वर्षाच्या उरलेल्या काळात मायदेशात नोकऱ्या करायच्या असा त्यांचा खाक्या होता. रोज संध्याकाळी समोरच्या अंगणात आमच्या मद्य-गप्पा चालू झाल्या. दिवसा अर्थात किनाऱ्यावर तमारा वाळूत आणि मी झापाच्या रेस्तराँत फेणी पीत. पश्चिम जर्मनीतील हॅनोवर शहरी राहणारे एक जर्मन जोडपे आमच्या ओळखीचे झाले. प्रथम ते मडगावातील एका हॉटेलात राहत होते. नंतर कोलवा बीचजवळच्या बऱ्यापैकी हॉटेलात त्यांना खोली मिळाली. वॉल्टरचे हॅनोवरमध्ये दारू व सिगारेट विक्रीचे दुकान होते. मोडक्या इंग्रजीत आमचे संभाषण चाले. डिंपल

व्हिस्कीपासून मैत्री सुरू झाली. निरोपाच्या वेळी कोकोनट फेणी होती. तमाराच्या व मायाच्या रशियन आणि जर्मन भाषांसकट हातवाऱ्यांनी गप्पा व्हायच्या. आठ दिवस मजेत गेले.

बंगलोरला जाण्यासाठी विमानात आसने मिळेनात. या वेळी नील साठेने दगा दिला. विमानाच्या आसनांचे आरक्षण व्यवस्थित केले नव्हते. खूप आगाऊ पूर्वसूचना असूनही त्याने असे केले. अगदी 'भरवशाच्या म्हशीला—'

जाताना विमानतळावर गंमत झाली. 'वेटिंग लिस्ट'वर आम्ही होतो. पण आसने मिळेनात. दोनदा विमानतळावर फेऱ्या मारल्या. गोव्यात वाहतूक व्यवस्थेत अंदाधुंदी असते. तमारा थेट विमानतळावरच्या मॅनेजरकडे गेली. तो मराठी माणूस होता. दोघांचे काय बोलणे झाले हे माहीत नाही. तमाराच्या मराठी-इंग्रजी माऱ्यामुळे मॅनेजरने तिला दुसऱ्या दिवशीच्या विमानात आसन देण्याचे आश्वासन दिले. एक आसन पक्के केल्यानंतर ती म्हणाली, "आणि माझ्या नवऱ्याला ?" मॅनेजर बिचारा गार झाला. शेवटी तमाराने त्याला माझ्यापर्यंत आणले. मी मोठ्या हॉलमध्ये बसलो होतो. त्यांचे आतापर्यंतचे संभाषण मॅनेजरच्या खोलीत चालू होते.

दुसऱ्या दिवशी आम्हाला खरोखरच बंगलोरचे विमान मिळाले.

दोन दिवस विजय पाध्ये आणि त्याची बायको सौ. विद्या यांच्या छानदार प्रशस्त अपार्टमेंटमध्ये उत्तम पाहुणचार अनुभवला. त्यांच्या छोट्या मुलाने खूप करमणूक केली. गोऱ्यापान तमाराकाकीवर जाडजूड जयदीप खूष होता.

एक दिवस श्रावणबेळगोळ्याला मोटारीने निघालो. खरे म्हणजे तेथे जायची मूळ कल्पना माझी. बंगलोर शहर पूर्वी १९७९ साली फिल्मोत्सवाच्या दरम्यान मी पाहिले होते. श्रावणबेळगोडा हे ठिकाण अपेक्षेपेक्षा खूप दूर ठरले. डोंगरातील मूर्तीकडे सारेजण पायऱ्या चढू लागले. काही पायऱ्या चढल्यानंतर एकदम मला चक्कर आली. समोरच्या शहराकडे नजर स्थिरावेना. ताठ उभे राहायला भीती वाटू लागली.

म्हणून मी तेथेच थांबण्याचा निर्णय घेतला. आणि बसून राहिलो. विजय, विद्या, तमारा, जयदीप वरती चढून गेले. सर्व वाटेत तमारा माझी काळजी करत होती असे विजय म्हणाला. तिने मूर्तीचे फोटो काढून आणले. माझ्या तात्पुरत्या आजाराकडे माझ्यासकट सर्वांनी दुर्लक्ष केले. नंतर जीवन पूर्ववत चालू झाले.

उंच जागी चढून गेल्यानंतर चक्कर येण्याचा हा पहिलाच प्रसंग. खरे तर लहानपणी आणि तरुणपणी टेकड्या चढण्याचा मला कायम सराव होता. घेरीचा छडा लावायला हवा होता.

बंगलोरमध्ये दादासाहेब आपट्यांचे जावई श्री. श्रीपाद गोरे, किर्लोस्कर कंपनीच्या कचेरीत नोकरीला होते. त्यांची आणि सौ. प्रतिभा गोरे यांची भेट घेतली. संजीवकुमारच्या मूळ मालकीच्या 'प्रिन्सेस' रेस्तराँत गोरे दांपत्याने उत्तम जेवण दिले. त्याच रात्री विजयने 'टोप कॅपी' मध्ये जेवण दिले. परदेशी वास्तव्य असल्याचे, परदेशी बायको असल्याचे, सधन चांगले मित्र असल्याचे हे फायदे होते. आयुष्याचा रथ काही इंच उंचीवरून धावायचा.

कथनाच्या ओघात एक प्रसंग सांगायचा राहिला. पंतप्रधान श्री. राजीव गांधी व सौ. सोनिया गांधी यांनी मॉस्कोला भेट दिली तेव्हाची गोष्ट. श्री. राजीव गांधी रशियन महिलांमध्ये विलक्षण आवडते बनले होते. तमारा तर त्यांच्यावर लट्टू होती. सोनिया, राहुल, प्रियांका यांच्याबद्दलसुद्धा तिला ममत्व वाटायचे. स्वप्नांमध्ये राजीव गांधींशी ती फूटबॉल खेळायची. त्या स्वप्नांचे कथन सकाळी न्याहरीच्या वेळी करायची. मॉस्कोतील 'सवेत्स्काया' हॉटेलच्या मोठ्या हॉलमध्ये भारतीय पंतप्रधान आणि त्यांच्या पत्नी मॉस्कोतील हिंदुस्थानी समाजाच्या सदस्यांशी वार्तालाप करणार होते. तमारा उत्साहाने माझ्याबरोबर आली होती. अर्थात साडी नेसून. ज्या क्षणी श्री. राजीव गांधी जवळ आले त्या क्षणी तिची धांदल उडाली. मी दूर उभा होतो. भारतीय दूतावासातील एक अधिकारी तिच्या शेजारी उभे होते. तमारा एकदम मराठी बोलू लागली आणि राजीव गांधींना सांगू लागली : "माझा नवरा—" उपस्थितांना काही समजेना. तेवढ्यात तमाराने हाताच्या बोटातील मौल्यवान खड्याची सोन्याची अंगठी राजीवजींसमोर धरली. ते सुद्धा गोंधळले होते. सौ. सोनिया गांधींनी प्रसंगावधान राखून हाताच्या ओंजळीत त्या भेटीचा स्वीकार केला. मग बावरल्या मुद्रेने तमारा माझ्यापाशी आली. आठवणीत जतन करण्यासारखा तो प्रसंग मजेदार होता.

भावनेच्या उर्मीसरशी सोन्याची अंगठी देऊन टाकणारी तमारा, कस्टममध्ये चोरून दागिना नेताना नेमकी पकडली गेलेली तमारा ही दोन परस्परविरोधी चित्रे मला दिसली.

भारतातील मुक्कामात आमच्यात असंतोष आणि धुसफूस होती. नेहमीप्रमाणे मी तिला दहा हजार रुपये देऊन टाकले. या वेळी दिल्लीत यशवंत प्लेसमध्ये सुंदर फर कोटची तिने खरेदी केली. माझी तिच्याबद्दलची उदासीनता वाढत होती.

मॉस्कोत घरी पोहोचल्याक्षणी तिची मुलगी तान्या आली. वस्तुतः तान्या आम्हाला विमानतळापर्यंत सोडायला किंवा आमचे स्वागत करायला कधी येत नव्हती. आत्ता भेटवस्तूंच्या लुटीसाठी ती आली होती.

तेवढ्यात स्थानिक पोलीस ठाण्यावरचा पोलीस आला. वर्षातून एक-दोनदा माझ्या परवाना पत्राची तपासणी करायला पोलीस यायचा. या वेळी नवा पोलीस होता. त्याने तमाराची व तान्याची बारीक चौकशी केली. ह्या गोष्टीचा तमाराला राग आला.

त्या मायलेकी नव्या खरेदीच्या कौतुकात गुंतल्या. दरम्यान मी हळूच वालेंतिनाच्या घरी फोन केला. वालेंतिनाचा नुसता परिचय घडून दोन-तीन वर्षे होऊन गेली होती. आमच्या कचेरीत ती काम करीत होती. एका युरोपीय भाषा विभागात. छोटी चण, बोलके डोळे, सदैव हसरी मुद्रा. जेमतेम पंचवीस वय. अविवाहित होती. ती आणि तिची आई एका अपार्टमेंटमध्ये राहत होत्या. वालेंतिना मला आवडायची. प्रवासाची आवड हा आम्हाला एकत्र गुंफणारा विषय होता. कधी कधी तिने मला स्पष्टपणे सुचविले होते. मी तिला हवा होतो. पण मी घाई केली नाही. आज तिला भेटण्याची तीव्र इच्छा झाली. भारत सफरीच्या दरम्यान तमारापासून मनाने आणि शरीराने मी दूर गेलो. एखादी व्यक्ती मनातून उतरली तर ती पूर्णपणे उतरते.

वालेंतिना घरी एकटीच होती. माझ्या पृच्छेला तिने आनंदाने होकार दिला. जेव्हा तिच्या दारावर घंटी वाजवली तेव्हा सताड दार उघडून तिने मला घट्ट आलिंगन घातले. आवेगाने तिचे चुंबन घेऊन मी प्रतिसाद दिला. वालेंतिना रोमँटिक वृत्तीची होती. माझ्या कानात कुजबुजली : “मला हातावर उचलून घे आणि पलंगापर्यंत ने !”

नंतर जे काही घडले ते विलक्षण थक्क करणारे होते. तृप्त, आनंदी वालेंतिनाने जिप्सी संगीताची रेकॉर्ड लावली. खोली धुंद संगीताने भरली. वालेंतिना त्या संगीताच्या तालावर नाचू लागली. बराच वेळ ती तशीच

नग्नावस्थेत बेभान नाचत होती. तिची उन्मना अवस्था पहायला अतीव आनंद झाला. फार दिवसांनी उत्कट आनंद अनुभवत होतो. सुखाचा कळस झाला. त्या रात्री मनात विचार आला : 'बस्स ! आता यापुढे स्त्रियांचा छंद करायचा नाही ! कोणत्याही गोष्टीला शेवट असतो. उत्कट क्षणी थांबण्यात मजा !' खरोखर त्या क्षणापासून मी उनाडक्या बंद केल्या.

*

# आघात

उत्तमोत्तम पुस्तके अनुवादासाठी मिळू लागली. गोगोल, पूष्कीन, गोर्की यांच्या कथांचे संग्रह अनुवादित केले. गोर्कीची तीन-चार नाटके केली. आधुनिक सोविएत नाटके प्रथमच मराठीत अनुवादित केली. सुमारे दोनशे वर्षांतील उत्तमोत्तम रशियन कथांचे दोन खंड प्रकाशित झाले. कधी नव्हे ते कामाचे समाधान लाभू लागले. ह्या भरतीच्या लाटेत कामाने झपाटल्यासारखा होतो. जे साध्य हवे होते ते साध्य होऊ लागले.

पण मूळचा भारतीय पिंड भविष्यकाळाची चिंता करू लागला. आतापर्यंत आयुष्यात अनेक चढउतार अनुभवाला आले. वयाची पंचेचाळीशी उलटत होती. करार संपण्यास दोन वर्षांचा अवधी होता. जर नवा करार झाला नाही तर पुढे काय हा प्रश्न उभा होता. भारतात परत गेल्यानंतर नेमके काय करायचे उमजेना. अर्थार्जनाची जरुरी होती. जागांचे भाव भरमसाठ वाढत होते. मामा-बेबीकडे राहण्याचा इरादा होता. निवृत्तीचा आणि मुंबई सोडून पुण्यात स्थायिक होण्याचा मामाचा निश्चय अजून होत नव्हता. एकूण परिस्थिती धूसर होती. जुईचे महाविद्यालयीन शिक्षण चालू होते. ठाणे व पुणे अशी तिची नाचानाच चालू होती. माझ्याकडून तिचा तनखा वाढत्या रकमेने चालू होता. महागाई वाढत होती हे जाणून माझा मीच रकमेत वाढ करीत होतो. तिच्याशी अद्याप संघर्ष झडला नव्हता.

मॉस्कोतील घरगुती जीवनात नेहमीची धुसफूस चालू होती. माझे मद्यपान नियमित चालूच होते. धूम्रपान माफक होते. खूप काम करूनही रिकामा वेळ

खायला यायचा. भारतीय मित्रांची ये-जा चालू होती. मुंबई दूरदर्शनने एका शनिवारी 'दोन्ही घरचा पाहुणा' दाखविला. डॉक्टरभाईंनी त्याची व्हिडिओ टेप घेतली. दिलीप बर्वेने टेप मॉस्कोत आणून दिली. जुन्या आठवणींना उजाळा मिळाला. पपांची पत्रे अधूनमधून येत होती. इगरला मध्यंतरी मुलगा झाला. हा मुलगा तीन-चार वर्षांचा होतो न होतो तोच इगरच्या चौथ्या बायकोने घटस्फोट घेतला. छोट्या सेर्गेयसाठी इगरची धावपळ आणि मानसिक ओढाताण सुरू झाली. विक्तर आणि माशा नव्या अपार्टमेंटमध्ये सुखाने जगू लागले. डबीर दांपत्य मॉस्को सोडून गेले व दिल्लीत स्थायिक झाले. बाळासाहेब घाटणेकर सरकारी नोकरीतून निवृत्त झाले आणि नवभारत टोबॅको कंपनीचे रशियाविषयक सल्लागार बनले. कामानिमित्त मधूनमधून मॉस्कोत येत होते. 'एअर इंडिया'ने ७०७ बोईंग विमाने मॉस्को सेक्टरमधून काढून टाकली. नव्या फ्रेंच एअरबस येत होत्या. म्हणून थीबा मॉस्कोला यायचा बंद झाला. एकटा कॅ. सुभाष पटवर्धन येत होता.

गोर्बाचोव पर्व सुरू झाले होते. तेवढ्यात चेर्नोबिलचा अपघात झाला. ती बातमी प्रथम बी.बी.सी.वर ऐकली. रशियन प्रसारमाध्यमे अपघात कबूल करेनात. नंतर नंतर एकेक भयंकर बातम्या येऊ लागल्या. 'पिरीस्त्रोयका' व 'ग्लास्नस्त'च्या घोषणा अस्पष्ट ऐकू यायच्या. सोविएत जनतेला त्यांचा नेमका अर्थ उमजला नव्हता.

१९८७ सालातील माझा वाढदिवस खूप जोरात साजरा झाला. आब्रामोव दांपत्य आले. बाळासाहेब घाटणेकर त्याच सुमाराला मॉस्कोत होते. त्यांचे मॅनेजिंग डिरेक्टर श्री. चौधरी यांची नुकतीच ओळख झालेली होती. मी लेखक आहे हे जाणून ह्या माणसाने दुसऱ्याच भेटीत एक सुंदर बॉलपेन भेट म्हणून दिले. अशी भेट प्रथमच मिळाल्याबद्दल खूप आनंद झाला. वाढदिवसाला इगर अर्थातच आला. अनातोली व तान्या आले. व्हिस्की व शँपेन वाहत होत्या. तमारा नेहमीच्या उत्साहात होती. घर वैभवाने आणि आनंदाने झगमगत होते.

दिवा विझण्यापूर्वी मोठा होतो अशी गत ठरली.

नेहमीप्रमाणे वार्षिक सुट्टीचा बेत ठरला. गाग्रा येथे जॉर्जियन लेखक संघाच्या विश्रामधामात तमाराने खोली आरक्षित करून ठेवली होती. तेथील ॲडमिनिस्ट्रेटर तिच्या ओळखीचे होते. रशियात किंवा भारतात ओळखींमुळे

अवघड कामे पटापट होतात.

सुट्टीनंतर हिवाळ्यात भारतात एकट्याने जाण्याचा इरादा होता. जुईचे पत्र आले. तिच्या भावी नवऱ्याची ओळख करून देण्याची तिची इच्छा होती. मामाचा निर्णय होत आला असावा असे तिच्या पत्रावरून समजले. पुढच्या तयारीसाठी काही गोष्टी निश्चित करण्यासाठी मुंबईला जायला पाहिजे होते.

प्रकृतीची आघाडी तेवढीशी चांगली नव्हती. सकाळी झोपेतून उठल्यानंतर सर्दीचा व कफाचा त्रास होत होता. दात घासण्यापूर्वी कोरड्या ओकाऱ्यांची भावना व्हायची. या तक्रारींकडे गंभीरपणे लक्ष दिले नाही.

गाग्राला गेलो. त्या दिवशी तेथे पावसाळी हवा होती. संध्याकाळी चालताना माझ्या टाचा दुखू लागल्या. दुसऱ्या दिवशी टाचांमधल्या वेदना वाढल्या. मला नीट चालवेना. हा प्रकार नवीन होता. एक दिवस किंचित ताप आला. तमाराने पळापळ केली. तापासाठी डॉक्टरचे औषध आणून दिले. टाचेतील वेदनांकडे आम्ही दोघांनी दुर्लक्ष केले. तसा माझा डावा पाय दोन-तीन वर्षांपूर्वी किंचित दुखत होता. म्हणून रेस्तराँमध्ये नाचणे बंद केले.

नेमक्या त्याच काळात तमाराची मुलगी गाग्रामध्ये विश्रांतीला आली.

इतक्या वर्षांत आम्ही तिघे योगायोगाने एकत्र विश्रांती घेत होतो. तान्या तिच्या मित्राच्या घरात उतरली होती. संध्याकाळी ती आमच्याबरोबर फिरत होती. तान्याचे केस व डोळे काळे आहेत. लहान चणीमुळे तिचे वय लहान दिसते. काही लोकांना ती माझी मुलगी वाटायची. विश्रामगृहातील चौकस बायकांनी विचारणा केल्या. ती तमाराची मुलगी आहे हे सर्वांना समजले. मॉस्कोला परतण्यापूर्वीच्या आदल्या दिवशी एका चौकस बाईला मी सहज सांगितले की, माझी मुलगी भारतात आहे.

इथेच खटकले. त्यानंतर तमारा एकदम घुम्म झाली. मॉस्कोत घरी वाद पेटला. ज्या अर्थी ती आई म्हणून मिरवते तर मी बाप आहे असे का सांगू नये ? तिला पटेना. मलाही तिचे पटेना. सुट्टीच्या आनंदाचा विचका झाला. मन फार उदास झाले. सहजीवनात अशा संघर्षासकट जगण्याची इच्छा नव्हती. संध्याकाळच्या वेळांना मद्यपानाचे प्रमाण वाढू लागले. मॉस्कोत आणखी राहण्याची इच्छा होईना. सर्व काही सोडून द्यावे अशी तीव्र भावना व्हायची. त्यातच पाठ दुखू लागली. टाचा दुखू लागल्या.

कचेरीत तान्या वेर्बित्सस्कायाने ह्या कटकटींमध्ये भर घातली. मुंबईहून पत्र आले होते. ते पत्र तिने व विभाग प्रमुख श्रीमती नदेज्दा बोर्दुकोवा यांनी महिनाभर तसेच फायलीत ठेवून दिले होते. लोकवाङ्मयवाले जागे झाले होते. क्षुल्लक, हास्यास्पद तक्रारी होत्या. पुन्हा जुनी युक्ती वापरली होती. नव्या ऑर्डरी थांबवल्या. जुनी पुस्तके स्वीकारण्यास नकार दिले. मनाचा ताण विलक्षण वाढला. मसाज करायला येणाऱ्या अतींद्रिय शक्तीवाल्या गालीनाने सल्ला दिला. रक्त आणि लघवी तपासून घ्या. मधुमेहाचा संशय आहे. ताईला मधुमेह होता. तेव्हा मला होणे स्वाभाविक होते. त्याप्रमाणे तपासणी केली. संशय खरा ठरला. आहारात एकदम बदल केले. मद्यपान कमी केले. अवघ्या एका महिन्यात माझे वजन उतरले. गालीना पुन्हा पुन्हा बजावत होती, "भारतात एकटा जाऊ नको. जर गेलासच तर तमाराला बरोबर घेऊन जा !" तिच्या सांगण्याकडे मी लक्ष दिले नाही.

सात नोव्हेंबर १९८७ रोजी 'एअर इंडिया'चे विमान निश्चित केले. त्यासाठी नेहमीच्या मारामाऱ्या घडल्या. बोर्दुकोवांनी मुंबईच्या माणसांसाठी पत्रे लिहून दिली. शेवटच्या क्षणी विमान कंपनीचा फोन आला की, विमान फक्त दिल्लीपर्यंत जाईल. मानसिक ताणांमध्ये वाढ झाली. मग परत फोन आला. विमान मुंबईला जाईल. सारखे बेत बदलत होते.

प्रयाणाच्या आदल्या संध्याकाळी माझ्या नेहमीच्या सोफ्यावर व्हिस्की पीत बसलो. मनात विचारचक्र चालू होते. मृत्यूबद्दल विचार येत होते. मी दीर्घायुष्यी असण्याचा संभव नाही असे वाटले. मरण अटळ आहे. जगण्याचा हव्यास नव्हता. दर क्षणी मन थकून जायचे. ज्या छोट्यामोठ्या इच्छा होत्या त्या पूर्ण होत आलेल्या ! मुलाबाळांचे लेंढार नाही. एकच मुलगी अभ्यासात हुशार. पदवीधर लौकर होईल. म्हणजे प्रचंड जबाबदाऱ्या नव्हत्या. त्याच वेळी मी मेलो असतो तर त्याचे दुःख विशेष नव्हते. कदाचित मॉस्कोला परत येऊच नये असा मनात विचार डोकावला. तमाराच्या गेल्या महिन्यातील अबोल्यामुळे आणि कचेरीतील क्षुद्र कारवायांमुळे मन विटले होते. पण परत न आलो तर भारतात राहणार कुठे ? करणार काय ? मनाची विलक्षण घालमेल झाली. मी अनुवाद केलेल्या पुस्तकांवर ओझरती नजर टाकली. मामा वरेरकरांनी बंगाली साहित्य मराठीत आणले. तसेच अनिल हवालदारने रशियन साहित्य मराठीत आणले

असे आपल्या पश्चात लोक म्हणतील ? पुस्तकांची संख्या शंभरापलीकडे गेली होती. प्रत्येक पुस्तकाच्या पाच हजार प्रती. म्हणजे किमान पाच लाख प्रती. महाराष्ट्राबाहेर मराठी पुस्तके एवढ्या मोठ्या प्रमाणावर मुद्रित होतात ! ही अभूतपूर्व गोष्ट आहे ! सोळा वर्षांपूर्वी ह्या कल्पनेचे बीज रोवले. संस्थापकालाच उखडून काढतात कधी कधी. अशी विचारमालिका चालू होती. तमाराबद्दल चिंता नव्हती. तिची ती स्वतंत्र जगण्यास समर्थ होती. घरातील जेवढे सामान होते ते तिलाच देऊन टाकायचे. तिचे स्वतःचे घर होते. पदरी थोडेफार पैसे होते. पंचावन्नाव्या वर्षानंतर पेन्शन मिळाली असती. दोन सूटकेस आणि एक हँडबॅग एवढे सामान घेऊन रशियात आलो होतो. तेवढेच सामान परत जाताना घेणार होतो. वस्तूंचा हव्यास नव्हता. त्यात समाधानाची बाब म्हणजे मामा, बेबी, जुई यांच्यापैकी कुणीही 'आणा'चा घोष करीत नव्हते. त्या दृष्टीने ही आघाडी आनंददायी होती.

घरातून बाहेर निघालो. तमारा खालच्या मजल्यापर्यंत बरोबर आली. टॅक्सी आली. नव्या फर कोटातील तमाराची आकृती निरोपासाठी हात हलवत होती.

विमानतळावर 'एअर इंडिया'चा कर्मचारी म्हणाला की, 'विमान दिल्लीपर्यंतच जाईल. पुढे नवे विमान देतील.' तो मराठी माणूस होता. त्याच्या नातेवाईंकासाठी त्याने पत्र दिले. पत्रावर भारतीय तिकिटे होती. फक्त मुंबईत पेटीत पत्र टाकायचे काम होते.

नवीन फ्रेंच एअरबसच्या आरामशीर एक्झीक्यूटिव क्लासमध्ये आसनस्थ होतो न होतो तोच जुना मित्र पर्सर हेमंत तिवारी दिसला. दिल्लीपर्यंतचा प्रवास सुखाचा झाला.

पण दिल्लीच्या विमानतळावरच्या ट्रान्झिट लाऊंजमध्ये उरलेली रात्र बसून काढावी लागली. पहाटे नवे विमान आले. सकाळी मुंबईत उतरलो. अवघ्या दीड महिन्यानंतर परत जाणार होतो. सामान माफक होते. एक हलकी सूटकेस आणि हँडबॅग.

टॅक्सी विमानतळाच्या आवाराबाहेर पडली तोच एक बस भरधाव आली. थोडक्यात बचावलो. नाहीतर टॅक्सीसकट चेंदामेंदा झाला असता. मरण केसाच्या अंतरावर होते. घरी पोहोचलो. दुपारी जेवणापूर्वी मामाबरोबर व्हिस्कीचे दोन पेग घेतले. रात्री जागरण झाले होते म्हणून झोपलो. एरवी दुपारी

झोपायची सवय नव्हती.

जेव्हा जाग आली तेव्हा मी कुठे आहे हे क्षणभर समजेना. खूप गाढ झोप लागली होती. काही आठवत नव्हते. शरीराची डावी बाजू जड वाटली. काही वेळा झोपेत अंग अवघडते अशा समजुतीने लघवीला जाण्यासाठी संडासकडे निघालो. माझ्या ह्या हालचाली 'स्लो मोशन पिक्चर' मधल्यासारख्या होत्या. लघवी केल्यानंतर हात व तोंड धुतले. बेडरूममध्ये आरशासमोर उभा झालो. माझे तोंड डावीकडे विचित्र वाकडे बनले होते !

बेबी व मामा बाहेरच्या खोलीत बसले होते. मी तेथे गेलो. बेबी एकदम म्हणाली, "अनिल, तुझं तोंड का वाकडं दिसतं ?" "मला चहा पाहिजे !" मी जेमतेम बोललो. तोंडातून स्पष्ट शब्द आले नाहीत. चहा प्यायल्यानंतर बरे वाटले. ओठांवरून हात फिरवला. नंतर वाणी नेहमीसारखी स्पष्ट बनली. विशेष गंभीर गोष्ट नव्हती असे वाटले. अति थकव्यापायी तसे घडले असेल अशी मनाची समजूत घातली. घडल्या प्रसंगाबद्दल मी चर्चा केली नाही. माझा स्वभाव मामा-बेबी जाणत होते. म्हणून त्यांनीही त्याबाबत कसलाही उच्चार केला नाही.

दुसऱ्या दिवशी सकाळी नेहमीप्रमाणे व्यवस्थित होते. तोंडाचा वाकडेपणा केव्हाच गेला होता. नित्यक्रम केले. जुई व सचिन आले. मी सर्वांना भेटवस्तू दिल्या. सगळ्यांच्या मजेत गप्पा चालू झाल्या. शँपेनची बाटली उघडली. भावी जावई प्रथम भेटला होता ! पहिल्याच भेटीत त्याचे माझे सूर जुळले.

नंतरच्या दिवशी बँकेतून पैसे काढून आणले. लोकवाङ्मय गृहाच्या कचेरीत मॅनेजरांची भेट घेतली. मॉस्कोहून आणलेली पत्रे दिली. माझ्या अनुवादांबाबत त्यांनी चकार शब्द काढला नाही. आश्चर्य वाटले. नंतर दिदीकडे धावती भेट दिली.

प्राथमिक कामे आटपल्यावर थीबाकडे गेलो. तेथे चार दिवस मुक्काम केला. त्याच्या मित्रांबरोबर मद्यपानाच्या बैठकी केल्या. एक दिवस श्रीकांतबरोबर वरळीला गेलो. तेथे एका छोट्या थिएटरमध्ये त्याने 'स्वामी' मालिकेचे दोन भाग दाखविले. शेवटी प्रत्यक्ष पडद्यावर निर्मिती करण्यात पपांना आणि श्रीकांतला यश आले. त्यात माझा सहभाग नव्हता याचा किंचित विषाद वाटला. 'फ्लोरा' रेस्तराँत एकत्र जेवलो. मी रशियात जाण्यापूर्वी या ठिकाणी रोज संध्याकाळी आमचे एकत्र जेवण होई. रेस्तराँचा चिनी मालक टोनी दोस्त

बनला. हास्यविनोद करून गेला. दिवसभर पळापळ घडली. संध्याकाळी थीबाच्या मित्रांबरोबर मद्यपान करताना थकल्यासारखे वाटले. लौकर झोपलो. सकाळी सात वाजताच फोन खणखणला. ल्योन्या अब्रामोव मुंबईत आला होता. मुंबई सेंट्रल स्टेशनापाशी कुठल्यातरी हॉटेलात उतरला होता. दुपारी बारा वाजता तेथे भेटायचे ठरले. लांबचा पल्ला मारायचा होता. जुहू ते घाटकोपर आणि घाटकोपर ते मुंबई सेंट्रल हा प्रवास टॅक्सीने केला. अब्रामोवची भेट झाली तेव्हा खूप थकलो होतो. त्याने तसे बोलूनही दाखवले.

दुसऱ्या दिवशी सकाळी मधुकर तोरडमल यांचे 'तिसरी घंटा' पुस्तक वाचायला घेतले. त्यांना फेस पॅरॅलिसिस झाला त्या भागापर्यंत वाचून झाले. मग अस्वस्थ वाटू लागले. दोन्ही दंडांमध्ये कळा येऊ लागल्या. खालच्या मजल्यावर गेलो आणि डॉ. शोभना मोघेला फोन केला. मी ताबडतोब जवळपासच्या डॉक्टरांकडे तपासून घ्यायला जावे असा तिने सल्ला दिला. त्याप्रमाणे बेबीला सांगितले. बेबी मला बरोबर घेऊन निघाली. घाटकोपरमध्ये मामा-बेबीचे वीस वर्षे वास्तव्य होते. त्यामुळे सगळ्या ओळखी होत्या. डॉ. अमृत व्होरांशी बोलताना मला माझे बोलणे चमत्कारिक वाटले. त्यांनी मला तपासले आणि तात्काळ सांगितले की, मला हाय ब्लडप्रेशर होते. त्याच्या जोडीला हायपरटेन्शन. मी ताबडतोब नर्सिंग होममध्ये दाखल व्हावे असेही आवर्जून सांगितले. हे रोग मला होते असे मी प्रथमच ऐकत होतो. जवळच्या नर्सिंग होममध्ये दाखल झालो. त्या क्षणापासून माझ्या आयुष्याला विलक्षण जोरदार कलाटणी मिळाली. खरी प्रक्रिया गाग्रापासून सुरू झाली असावी. मुंबईत उतरलो त्याच दिवशी थोडी चुणुक दिसली. पण स्वभावानुसार मी तिच्याकडे दुर्लक्ष केले. अखेर १६ नोव्हेंबर १९८७ पासून श्रीमान देवाजी यांच्या पटकथेनुसार माझ्या आयुष्यात भराभर प्रसंग निर्माण होऊ लागले. आपले जीवन चित्तथरारक व्हावे अशी पूर्वी इच्छा वाटायची. पण या घटनेपाठोपाठ अशी प्रसंगमालिका घडत गेली. माझी ती हौस पूर्ण फिटली !

रात्रभर सलाईनमध्ये डावा हात अडकला. दुसऱ्या दिवशी सकाळी डॉक्टरनी मला सावकाश सांगितले, "माझा डावा हात अर्धांगवायूने लुळा पडला होता." त्यानंतर मात्र बोलताना मी अडखळू लागलो. माझ्या वाणीवर परिणाम घडला. अधिक तपासणीअंती मला सेरेब्रल थ्रॉम्बॉसिसचा स्ट्रोक

आला होता. माझ्या मेंदूला सूज आली होती. सुदैवाने रक्तस्त्राव झाला नव्हता. डोक्याच्या मागील भागात रक्ताच्या दोन गाठी तयार झाल्या होत्या. अतिरक्तदाब आणि हायपरटेन्शन यांचा हा परिणाम होता. सारेच नवे होते.

एखादी व्यक्ती सेरेब्रल थ्रॉम्बॉसिसमुळे वारली अशा प्रकारच्या बातम्या पूर्वी वर्तमानपत्रात वाचल्या होत्या. तोच रोग मला झाला होता. पण मी मेलो नव्हतो. मरणाहून भयंकर यातना भोगाव्या लागल्या. चार दिवस नर्सिंग होममध्ये राहिलो. नंतर घरी एक दिवस जुईबरोबर बोलताना मनःक्षोभ झाला. मग परत चार दिवस नर्सिंग होम, सलाईन, गोळ्या वगैरे. बेबीची धावपळ सुरू झाली. ती बिचारी या भानगडींनी पूर्वीच विटून गेली होती. मामाने त्या रात्री माझ्याबरोबर जागून काढल्या.

माझ्या दुसऱ्या समस्या होत्या. मी कमी तिखटाचे जेवण खात होतो. म्हणजे वेगळे बनवायचे. मला पाश्चात्य पद्धतीचा संडास आवश्यक होता. मामाच्या घरात तशी सोय नव्हती. नर्सिंग होममध्ये तशी सोय मिळण्यास अडचण होती.

आजाराची बातमी वाऱ्यासारखी वेगात पसरली. श्रीकांत भेटायला आला. एक पायरी चढल्यानंतर दिदीला त्रास होतो. पण माझ्यासाठी ती हौसिंग बोर्डाच्या इमारतीचे चार मजले चढून आली. साठेसाहेब दोनदा धावत आले.

शेवटी मामाचे घर सोडले आणि दिदीकडे निघालो. तेथे चार दिवसांत मन विलक्षण उदास बनले. श्रीकांतच्या सोबतीने थीबाचे जुहूचे घर गाठले. डॉक्टरांनी माझी सिगारेट आणि व्हिस्की बंद केली. सिगारेटचे दुःख विशेष नव्हते. पण वीस वर्षांची सायंकालीन मद्यपानाची सवय होती. प्रथम प्रथम फार जड गेले. व्हिस्की जसा नियमित घ्यायचो त्याच नियमितपणे औषधाच्या गोळ्या घेऊ लागलो. एकदा नवी समस्या उद्‌भवली. थीबा मुंबईबाहेर जाणार होता. त्याच वेळी त्याचा नोकर कृष्णा रजेवर जाणार होता.

निवारा आणि भोजनाचा प्रश्न तेव्हापासून आतापर्यंत माझ्यामागे हात धुऊन लागला.

अशा प्रसंगी कॅ. अरुण गोडबोले आणि सौ. शोभा गोडबोले मदतीला धावले. वरसोव्याच्या त्यांच्या घरी मला घेऊन गेले. अरुण तर शाळेतील मित्र होता. विशेष कौतुक शोभाचे. दुखऱ्या पाठीचा त्रास असूनही तिने महिनाभर माझ्या खस्ता खाल्ल्या. माझ्यासाठी जेवण बनविण्याचा व्याप होताच. शिवाय

मला भेटायला येणाऱ्या लोकांसाठी चहा-कॉफी बनविण्याचा उद्योग फार मोठा. ह्या जोडप्याने आणि त्यांच्या दोन तरुण मुलांनी माझ्या संकटकाळात प्रेमाचा, आस्थेचा ओलावा दिला.

आजाराचे एकेक परिणाम लक्षात येऊ लागले. रस्त्यावर चालताना भीती वाटायची. शरीराचा तोल सांभाळणे अवघड बनू लागले. टी. व्ही. धूसर दिसू लागला. मोठे आवाज आणि प्रखर प्रकाश सहन होईनात. सदऱ्याची बटणे वरखाली लागायची. डाव्या हाताने उजव्या बाहीचे बटण लावता येईना. ढुंगण धुण्यासाठी उजवा हात वापरू लागलो. उजव्या हाताची नखे कापता येईनात. नखे कापण्यासाठी दुसऱ्यांची वाट बघायला लागायची. त्या वेळी खूप दुखायचे. थोडक्यात अपंगाचे परावलंबी जीवन सुरू झाले. माझे अस्पष्ट बोलणे कुणालाही समजेना. पण विचार शाबूत होते. स्मृती शाबूत होत्या. पूर्वायुष्याचा सारा पट मन:चक्षूंसमोर दिसायचा. तमाराची आठवण फार यायची. तीच मला या स्थितीमधून उठवू शकेल असा विश्वास वाटला. मॉस्कोचे परतीचे तिकीट होते. डॉ. अमृत व्होरा विलक्षण आत्मविश्वासी. त्यांनी मला मॉस्कोला जाण्याची परवानगी दिली. वर्षभर पुरतील एवढ्या गोळ्या मी सोबत घेतल्या. कारण मॉस्कोत औषधांचा तुटवडा. आजारापूर्वी बँकेतून रोख पैसे आणले होते ते उपयोगी पडले. नर्सिंग होम, औषधे, डॉक्टरची फी, टॅक्सी इ. सर्व खर्च माझे मीच निभावले.

माझ्या समाचाराला एम्. पी. राव, शेखर परांजपे, पपा जागीरदार, दिदी, दिलीप बर्वे, प्रदीप दीक्षित आदी मंडळी धावत आली. पपांना माझ्या उजव्या हाताची काळजी होती. मद्यपानाबद्दल त्यांनी विचारणा केली. जाताना मिस्कीलपणे म्हणाले: "मी तर अजून पितो !" माझा उजवा हात शाबूत होता. ही श्रीमान देवाजीची कृपा. अशा प्रसंगी माणूस आस्तिक बनतो. मी सुद्धा तसा झालो. माझी वाणी सुधारावी म्हणून कुंदा कान्हेरेने अथर्वशीर्ष वाचायला सांगितले. त्याच्या जोडीला 'ओम् नमः शिवाय' एकशे आठ वेळा रोजच्या रोज म्हणायला. श्रद्धेने मी तिचे सांगणे पाळू लागलो.

योगायोग म्हणजे त्या वेळी मुंबई दूरदर्शनवरच्या रशियन अनुबोधपटांमधून माझा आवाज ऐकू येऊ लागला. भारत आणि सोविएत संघ यांच्या मैत्री महोत्सवांचे ते दिवस होते. गेल्या बारा वर्षांत 'फिल्म एक्सपोर्त'

मध्ये शेकडो सोविएत अनुबोधपटांना आवाज दिला होता. तो आता महाराष्ट्रात ऐकू येऊ लागला. या घटकेपर्यंत पूर्वी कुठेही कधीही एकही चित्रपट महाराष्ट्रात दाखवलेला नव्हता. माझ्या मित्रांनी माझा आवाज ओळखला. स्वत:चा पूर्वीचा आवाज ऐकताना मनात संमिश्र भावनांचा कल्लोळ उठला.

गोडबोले कुटुंबाच्या जवळच कॅ. सुभाष पटवर्धन राहत होता. तो आणि सौ. जयश्री पटवर्धन माझ्या समाचाराला येत होते. मला एकाकी वाटू नये अशी सर्व मित्रांची खटपट होती. एक दिवस आर. एम. शहा भेटायला आले. त्यांनी त्यांच्या ऑफिसमार्फत मॉस्कोला फोन करून तमाराला हकीगत कळविली.

दरम्यान थीबा आणि कृष्णा परत आले. दिल्लीला जाण्यापूर्वी थीबाकडे एक दिवसापुरता राहायला गेलो. थीबाची मैत्रीण लीला परुळेकर भेटली. तिने मला धीर दिला. या सुस्वभावी स्त्रीच्या वागण्यात विलक्षण सुंदर मधुरता आहे. भल्या पहाटे थीबा आणि सुभाष पटवर्धन मला सहार विमानतळापर्यंत पोचवायला आले. इमिग्रेशनपर्यंत त्यांनी सोबत केली. एकटा विमानाच्या दिशेने निघालो. दिल्लीत विमानतळावर घाटणेकर येणार होते. मित्रांच्या मोटारी आणि टेलिफोन दरपावली उपयोगी पडत होते. विमानात टॉयलेटमध्ये लघवी करायला पंचाईत झाली. पर्सरने मदत केली. थीबाने ‘एअर इंडिया’ला खास सूचना दिल्या होत्या. दिल्लीत विमानातून बाहेर पडताना मदतीला माणूस उभा होता. सामानापर्यंत तो सोबतीला आला. विमानतळाबाहेर त्याने सोडले. बाहेर राजू घाटणेकर वाट बघत होता. बाळासाहेब घाटणेकरांचे नागपूरचे बंधू आजारी पडले होते म्हणून घाटणेकर दांपत्य नागपूरला गेले होते. ‘नवभारत टोबॅको’ ची मोटार दिमतीला होती. त्यांच्या गेस्ट हाऊसमध्ये राहण्याची सोय झाली. ह्या सर्व व्यवस्था संपर्क साधून माझ्या मीच केल्या होत्या.

मुंबईपेक्षा दिल्लीच्या हवेत जास्त बरे वाटले. गेस्ट हाऊसच्या प्रशस्त अंगणात फिरता येत होते. बाळासाहेबांची भेट झाली. ते येईपर्यंत राजू करमणूक करीत होता. मॉस्कोला जाण्यापूर्वी यशवंत प्लेसमध्ये गेलो. तमारासाठी कातडी कपडे घ्यायचे होते. नंतर पवन-पूनम जैन भेटले.

विमानतळापर्यंत बाळासाहेब आले. आतमध्ये तिकीट, सामान वगैरे सोपस्कार पूर्ण करताना फार अवघड बनले. एका हाताने सर्व कामे पार पाडायची. रक्तदाबामुळे काही सुचेना. आपल्याकडची माणसांची गर्दी

त्रासदायक ठरते. अर्थात रेल्वे स्टेशनपेक्षा विमानतळ जास्त बरा.

मॉस्कोत विमानतळावर तमारा आणि मनोज शिवनानी मला घ्यायला आले होते.

मनोज 'थरमॅक्स'मध्ये गगन पटवर्धनचा सहकारी होता. ह्या मनोजला दहा वर्षापूर्वी प्रथम पाहिले होते. तेव्हा तो विद्यार्थी होता. शिक्षण पूर्ण केल्यानंतर तो 'थरमॅक्स' मध्ये नोकरीला लागला होता. नंतर कु. देवयानी फडकेच्या प्रेमात पडला. देवी रशियन भाषा शिकत होती. प्रणयाराधनाच्या काळात तिच्यासह तो आमच्या घरी आला होता. छान जोडी आहे. त्यांच्या पुण्यातील विवाहानंतर त्याची बदली मॉस्कोला झाली होती. मनोजने अल्पावधीत प्रगती केली.

मनोजने मला आणि तमाराला घरापर्यंत पोहोचविले. पांढऱ्यास्वच्छ बिछान्यावर पहुडलो. तमाराच्या सान्निध्यात आलो. माझ्या घरात आलो होतो.

मॉस्कोत हिवाळा होता. दुसऱ्या दिवशी नववर्षाची पूर्वसंध्या होती. रात्री बारापर्यंत जागणे मला शक्य नव्हते. तमारा आणि तान्या रात्री बारा वाजता नाममात्र शँपेन प्यायल्या. तान्याचा मित्र सेर्गेय आला होता. सेर्योझा थोडे थोडे इंग्रजी जाणतो. एका उपमंत्र्याचा मुलगा आहे. सुस्वभावी आहे.

अतिंद्रिय शक्तीवाली गालीना आली. मी तिचे ऐकले नव्हते म्हणून माझी खरडपट्टी काढून गेली. माझ्यावरच्या भावी संकटाची तिला खरोखरच चाहूल लागली होती का ? कोण जाणे ! संकट मात्र कोसळले. आघात झाला खरा !

१९८८ साल उजाडले. ह्या सालात जीवनाला आणखी कलाटणी मिळणार होती !

*

# नवी कलाटणी

मॉस्कोतील 'प्रगती' व 'रादुगा' प्रकाशनांमधील एकूण पंधरा वर्षांच्या नोकरीत मी 'सिक लीव्ह' कधीही घेतली नव्हती. रशियनमध्ये तिला 'बुलेटिन' म्हणतात. मला स्ट्रोक आला तेव्हा माझी वार्षिक रजा होती. म्हणून संपादिका तान्या वेर्बित्सस्कायाने आता मला पंधरा दिवसांचे 'बुलेटिन' घेण्याचा सल्ला दिला.

तिचा सल्ला स्वीकारण्यात मी फार मूर्खपणा केला. तान्या कायम आजारी. वर्षातून सहा महिने 'बुलेटिन'वर असायची. तसा फुकट पगार खायची तिला सवय होती. गंमत म्हणजे 'रादुगा'मध्ये 'बुलेटिन'वर असतानाही ती माझ्याबरोबर 'फिल्म एक्सपोर्त'मध्ये काम करायची. तेथे तिला वरकमाई व्हायची. पण कामाकडे लक्ष न देता स्टुडिओतील रेजिस्सोर बायकांबरोबर स्वतःच्या व आपल्या दोन मुलींच्या आजारांबद्दल गप्पा छाटायची.

पॉलीक्लिनिक क्र. ६ मधील डॉक्टरना घरी बोलावण्याचा आणखी मूर्खपणा केला. एखाद्या डॉक्टरच्या देखरेखीखाली असावे असा, असे करण्यामागे हेतू होता. वैद्यकीय सेवा सोविएत नागरिकांप्रमाणे आम्हालाही मोफत होती. आम्हा परकीयांसाठी ब्येलारुस्काया स्टेशनजवळचे पॉलीक्लिनिक क्र. ६ नेमलेले होते. 'इन्टुरिस्ट' ते चालवायची. नालायक, भ्रष्टाचारी डॉक्टर भरलेले होते. त्यांना एकही परकीय भाषा येत नव्हती. परकीय भाषा जर येत असली तर सोविएत कर्मचाऱ्यांना वीस टक्के पगार जास्त मिळतो. असे पगार फुकट खायची सवय आहे.

मला तपासायला आलेली डॉक्टरीण विचित्र आक्रस्ताळी होती. मुंबईतील सर्व कागदपत्र तिच्यासाठी मीच रशियनमध्ये अनुवादित करून दिले. हे रशियन न्यूरॉलॉजिस्ट भयंकर असतात. स्तालिनच्या काळात या न्यूरॉलॉजिस्टांनी अनेक बुद्धिमंतांना वेड्यांच्या इस्पितळांमध्ये डांबले होते. तमारा हा विषय वारंवार बोलायची.

'बुलेटिन' घेतले म्हणजे ते 'बंद' करायला हवे होते. इथे परत माझा 'अभिमन्यू' झाला. मी 'बरा झालो' असे प्रमाणपत्र न्यूरॉलॉजिस्ट देईना. तिच्या प्रमाणपत्राविना प्रकाशन गृहाला मला परत कामावर घेता येईना. म्हणजे पगार मिळण्याची पंचाईत. विभाग प्रमुख नदेज्दा बोर्दुकोवा यांना ह्या प्रकारामागची समस्या उमगली होती. वेर्बित्सस्काया नुसते खांदे उडवायची. दोन आठवडे ताणात काढले. न्यूरॉलॉजिस्ट कदाचित माझी वेड्याच्या इस्पितळात रवानगी करील अशी धास्ती तमारा सतत घालायची.

म्हणजे 'रजा नको, पण डॉक्टरीण आवर' अशी परिस्थिती बनली. माझ्या चेहऱ्यावर अर्धांगवायूचा परिणाम कितपत होता हे तपासण्यासाठी त्या डॉक्टरणीने सुईचा चरा काढला. रक्त निघाले. ही झारकालीन रानटी पद्धत अजून प्रचलित आहे. सुदैवाने भारतीय औषधे माझ्यापाशी मुबलक होती. त्यांचे सेवन नियमित करायचो. शेवटी तमाराने दुसरा पुरुष न्यूरॉलॉजिस्ट गाठला. रशियात पुरुष कर्मचारी जास्त बरे. अधिकारपदावरच्या बायका अत्यंत नालायक. म्हणूनच अद्यापपावेतो सोविएतमध्ये सर्वोच्च पदावर एकही महिला मंत्री नव्हती. पूर्वी मादाम फूर्त्सेवा होती. लाचलुचपतीच्या भानगडीत सापडल्यामुळे तिने आत्महत्या केली म्हणे. ह्या पुरुष न्यूरॉलॉजिस्टने माझे 'बुलेटिन' बंद केले. तो प्रश्न मिटला.

अनुवाद करायला माझ्या टेबलापाशी पुन्हा बसलो. विख्यात एस्तोनियन लेखिका लिल्ली प्रोमेत हिचा कथासंग्रह अपुरा अनुवादित झाला होता. ते उरलेले काम पुढे सुरू केले. तीन वर्षांपूर्वी कामाची जेव्हा टंचाई होती तेव्हा मीच वरिष्ठांना हे पुस्तक सुचविले होते. प्रोमेतची शैली खुसखुशीत. विशेषत: 'ग्लास्नस्त'च्या काळात अगदी योग्य ठरेल. 'एका उन्हाळ्याचे जलचित्र' हा कथासंग्रह पूर्ण अनुवादित केला. वसंताच्या मोसमापर्यंत म्हणजे एप्रिलअखेर हे काम झाले.

रस्त्यावरचे बर्फ कमी झाल्यानंतर एकटा स्वतंत्रपणे फिरायला जात होतो. हिवाळ्यात आरंभी तमारा यायची. त्या वेळी ओव्हरकोट वगैरे जामानिमा करताना हाल व्हायचे. डाव्या पंजात कातडी हातमोजा बसेना. बोटे ताठ व्हायची. दहा-पंधरा मिनिटे खटपट करून हातमोजा कसाबसा हातात सरकायचा. त्या वेळी रक्तदाबावर परिणाम व्हायचा. रस्त्यावर पाय लटपटायचे. तमाराने आहारावर कडक नियंत्रण ठेवले होते. मधुमेह केव्हाच आटोक्यात आला होता.

मे महिन्यात नव्या समस्या उद्‌भवल्या. कामासाठी नवे पुस्तक मिळेना. वेर्बित्सस्कायाचे गबाळे वागणे पूर्वीचेच होते. मूळ मजकूर व्यवस्थित स्वरूपात नीट तपासून देत नव्हती. पूर्वी मी निभावून नेत होतो. कारण ती उच्च आणि कमी रक्तदाबाची रुग्ण होती. हे ध्यानात घेऊन मी सहकारी वृत्तीने काम करायचो. एकदा तर कचेरीत तिची प्रकृती बिघडली होती. तेव्हा टॅक्सीमार्फत तिला तिच्या घरापर्यंत पोचविले होते. पण आता मीच आजारी होतो. म्हणून तिच्या वर्तनाचा त्रास होऊ लागला. बऱ्याच कटकटीनंतर शोलोखोवचा कथासंग्रह मिळाला.

एक दिवस तमाराच्या पाठीत उसण भरली. रशियनमध्ये त्याला 'रादीकुलीत' म्हणतात. तिला ताठ चालता येईना. दुकांनामधून सामान आणण्याचे काम मी करू लागलो. एका हातातून पिशव्या कशाबशा धरून लटपटत चालत होतो. त्यातच तिची मुलगी तान्या घरी आली. आईला मदत करण्याऐवजी तणतणत भांडून गेली. घरात स्वयंपाक करायला हवा होता. माझा तर त्या क्षेत्रातील संपूर्ण आनंद ! तमारा कसेबसे काम उरकायची. संपूर्ण महिनाभर तिचे दुखणे चालले होते. मग तिची नेहमीची पळापळ सुरू झाली.

टी. व्ही. वर भारतीय उत्सवाचे कार्यक्रम खूप बघायला मिळत. जुलै महिन्यात आशा भोसले यांच्या गायनाचा कार्यक्रम खूप गाजला आणि रंगला. त्या कार्यक्रमाची तिकिटे माझ्यापाशी असूनसुद्धा मी गेलो नाही. तमारा आणि तिची विधवा मैत्रीण लीदिया अदामोवना कार्यक्रम पाहायला गेल्या. लात्वियन वंशाची लीदिया अदामोवना साठीपलीकडे असूनही उत्साही आहे. तिचा नवरा ग्रूझिन होता. तिशीतील तिचा मुलगा इगर थोडा तोतरा बोलतो. बाईची स्वतःची मोटार आहे. छान चालवते. पेन्शनर आहे. ती आणि तमारा रोजच्या सौनाला किंवा पोहायला जायच्या.

ऑगस्टमध्ये तान्या सेर्गेयबरोबर पिचुंदाला गेली. त्यांचे प्रणयाराधन जवळ

जवळ आठ वर्षं चालू होते. सप्टेंबरात जेव्हा ती परत आली तेव्हा तमाराचे घरातील वागणे एकदम बदलले. जेवायला वाढताना वसावसा ओरडू लागली. शिवीगाळ करायची. जुईचा उद्धार करायची. जेवणाला मुद्दाम उशीर करायची. मला भूक सहन होत नाही. जराशी सुधारत आलेली माझी प्रकृती परत बिघडली. माझे दहा किलो वजन कमी झाले होते. या सर्व काळात घरखर्चासाठी पैसे तिला नियमितपणे देत होतो. घरात जिणे असह्य झाले होते. मुंबईत मामाचा फ्लॅट अजून विकला जात नव्हता. त्याच वेळी त्याच्या कंपनीत संप चालला होता हे मला समजले नव्हते. संकटे एकाच वेळी चारही दिशांनी येतात. फोनवरून संपर्क साधायचा प्रयत्न करीत होतो. त्यांची पत्रे फार उशिरा मिळत. परिणामी माझ्याकडून संतापी पत्रे जायची. त्यातून मामा आणि बेबी दुखावले गेले.

कचेरीत काम मिळेना. सुदैवाने जुलै महिन्यात दोन वर्षांसाठी नवा करार झाला. आता नवा नियम होता. दोन दोन वर्षांसाठी नवा करार व्हायचा. दोन्ही पक्षांना सोयीचे होते. नवा करार करण्यापूर्वी संपादकाची अनुमती आवश्यक असायची. वेर्बित्सस्कायाने अनुमती दिली. त्यानंतर आमचे संबंध बिघडले. बोर्दुकोवांकडे वेर्बित्सस्कायाविरुद्ध माझ्या लेखी तक्रारी सुरू झाल्या. माझी विधाने मी प्रत्यक्ष पटवून देत होतो. पण बोर्दुकोवांनी तान्याबद्दल कोणतीही कृती केली नाही. त्या तक्रारी दडपून ठेवल्या. डायरेक्टरपर्यंत कधी गेल्या नाहीत. माझ्या अनुवादाचा दर्जा बिघडला अशी कुरबुर करायला तान्याने आरंभ केला. माझ्यापाशी काम नव्हते. कचेरीपाशी पैसे कमी पडत होते. त्यातच कनिष्ठ संपादक निकोलायला प्रकाशन गृहाच्या खर्चाने मराठी जास्त चांगले शिकण्यासाठी म्हणून पुण्याला पाठविण्यात आले. त्याच्यासाठी प्रचंड रक्कम खर्च करण्यात आली. रशियन कम्युनिस्ट मालकांचे हे खास वैशिष्ट्य आहे. मालक नोकराला पिळून घेतो हे सर्वश्रुत सत्य आहे. कम्युनिस्ट मालकासारखा पिळवणुकबहाद्दर जगात दुसरा मालक नाही.

दरम्यान एम्. पी. राव, विजय पाध्ये, गगन पटवर्धन, मनोज शिवनानी घरी भेटायला येत होते. त्यांच्यामार्फत भारतीय औषधांचा सतत पुरवठा होत होता. औषधे, चहा, कॉफी, बिस्किटे आणून देत. रशियन बनावटीची बिस्किटे भारतातील रस्त्यावरची कुत्रीसुद्धा खाऊ शकणार नाहीत.

करार नवा बनल्यामुळे नोव्हेंबर-डिसेंबरात वार्षिक सुटीवर भारतात जाण्याचा बेत झाला. डॉ. व्होरांना माझी प्रकृती परत व्यवस्थित दाखवायला हवी होती. सकोलनिकी प्रदेशातील घराजवळच्या पॉलीक्लिनिकमध्ये साधा रक्तदाब तपासून घेणे महाकठीण. फिजिओथेरपी मिळालीच नव्हती. हात तसाच ताठ होता. कुशीवर झोपताना हात दुखायचा. उताणे झोपल्यानंतर पाठ, कंबर दुखत.

माझ्याबरोबरच तमारासाठी तिकीट मिळणार होते. त्यासाठी तिच्या व्हिसाचे अर्ज भरले. ऑफिसने तिकिटे दिली. प्रयाणाची तारीख ठरली. दिवाळी मला टाळायची होती. फटाक्यांचे आवाज नकोसे होते. येण्याबद्दल तमारा धरसोड करायला लागली. मला जास्तीत जास्त मानसिक त्रास व्हावा असे ती प्रयत्न करीत होती.

सप्टेंबरअखेर बाळासाहेब घाटणेकर मॉस्कोत आले. हॉटेल 'कॉस्मॉस' मध्ये उतरले. संध्याकाळचे भेटायला आले. घरात आल्यानंतर त्यांच्या ध्यानात आले की, त्यांची हातातील कातडी पिशवी हरवली होती. हजारो रुपयांचे प्रवासी चेक गेले. त्याबरोबरच परतीचे विमान तिकीट. सुदैवाने पासपोर्ट हॉटेलच्या खोलीत होता. सूटकेसच्या किल्ल्या हरवल्या होत्या. शोधाशोध सुरू झाली. तक्रारी नोंदवल्या. पण परत काहीही मिळाले नाही. चेकचे पैसे बुडणार नव्हते. 'एअर इंडिया'ने योग्य चौकशीनंतर नवे तिकीट लिहून दिले. संतोष गांगुलीकडची किल्ली बाळासाहेबांच्या सूटकेसला लागली. ते प्रश्न मिटले.

पण माझ्या घरात प्रचंड उलथापालथ होत होती. दिवसभर बाळासाहेबांबरोबर मी फिरत होतो. त्यांच्याकडून दिवाळीच्या नेमक्या तारखा समजल्या म्हणून मी प्रयाणाची तारीख १० नोव्हेंबरवरून १९ नोव्हेंबरवर पुढे ढकलली. 'एअर इंडिया'साठी आधीच खटपट केलेली होती.

रात्री माझ्या टेबलाच्या कप्प्यातील पैशाचे पाकीट उघडले. नेहमी असणारे शंभर रूबल नव्हते. पाकिटाशेजारीच दोन हजार रूबल एका लिफाफ्यात पडले होते. घरात तमाराशिवाय दुसरे कुणी वावरत नव्हते. मी तिला विचारले. मी चोरीचा आरोप करतो असा तिने कांगावा केला. शांतपणे वॉर्डरोबमधील कोटाचा खिसा तपासला. त्यात चाळीस रूबल होते. म्हणजे साठ रूबल गायब होते. घरात अठ्ठावन रूबलचा नवा व्हॅक्युम क्लीनर उभा होता. तो तान्यासाठी आणलेला असावा. कारण घरात व्हॅक्युम क्लीनर होता. एकूण प्रकार ध्यानात

आला. झोपण्यापूर्वी तमारा थंड स्वरात म्हणाली: "मी तुझ्याबरोबर मुंबईला येणार नाही. तान्या ९ नोव्हेंबरला सेर्गेयबरोबर लग्न करतेय. लग्नाबाबत बाळासाहेबांजवळ उच्चार करू नको. तू मुकाट जा. तुझ्याबरोबर जगणं अशक्य झालंय. आता तू माझ्यावर पैसे चोरल्याचा आरोप करू लागलास. तुझ्या डोक्यावर परिणाम झालाय. म्हणून उद्या सकाळी तुला वेड्यांच्या इस्पितळात घालीन. सकाळीच ॲम्ब्युलन्स मागवीन. त्यापूर्वी हे अपार्टमेंट माझ्या नावावर करून दे."

हे ऐकल्यानंतर कुणाला झोप येईल ? ह्या परक्या मुलखात अपंग अवस्थेत होतो. इथली समाजव्यवस्था मला ठाऊक होती. आम्ही राहत होतो ते अपार्टमेंट प्रकाशन गृहाच्या नावावर होते. त्याच्यावर तमाराचा डोळा होता. तिची विचारधारा चुकीची अवास्तव होती. तान्याचे लग्न झाल्यानंर तिचे स्वतःचे अपार्टमेंट तान्याला पूर्ण देऊन टाकायचे आणि माझे अपार्टमेंट गिळंकृत करायचे असा तमाराचा डाव होता. तिचा लोभ कळसाला पोहोचला होता. माझ्या असहाय अवस्थेचा फायदा घेऊन ती धमकी घालत होती. एकदा इस्पितळात जर का अडकलो तर कधी सुटका नव्हती. पूर्वी अशा केसेस ठाऊक होत्या.

पण 'ग्लास्नस्त' च्या काळात कायदा बदलला होता हे तमाराला आणि मलाही माहीत होते. कुणाही व्यक्तीला तिच्या मर्जीविरुद्ध इस्पितळात डांबण्यास आता मनाई होती. स्तालीनकालीन कायदा मोडीत निघाला होता.

तरीही मी सहजासहजी हार जाणार नव्हतो. रात्रभर विचार केला. गेल्या दोन महिन्यांमधल्या छळाला कंटाळलो होतो. आदल्या संध्याकाळी शैला डांग्यांबरोबर फोनवर सूचक बोलून ठेवले होते. कधीतरी मी त्यांच्याकडे राहायला येईन असे त्यांना म्हणालो होतो. त्यांनी होकार दिला. त्यांचे अपार्टमेंट मोठे आहे. त्यात माझ्यासारखा पाहुणा सहज सामावला असता.

सकाळी फोनची घंटी बारीक, तुटक वाजली. जागा झालो. पुढे काय करायचे ते मला माहीत होते. प्रातर्विधी आटोपले. सूटकेसमध्ये कपडे भरले. भरपूर रूबल, पासपोर्ट, तिकीट वगैरे बरोबर घेतली. बाळासाहेबांना हळूच फोन केला. त्यांना टॅक्सीसह लौकरात लौकर बोलावले. 'माझ्या घराखाली टॅक्सी थांबवून ठेवा आणि मी राहायला येतो' असा शैलाताईंना फोन करा असा निरोप

दिला. एरवी फार चौकशा करणारे बाळासाहेब त्या सकाळी पटकन हो म्हणाले.

बाळासाहेब आले. मी सूटकेससह त्यांच्याबरोबर निघालो. अर्धवट झोपेतील तमारा गोंधळून बघत होती. "तुम्ही काय करताय ?"

"तू या घरातून जा असं तुला कित्येक वेळा सांगितलं होतं. पण मीच जातो !" मी.

माझ्याच घरातून मी पळून गेलो. असह्य जीवनापासून पळून गेलो ! मला चांगले जीवन जगायचे होते ! कितीही संकटांना तोंड द्यायला सज्ज होतो. माझ्यात किती खंबीरपणा, चिवटपणा आहे ह्याची माझ्या नजीकच्या माणसांना कल्पना नाही. जेव्हा माझ्या अस्तित्वावरच घाला आला तेव्हा हा शेवटचा उपाय मी योजला. माझी अपंगता विसरलो होतो. पुढे नेमके काय करायचे हे डोळ्यांना दिसत होते. मनाला माहीत होते. मी कृती करीत होतो. हात जोडून स्वस्थ बसणे मला मान्य नव्हते. अज्ञातात बेधडक जात होतो. जे घडेल त्याला तोंड देण्याची सज्जता होती. त्या घरातून तमाराला बाहेर काढायचे होते. अपार्टमेंट ऑफिसच्या ताब्यात परत देण्याची माझी इच्छा होती. मला कचेरीत बदनाम करण्याची तमाराने धमकी दिली होती. त्यापूर्वीच तिच्याविरुद्ध कचेरीत तक्रार करायला हवी होती.

शैलाताईंच्या घरी थोडे स्थिरस्थावर झाल्यानंतर साडेनऊ वाजता ऑफिसात फोन केला. टॅक्सीने प्रत्यक्ष गेलो. बोर्दुकोवांपाशी लेखी तक्रार नोंदवली. एकूण परिस्थिती त्यांच्या ध्यानात आली. तमारापासून लौकरात लौकर घटस्फोट घे असे ऑफिसने सांगितले. तमारा अद्याप माझी कायदेशीर बायको होती. ती तेथे असताना ऑफिसच्या माणसांना घराचा ताबा घेणे शक्य नव्हते. केवळ घटस्फोटानंतर किल्ल्या परत मिळाल्या असत्या.

चार दिवसांनंतर तमाराने मला फोन केला. आता तिचा आवाज मवाळ बनला. मला ती घरी परत बोलवत होती. मी नकार दिला. अर्थात तिने त्यापूर्वी ऑफिसात फोन केला होता. माझी गलिच्छ निंदा केली होती. हे अपेक्षित होते.

बारा दिवसांनंतर घर सोडण्यास आणि किल्ली देण्यास तिने संमती दिली. त्यापूर्वी सारे फर्निचर घेऊन जाईन अशी धमकी दिली. मी तेच करणार होतो. मी कबूल झालो.

प्रत्यक्षात घरी गेलो तेव्हा तिने सारे घर धुऊन नेले होते. फक्त सोफासेट,

टेलिव्हिजन, पुस्तकांची फडताळे, फ्रीज, दोन पलंग, लेखनाचे टेबल, खुर्ची एवढे सामान होते. झुंबरे काढून नेली होती. एक रात्र फक्त एका बल्बच्या प्रकाशात मी काढली.

मी माझी लेखनिक झिनैदाला माझ्या बरोबर बोलावले. माझ्यासाठी जेवण करण्यास तिला विनंती केली. झिनैदाने नंतरच्या काळात फार मदत केली.

मी घरात परत आलो. नवे आयुष्य सुरू झाले होते. जेवण बनविणारी, घर स्वच्छ ठेवणारी, कपडे धुणारी, बाजारातून खरेदी करणारी व्यक्ती हवी होती. मी नेहमी अर्जुनासारखा वागतो. मला 'पोपटाचा डोळा' नेमका दिसतो. लक्ष्यवेध होईतो दुसरीकडे पाहत नाही.

दोन दिवसांच्या अवधीत काम करणारी बाई मिळाली. तमाराचा भाऊ अनातोली व त्याची बायको तान्या यांनी मला मदत केली. राया म्हणजे राइसा काम करायला कबूल झाली. ती त्यांची शेजारीण होती. मला पूर्वी ओळखत होती. पण मी तिला ओळखत नव्हतो.

'ग्लास्नस्त'चे दिवस पथ्यावर पडले. आजकाल परदेशी माणसाकडे रशियन माणसे बिनदिक्कत येत होती. माझ्याबद्दलच्या आस्थेपायी घरकाम करणारी बाई 'दोम खजायका' व्हायला ती तयार झाली. पण चार दिवसांत तिला जमेना. मग आमच्याच इमारतीत सोळाव्या मजल्यावरची एक विधवा काम करायला तयार झाली. थीबापासून मी शिकलो होतो. नोकरांना मुळातच जास्त पगार द्यायचा. त्यांना असमाधानाला वाव द्यायचा नाही. मग आपले काम उत्तम होते. हा मंत्र अमलात आणला. मुंबईला जाईपर्यंतचा काळ धकून न्यायला पाहिजे होता. एवढे उद्दिष्ट होते.

मराठी विभागाची १९९० ची योजना मी पूर्ण केली होती. म्हणजे पुढच्या दोन वर्षांचे काम तयार होते. ऑफिसला मदत व्हावी या हेतूने दोन महिन्यांची बिनपगारी रजा घेतली. मूळची माझी एक महिन्याची पगारी रजा होती. अशा रीतीने तीन महिने भारतात राहण्याचा इरादा होता. पुढची तयारी करायला हवी होती. मामा-बेबीला पत्र लिहिले की पुण्यात तीन महिन्यांसाठी एखादा फ्लॅट भाड्याने घ्या.

दरम्यान तमाराच्या मुलीचे लग्न निर्विघ्न पार पडले. सामोपचाराने घटस्फोट देण्यास तमाराने नकार दिला. तिला माझ्यापासून मूल नव्हते. पोटगी

मागू शकत नव्हती. तसा रशियन कायदा आहे. जे सामान नेले ते भरपूर होते. तिच्या अपार्टमेंटमध्ये आणखी सामान ठेवण्यास जागा नव्हती. म्हणून ती एवढे सामान ठेवून गेली. बेडरूमलगतच्या अडगळीच्या खोलीतील फळ्यांवर मी कपडे ठेवू लागलो. अत्यंत साधे जीवन जगत होतो. तृप्त जगल्यानंतर साधेपणा चालतो. खंती उरत नाहीत. सेक्स, मद्यपान, प्रवास या गोष्टी आकंठ घडल्या. तेव्हा आता निव्वळ अस्तित्वावर खाणे-पिणे चालले होते. जेवणाच्या चवीचा प्रश्न नव्हता. बावीस तास कुणाशी बोलणे व्हायचे नाही. बाहेरच्या जगाबरोबर संपर्क ठेवायचे टेलिफोन साधन होता. रशियन हिवाळा सुरू झाला. शैलाताई, रझा अली यांनी मौलिक मदत केली होती. ऐन अडचणीच्या दिवसांमध्ये निवारा दिला आणि जेवू घातले.

बाहेरचा रशिया बदलत होता. टॅक्सीवाले उघड उघड पैसे खात होते. तीन रूबलच्या अंतरासाठी दहा-पंधरा रूबल घेत होते. कधी कधी सामानखरेदीचे काम लीदिया अदामोवना आणि झिनैदा करायच्या. दुकानांमध्ये मांसाचा तुटवडा होता. मांस तेथे अत्यावश्यक आहे. दुकानात भिकार दर्जाचे दोन रूबल किलो तर बाजारात चांगल्या दर्जाचे बारा रूबल किलो.

अपार्टमेंटची अवस्था वाईट बनली होती. संडासची टाकी गळत होती. बाथरूमचा नळ वाहात होता. दुरुस्त कुणीही करीत नव्हते. रशियात या बाबींची कायम रड. पैसे देऊनही माणसे काम करत नव्हती.

ऑफिसला अपार्टमेंटमध्ये स्वारस्य होते. दोन दिवसांत घरात झुंबरे लावली. त्यांचे भाडे माझ्याकडून घेणार होते. तरीही एवढ्या लवकर सोय झाली. तमाराची कटकट मिटवल्याबद्दल ऑफिसने हा चांगुलपणा केला असावा.

१८ नोव्हेंबर १९८८ लीदिया अदामोवना आणि तिचा मुलगा त्यांच्या मोटारीतून मला विमानतळापर्यंत सोडायला आले होते. मुंबईला जायचा दिवस आला. त्याच दिवशी आर. एम्. शहांचा फोन आला. माझ्याच विमानाने ते प्रवास करणार होते. मी एक्झीक्यूटिव क्लासमध्ये आणि ते फर्स्टमधून. या दोन क्लासेसच्या दरम्यान फक्त एका पडद्याचे अंतर होते. माझी पहिली रांग फर्स्टच्या जवळ होती. आता 'एअर इंडिया' व 'एअरोफ्लोत' यांची एकत्र सर्व्हिस चालू झाली. म्हणजे 'इल्-६२' सोविएत बनावटीचे विमान. सोविएत वैमानिक. रशियन-भारतीय होस्टेस व पर्सर यांची निम्मी निम्मी संख्या. विमान

सुखकर आहे. प्रवासात शहांनी मदत केली. मनाला एक आधार होता.

फोनवरून थीबाला कळविले होते. त्याच्याकडे प्रथम मुक्काम करायचा होता. विमानतळावर येण्याबद्दल श्रीकांतला कळविले होते. गेल्या वर्षा-दीडवर्षात थेट फोनसेवा सुरू झाली होती. मुंबई, दिल्ली, बंगलोर थेट जोडले जायचे. पण पुणे नव्हते.

मुंबईत विमानाबाहेर पडलो तेव्हा राजन शिरूर भेटला. राजनने आणि मी दोन वर्षांपूर्वी मॉस्कोत खूप मजा केली होती. त्याने सांगितले की, कॅ. अरुण गोडबोले मला घेण्यासाठी आला होता. श्रीकांत ऐनवेळी येऊ शकत नव्हता. म्हणून त्याने ही व्यवस्था केली होती. माझ्या ह्या प्रचंड वाताहतीत एक अदृश्य शक्ती ऐन वेळी मदत करीत होती असे जाणवत होते.

थकवा फार वाटत होता. एका जागी आधाराविना उभे राहणे अशक्य वाटत होते. प्रथमदर्शनी मी ठीक दिसत होतो. पण चालताना खटकायचे. बोलताना चाचरत होतो. वाणी अजून स्पष्ट उमटत नव्हती.

अरुणने थीबाच्या घरी मोटारीतून सोडले. एक सूटकेस, एक हँडबॅग असे माझे सामान. थीबा परदेशी गेला होता. कृष्णा घरात होता. त्याने माझी चोख व्यवस्था राखली.

आंघोळीसाठी बाथरूममध्ये गेलो. पहिला ताब्या अंगावर ओतला. ब्रह्मांड आठवले. पाय थरथरू लागले. उभे राहता येईना. आपल्या पद्धतीने आंघोळीची सवय गेली होती. मॉस्कोत बाथरूममध्ये टबात आंघोळ करीत होतो.

'गरज ही शोधांची जननी' हे खरे. दुसऱ्या दिवशी प्लॅस्टिकचा ठोकळा बसण्यासाठी घेतला. पाय लटपटण्याचा प्रश्न मिटला.

पपा जागीरदार ऑगस्टमध्ये पैलतीरावर कायमचे निघून गेले होते. मामा, बेबी, जुई मला भेटायला आले. येण्यापूर्वी चारच दिवस आधी मामाचे पत्र मिळाले होते. त्याची कंपनी परत सुरू झाली. म्हणजे पुण्याला तीन महिने राहण्याची योजना बारगळली होती. त्याच्या कंपनीत संप संपला होता. पर्यायाने पगार चालू झाला होता. आणखी एक चांगली बातमी होती. आदल्याच दिवशी त्याचा फ्लॅट विकला गेला होता.

भविष्यकाळ जास्त स्पष्ट दिसू लागला. पुण्यात नवा फ्लॅट पाहण्याची हालचाल मामाने सुरू केली. काम सोपे नव्हते. आधी निवृत्त व्हायचे. मग सारा

मुक्काम हलवायचा.

थीबाकडे पंच्याऐंशी दिवस राहिलो. प्रथम माझे स्वस्थ बसणे थीबाला खटकत होते. "कसला विचार करतोस ?" तो विचारायचा. "कसलाच नाही !" मी.

मनात प्रस्तुत पुस्तकाची रूपरेषा आकारत होती. या पुस्तकाचे नावही ठरले. भेटायला आलेल्या रंगनाथ कुलकर्णींना आणि प्रदीप दीक्षितला ही कल्पना बोललो. दोघांनी कल्पना उचलून धरली.

ग.दि.माडगूळकरावर बनविलेल्या फिल्मची टेप प्रदीपने आणली. एक वर्षापूर्वी मला स्ट्रोक आल्यानंतर जेव्हा अरुणच्या घरात मी राहिलो होतो, तेव्हा मुंबई दूरदर्शनवर हा चित्रपट दाखवला होता. त्या वेळी टी.व्ही. बघवत नव्हता. फक्त आवाज ऐकला होता. म्हणून प्रदीपला या वेळी मुद्दाम आग्रह केला. त्याने आवर्जून टेप आणली. प्रथम प्रथम तो बिचकत होता.

जेव्हा 'बामणाचा पत्रा' हे शब्द ऐकले त्याच क्षणी मला हुंदका फुटला. नंतर सबंध फिल्मभर रडत होतो. प्रदीपने सुरेख चित्रपट बनवलाय. अण्णांच्या जीवनाचे मर्म त्याने ओळखले. आजारानंतर मी किती विलक्षण हळवा बनलो होतो हे मला आणि प्रदीपला एकाच वेळी समजले.

जुन्या स्मृतींनी रडविले. पण जेव्हा पडद्यावर पाहतो आणि पुस्तकात वाचतो तेव्हाच रडू फुटते. हा प्रकार मला नवीन होता. माझ्या मनाची कोवळीक पाहून प्रदीप चकित झाला.

मॉरीशसच्या मराठी मंत्री सौ.शीलाबाय बाप्पूंच्या मुंबईभेटीच्या बातम्या प्रसिद्ध होत होत्या. मॉरीशसमध्ये महाराष्ट्र भवनाच्या स्थापनेबाबत घाटत होते. मला पुढची वाट स्पष्ट दिसली. मॉरीशसच्या मराठी भवनाचा पहिला जनसंपर्क अधिकारी म्हणून भावी काळात काम करायचे. रशियातील मुक्काम संपत आल्याची लक्षणे दिसली. यापुढे मॉरीशसला मराठी भाषेचा प्रसार करायला जायचे ! डोक्यातील सारे धुके विरून गेले.

१९८९ साल उजाडले. थीबा मुंबईत नव्हता. सारी रात्रभर वरच्या मजल्यावर नवे वर्ष साजरे होत होते. मी जागाच होतो. पहाटे एक विलक्षण भास झाला. माझा दुखरा हात बरा झाला. मी वेदनामुक्त बनलो. खूप हलके हलके वाटले. जाग आली. भास केवळ भास होता. हात अजून बरा नव्हता.

एक आश्चर्याची गोष्ट. स्ट्रोकनंतर माझी दुःस्वप्ने पूर्ण थांबली. मेलेले लोक दिसणे थांबले. एकदा बेबीशी याबाबत बोललो. तिनेही जास्त आश्चर्यकारक गोष्ट सांगितली. माझ्याप्रमाणेच तिलाही ह्या दुःस्वप्नांचा सतत त्रास होत होता. गेल्या वर्षभरात हा त्रास थांबला होता. एकेक गूढ गोष्टी !

डॉ. व्होरांनी नवी औषधे लिहून दिली. डॉ.सौ.शोभना मोघेने मला एक फिजिओथेरपिस्ट मिळवून दिली. डॉ.सौ.फरीदा खलीफा यांनी महिनाभरात माझा हात बराच मोकळा केला. रोजचे व्यायाम सांगितले. फार वेदना झाल्या. ते व्यायाम आणि जुहूच्या किनाऱ्यावर सकाळ-संध्याकाळ रपेट करून प्रकृती किंचित सुधारली.

भावी काळासाठी कपड्यांची आणि औषधांची खरेदी केली. आर्थिकदृष्ट्या माझा मीच अजून समर्थ होतो. प्रचंड खर्च झाले. प्रचंड कष्ट केले. आयुष्याला एक नवा अर्थ मिळत होता. जगण्यातील आत्मविश्वास वाढला.

या वेळी दिल्लीत नवभारतचे गेस्ट हाऊस नव्हते. जैन दांपत्याच्या अपार्टमेंटमध्ये राहिलो. पवन-पूनम ही जोडी माझ्यावर प्रेम करतेय. त्यांच्या मुली राधिका, सोनिया यांचा मी आवडता 'अंकल' आहे. बाळासाहेबांनी एका रात्री चिनी रेस्तराँत जंगी मेजवानी दिली. त्यांचा राजू आखाती देशात नोकरीसाठी गेला होता. प्रत्येकाचे आयुष्य आपापल्या गतीने पुढे जात होते.

मॉस्कोकडे निघालो. ही वाट सवयीची झाली होती. एका दुखऱ्या हातासह फिरायची सवय झाली होती. या वेळी मॉस्कोत काही गोष्टी साध्य करायला हव्या होत्या. तमाराला घटस्फोट द्यायचा होता. नोकरी तर जुलै १९९० पर्यंत निश्चित होती. प्रत्यक्षात विधिलिखित वेगळे असते !

*

## घटस्फोट-राजीनामा

मुंबईत घालविलेले तीन महिने कल्याणकारी ठरले. भराभर घडलेल्या घटनांबद्दल शांत विचार करायला अवधी मिळाला. माझी प्रकृती सुधारली. भारतात येण्याची पूर्वतयारी करता आली. तमारालाही एकूण परिस्थितीची वास्तव जाणीव झाली. ती मला खरेच नको होती हे आता तिला पटले. तिच्या वाढदिवशी मुंबईहून फोनमार्फत अभिनंदन केले. त्या वेळी ती शांत बोलली.

मॉस्कोत विमानतळावर मला भेटायला लीदिया अदामोवना आणि तिचा मुलगा इगर आले होते. आता लीदियाची मोटार चालू नव्हती. हिवाळ्यात बहुतेकांच्या जुन्या मोटारी गॅरेजमध्ये स्वस्थ उभ्या राहतात.

म्हणून टॅक्सीमधून घरी जाणे आवश्यक होते. मॉस्को विमानतळावर टॅक्सी मिळणे फार कठीण. माझ्या हातातील प्लॅस्टिकच्या पिशवीतून डोकावणारे 'मार्लबरो' सिगारेट कार्टन पाहून एक टॅक्सीवाला माझ्या मागे लागला होता. ते कार्टन दिसावे असे मी मुद्दाम ठेवले होते. टॅक्सी ड्रायव्हर परदेशी सिगारेटच्या लोभाने शहरात जायला तयार होतात. त्यांना पैशाचे आकर्षण विशेष नसते हे मला ठाऊक होते. अर्धे कार्टन ड्रायव्हरला दिले. अर्धे धूम्रपान षौकिन लीदियाला नंतर दिले.

टॅक्सीत धक्कादायक बातमी ऐकली. माझी स्वयंपाकीण काम सोडून गेली. एका नव्या सहकारी संस्थेत तिला जास्त पगाराची नोकरी मिळाली होती. आता तिला सवड नव्हती. पिरीस्त्रोयकामध्ये सहकारी संस्था भुईछत्र्यांसारख्या

भराभरा उगवल्या होत्या. पहिले चार दिवस जेवण करण्याचे काम झिनैदाने व लीदियाने सांभाळले. माझी परत फोनाफोनी सुरू झाली. आलीना आब्रामोवाच्या मैत्रिणीने तिची एक सहकारी माझ्याकडे 'दोम खजायका' म्हणून पाठवली. इरा पतापेन्को प्रथमदर्शनी छान दिसली. पण अशी माणसे नंतर खोटी ठरतात. मॉस्कोतील कॅन्सर इन्स्टिटयूटच्या होस्टेलमध्ये ॲडमिनिस्ट्रेटरची साहायक म्हणून काम करणारी ही सुविद्य, दोन मुलींची आई असलेली गृहिणी एका महिन्यानंतर क्षुल्लक चोर ठरली. बाजारातून वा दुकानातून सामान आणण्यात ती पैसे खात होती हे दुसऱ्याच आठवड्यात माझ्या ध्यानात आले. एकदा तर विकत न घेतलेल्या मटणाचे पैसे तिने हिशेबात लिहिले होते. मग दोन-तीन दिवस तिने कांगावा केला. तेव्हा मी शेजारच्याच म्हाताऱ्या बाईला कामाबद्दल विचारले. मी पगार भरपूर देत असल्यामुळे पेन्शनर म्हातारी कबूल झाली. म्हणून इराला शांतपणे कायमचा निरोप दिला. सुमारे आठवड्यानंतर माझ्या ध्यानात आले की, मुंबईहून विकत आणलेले सहा नवे टर्किश नॅपकिन आणि सहा नवे कोरे पायमोजे घरातून गायब झाले आहेत. ते मोजे इराच्या नवऱ्याला उपयोगी पडले असावेत. बरे झाले, माझ्याजवळचे सामान कमी झाले. एक नवा अनुभव पदरी पडला. त्यानंतर एका वर्षाच्या अवधीत माझ्याकडे सात 'खजायका' काम करून गेल्या. कारणे वेगवेगळी होती. कधी कधी उपाशी पोटी राहण्याची आणीबाणी निर्माण व्हायची. अशा वेळांना झिनैदा, लीदिया अदामोवना, अनातोली आणि तान्या यांनी मदत केली. एकदा तर इगर अलेक्सांद्रोवची धाकटी बहीण तान्या चाळीस कि.मी. प्रवास करून मला जेवू घालून गेली. ह्या वर्षभरात ह्या लोकांनी माझ्यावर अगणित उपकार केले. मला धडधाकट जिवंत ठेवले. ही माणसे निरपेक्ष वृत्तीची आहेत. या जगात वाईट माणसांपेक्षा चांगली माणसे जास्त आहेत अशी माझी खात्री पटली.

तमाराला फोनवरून घटस्फोटाबाबत विचारणा केली. ती कबूल झाली. २२ फेब्रुवारी १९८९ रोजी आम्ही दोघांनी सह्या केल्या. रशियन कायद्यानुसार तशी आवश्यकता असते. तीन महिन्यांनंतर पक्का घटस्फोट मिळतो. त्या वेळी पुन्हा सह्या करतात. २४ मे १९८९ रोजी घटस्फोट मिळाला. त्या वेळी तमारा म्हणाली : "तुझी बायको म्हणून राहायला अजूनही माझी तयारी आहे." घटस्फोटानंतर तिने हवालदार हेच आडनाव ठेवले. सोविएत महिलांना

आडनावाच्या निवडीचे स्वातंत्र्य आहे.

मला तिचे मन समजत होते. मूळची सुस्वभावी, प्रेमळ तमारा आता बोलत होती. पण मी माघारी जाऊ शकत नव्हतो. कारण कचेरीत कामाची टंचाई परत सुरू झाली होती. लौकरच मला भारतात कायमचे जावे लागणार अशी चिन्हे दिसत होती. तेव्हा तमाराला पुन्हा माझ्यात गुंतवून ठेवण्यात अर्थ नव्हता. मी तिला हे समजावले. त्या दिवशी टॅक्सीमधून तिच्या घरापर्यंत सोडले. कडवट भावना विरल्या. वैर तात्पुरते टिकते. प्रेम कायम राहते. जशा माझ्या हातून अनेक चुका घडल्या, तशीच तमाराच्या हातून एकच चूक घडली, माझ्या आजारानंतर एका रात्री ती तळतळून चिडून उद्‌गारली होती : "असा अर्ध्यावर डाव सोडून जातोस. माझं आयुष्य नासवलंस !" तिचे शब्द माझे काळीज चरचर कापत गेले. स्वतःच्या विकलांगतेची खंत मनात खुपली. समजा, जर तमारा माझ्याप्रमाणेच आजारी पडली असती तर ? हा प्रश्न मनात आला. तर कदाचित मीही असेच बोललो असतो. पण तिच्यासारखा अमानुष नक्की वागलो नसतो.

मध्यंतरीच्या काळात मित्रांच्या जीवनात अनेक बदल झाले होते. गगन पटवर्धनने 'थरमॅक्स' सोडली. प्रतिभा, मुले, आई यांच्यासह त्याने पुण्याला बिऱ्हाड हलविले. शेखर परांजपे, श्रीनिवास बर्वे यांचा तो भागीदार बनला. त्याच वेगाने त्यांच्या कंपनीचे ऑफिस मॉस्कोतील पेकिंग हॉटेलात थाटले. विजय पाध्येचे मॉस्कोतील ऑफिस लौकरच सुरू होण्याच्या बेतात होते. मनोज आणि देवी यांचे घर मधून मधून आधारासारखे वाटायचे. रविवारी सुट्टीच्या दिवशी त्यांच्या सुरेख सजवलेल्या घरात मजेत जेवण व्हायचे. एम.पी. रावांच्या मॉस्को सफरी तुरळक बनल्या. घाटणेकर आणि चौधरी आवर्जून समाचाराला येत होते. आता मी एक पेग व्हिस्की पिणे सुरू केले. इगर त्याच्या नव्या मैत्रिणीला माझ्या घरी घेऊन आला. ओल्गा त्याची शेजारीण आहे. एकमेकांना अनेक वर्षे ओळखतात. केवळ एक वर्षापूर्वी त्यांना प्रेमाचा साक्षात्कार झाला. ओल्गाला मी म्हटले : "माझ्या घरी आलेली तू ह्याची पंचेचाळीसावी मैत्रीण आहेस !" ओल्गा खळखळून हसली. लौकरच तिच्या घरचे जेवणाचे निमंत्रण मिळाले. ओल्गा ही इगरला भेटलेली सर्वोत्तम मैत्रीण. काही महिन्यांनंतर ओल्गा इगरची पाचवी बायको बनली. ओल्गा घटस्फोटिता आहे. पहिल्या लग्नाचा बावीस वर्षांचा मुलगा आहे. इगर, ओल्गा, दीमा सुखाने एकत्र जगतात. इगर दर

आठवड्याला एकदा छोट्या सेर्योझाला भेटतो.

२४ जून १९८९ हा दिवस सर्वांत वाईट ठरला. माझ्या स्वयंपाकिणीच्या मैत्रिणीला अपघात झाला होता. त्याच दिवशी माझा टेलिव्हिजन सेट बिघडला. जेवणाची भ्रांत झाली. संध्याकाळी एकटाच उदास बसून होतो.
अनातोली-तान्याचा फोन बिघडला होता. शेवटी रात्री नऊ वाजता त्यांच्याशी संपर्क साधला. बिचारे तीस कि.मी. वरून आले. माझ्यासाठी तान्याने जेवण बनविले. नाममात्र व्हिस्की प्यायलो. मॉस्कोतील हा माझा वाढदिवस शेवटचा ठरला.

जुलै महिन्यात कामाची परिस्थिती विकोपाला गेली. अब्रामोव बंधूंची 'अज्ञातातील घोडेस्वार' नामक वैज्ञानिक अद्‌भुत कादंबरी मी पूर्ण अनुवादित केली. 'रादुगा'कडे नवे काम नव्हते. मी १९९१ पर्यंतची योजना पूर्ण केली. मुंबईत लोकवाङ्मय गृहाचे मॅनेजर बदलले. त्यांच्यात व मेझ्दुनरोदनाया क्नीगा यांच्यात देण्याघेण्याची काही भानगड होती. नेमके काय ते कुणालाच माहीत नव्हते.

एप्रिल महिन्यात अनेक महत्त्वाच्या घडामोडी झाल्या. सहा एप्रिलला जुई आणि सचिन यांचा साखरपुडा झाला. येरेवानच्या लारीसा दावत्यानकडून फोनमार्फत समजले की, तमारा आजी बनली होती. तान्याला मुलगा झाला. गेल्या सप्टेंबरात तमारा का बेचैन बनली हे कोडे उलगडले. पिचुंदाच्या सुट्टीनंतर तान्याला दिवस गेले होते. तेव्हा तिच्या लग्नाचे पक्के ठरले नव्हते. एक स्त्री म्हणून तमाराच्या जीवनाचे चक्र पूर्ण झाले.

एप्रिल महिन्यात मामाने पुण्यात नवा फ्लॅट ख़रेदी केला होता. म्हणून भारतात राहण्याच्या जागेबाबत मी निश्चिंत बनलो. बोर्दुकोवांनी जेव्हा माझ्या कामाच्या वेगाबाबत अनुद्‌गार काढले तेव्हा मी ताबडतोब राजीनामा दिला. 'रादुगा' मला काही हजार रूबल देणे होती. म्हणून नोव्हेंबरपर्यंत मॉस्कोत राहायचे असे ठरले. एक नोव्हेंबरला उरलेले सर्व पैसे वसूल करणार होतो. १३ नोव्हेंबरच्या 'एअर इंडिया'च्या विमानातील आसनाचे आरक्षण केले. बोर्दुकोवा आणि वेर्बित्सस्काया माझा तडकाफडकी निर्णय ऐकून अवाक् बनल्या. 'रादुगा'चे मुख्य संपादक वालेंतिन अनिसोव मला पाठिंबा दर्शवीत होते. बायकांना कारभार हाकणे जमत नव्हते असे दिसून आले.

एप्रिलमध्ये जेव्हा पुण्यातील जागेचे निश्चित झाले, तेव्हापासून माझे शब्दकोश वगैरे गगन, शेखर यांच्यामार्फत पुण्याला पाठविण्यास आरंभ केला. शेजाऱ्यांना फर्निचर, फ्रीज इ. सामान किरकोळ किमतींना विकले. त्यांच्याकडून ॲडव्हान्स घेतला. योग्य नियोजनाची गरज असते. ते माझे शेजारीच असल्यामुळे शेवटच्या क्षणापर्यंत वस्तू मी वापरू शकणार होतो. म्हणून कोणतीही गैरसोय झाली नाही. आश्चर्य म्हणजे १९८९ साल द्रव्यप्राप्तीच्या दृष्टीने सर्वांत उत्तम गेले. काही सोविएत संस्थांमधल्या कर्मचाऱ्यांना 'तेरावा पगार' मिळतो. 'सिक लीव्ह'च्या दिवसांची संख्या, कामातील वक्तशीरपणा वगैरे घटकांचा विचार केला जातो. मला हा 'तेरावा पगार' भरघोस मिळाला. सोळा वर्षांमध्ये एवढे पैसे कधी मिळाले नव्हते. शिवाय तिमाही बोनस. 'पिरीस्त्रोयका' मध्ये 'रादुगा' नफा-तोटा तत्त्वावर चालू लागली म्हणून हा पैशांचा पाऊस. पण सर्व रूबलना रुपयात बदलणे शक्य नव्हते. म्हणून मी तासांच्या बोलीवर टॅक्सी ठरवत होतो. झिनैदाचा थोरला मुलगा टॅक्सी ड्रायव्हर आहे. त्यामुळे दिवसभर टॅक्सी माझ्या दिमतीला असायची.

सप्टेंबरअखेरी मनोजने 'थरमॅक्स' सोडली. रशिया कायमचा सोडला. तो आणि देवी निरोप घ्यायला आले. दोघे पुण्यात घर थाटणार होते. मनोज 'स्पॅन ओव्हरसीज'चा मॅनेजिंग डिरेक्टर बनला. देवीचे डॉक्टरेट अपुरे राहिले. मनोजच्या जागी नरेंद्र आपटे आला. नरेंद्र पूर्वीच मॉस्कोत विद्यार्थी होता. आपटे कुटुंब मॉस्कोत स्थायिक झाले. माझी बालसाहित्याची सर्व पुस्तके आपटे कन्यांना देऊन आलो. प्रयाणाची सिद्धता झाली.

एक नोव्हेंबरला नवा धक्का बसला. वेर्बित्सस्कायाने बालसाहित्याच्या दोन पुस्तकांचा अनुवाद नाकारला. अनुवादाचा दर्जा म्हणे वाईट होता. तिने माझ्यावर सूड घेतला. त्यानंतरचे पुस्तक मात्र स्वीकारले. कारण ते सोयीस्कर होते. गेले चार महिने ती व बोर्दुकोवा एक कट रचत होत्या. त्या दोन पुस्तकांच्या अनुवादाचा मोबदला मला दिला नाही. पैसे मिळाले नाहीत याचे दुःख नव्हते. ही अमानुष वृत्ती या बायकांच्या अंगी कशी आली ? गेल्या वर्षी याच दरम्यान तमारा क्रूर वागली. आता या दोघी ! माझे हस्तलिखित झेरॉक्स कॉपी बनवून त्यांनी मुंबईला पाठविले होते. एका निवृत्त मराठी पत्रकाराने मला सोलून काढणारा अभिप्राय पाठवला. त्याचा आधार या दोन बायांनी घेतला.

वेर्बित्सस्काया तर तोंड लपवून बसली होती. पण बोर्दुकोवा भारतीय विभागाच्या प्रमुख होत्या. त्यांना तोंड लपविणे शक्य नव्हते.

त्यांच्या मागणीनुसार आठवडाभराच्या काळात दोन्ही हस्तलिखिते मी तपासून वाचली. किरकोळ चुका होत्या. उलट 'बाल्तिकच्या परीकथा' मला जास्त आवडल्या होत्या. 'तीन लहं भारती' भिकार कम्युनिस्ट साहित्याचे उदाहरण आहे. बोर्दुकोवांना ठाम निर्णय घेता येईना. शेवटी माझ्या प्रयाणाच्या दोन दिवस आधी त्यांचा फोन आला. अनुवाद स्वीकारण्यास त्यांनी संमती दिली. पुस्तके प्रकाशित झाल्यानंतर नियमानुसार त्यांचा मोबदला भारतात मेझ्दुनरोदनाया क्नीगामार्फत रुपये चलनातील चेकरूपाने मिळेल असे त्यांनी सांगितले. त्यांच्यावर मी विश्वास ठेवला.

मी स्वेच्छेने निवृत्त झालो म्हणून प्रकाशन गृहातर्फे मला भौतिक मदत म्हणून एक हजार रूबल देण्यात आले. मला गोंजारण्याचा हा त्यांचा प्रयत्न होता. मला त्या रूबलचा उपयोग नव्हता. येण्यापूर्वी तमाराच्या हाती ते हजार रूबल ठेवले. तिला उपयोगी पडतील या हेतूने.

निघण्यापूर्वी इगरने आणि ओल्गाने घरी जेवायला बोलावले. मी परत मॉस्कोला यावा म्हणून. तसा संकेत आहे. त्या वेळी 'नोवोस्ती'ची मरीना ब्लागोनरावोवा आणि मॉस्को रेडिओची कीरा पताकी निरोपादाखल आल्या.

कचेरीने आयोजित केलेल्या निरोपसमारंभाला हजर राहण्यास मी नकार दिला. खोटे वागता येत नाही. भाषणे ऐकण्याचा मूड नव्हता. बोर्दुकोवा मानभावीपणे म्हणाल्या, "मी विमानतळापर्यंत पोचवायला आले तर चालेल ?"

"ठीक आहे, या !"

'शेवटचा दीस गोड व्हावा' म्हणून तमाराला फोन केला. मला निरोप देण्यासाठी येरेवानहून लारीसा, सेदा, नारीने, आर्मान मॉस्कोला मुद्दाम आले. कमाल आहे या माणसांची. त्या सर्वांसह तमाराकडे जेवण घेतले. 'समथिंग स्पेशल' व्हिस्कीची बाटली सारे प्यायले. हजार रूबल तमाराला लिफाफ्यातून दिले. खूप रडली.

आर्मेनियन मंडळींचे येरेवानचे विमान संध्याकाळीच होते. त्या वेळी तिकिटे मिळणे मुष्कील. काळ्या बाजारातून दामदुप्पट पैसे देऊन ही माणसे आली होती. तरीही विमानतळापर्यंत मला निरोप देऊ शकली नाहीत. माझे

विमान रात्रीचे होते.

विमानतळापर्यंत तमारा, बोर्दुकोवा, झिनैदा आल्या होत्या. मॉस्कोत बेशिस्तीला उधाण आले होते. सामान देण्यासाठी लांबच लांब रांगा होत्या. तमारा कशीबशी पुढे घुसली. मला कस्टमपाशी घेऊन गेली. लौकर मोकळा झालो. विदेश विभागाचा प्रमुख मकारोव आणि तमारा थेट इमिग्रेशनपर्यंत आले. माझ्या मागे एक माणूस सोडून तमारा उभी होती. इमिग्रेशनवाल्याने माझा पासपोर्ट दिला. आडवी दांडी बाजूला सरकवली. त्याच क्षणी तमाराला रडू फुटले. हात झटकून पन्नास पावले तरातरा चालत गेली. मग तिने मागे वळून पाहिले. निरोपाचा हात हलविला.

मी विमानाकडे निघालो. नेहमीसारखा यंत्रवत. बधिर मनाने. आयुष्यातील अत्यंत महत्त्वाचे, वादळी पर्व संपले.

*

## मायदेशी

१४ नोव्हेंबर १९८९. नेहरू जन्मशताब्दीच्या दिवशी भारतात कायमसाठी परत आलो. दोन सूटकेसेस, एक हँडबॅग यांच्यासह 'ग्रीन चॅनल' मधून बाहेर पडलो.

सौ.कुंदा कान्हेरे कबूल केल्याप्रमाणे भेटायला आली होती. माझ्या स्ट्रोकनंतर कुंदा मधून मधून तिच्या परीने मला धीर द्यायची. तिने ज्योतिषशास्त्राचा खूप अभ्यास केला आहे. फार पूर्वी नाटक-सिनेमा व्यवसायात असताना ज्योतिषशास्त्राचा आधार घेण्याचा मला नाद होता. रशियात गेल्यापासून हा नाद थांबला. स्ट्रोकनंतर पुन्हा सुरू झाला. खरे तर १९८२ सालीच कुंदाने मला माझ्या कुंडलीवरून सांगितले होते की, १९८७-८९ च्या दरम्यान मी भारतात कायमचा परत येईन. आता १९८९ च्या अखेरी खरोखर परत आलो.

नेहमीप्रमाणे थीबाकडे तात्पुरता मुक्काम टाकला. जुई भेटायला आली. जून महिन्यात फ्रेंच विषयासह ती बी.ए. झाली होती. मुंबई विद्यापीठात तिसरी आली. ताबडतोब जुलैमध्ये ठाण्यातील शाळेत शिक्षिका बनली होती. आता नोकरी सोडून एम्.ए. चा अभ्यास करत होती. सचिन पुण्यात होता. तो होमिओपाथ डॉक्टर झाला होता.

तिसऱ्या दिवशीच जुईसह नील साठेकडे गेलो. जानेवारीत जुईबरोबर मॉरीशसला जायची योजना डोक्यात होती. जुईचा प्रथम परदेश प्रवास होईल. मॉरीशसमध्ये फ्रेंच भाषेचे प्राबल्य असल्यामुळे ती दुभाषी म्हणून उपयोगी

पडेल असे वाटले.

दोन-तीन दिवस दिदीकडे राहिलो. कांचनचे 'नाथ हा माझा' गाजत होते. तिने एक प्रत 'सस्नेह' भेट दिली.

जुईसह विमानाने पुण्याला परत आलो. मामाचा नवा फ्लॅट प्रशस्त आढळला. खास माझ्यासाठी त्याने 'कमोड' बसवून घेतले होते. एक स्वतंत्र खोली राहायला दिली. बेबी नेहमीसारखी उत्साहात दिसली.

श्री. एम. पी. रावांशी फोनवरून संपर्क साधला. ह्या भल्या मित्राने तात्काळ माझे कल्याण केले. एका आठवड्याच्या आत एम. पी. राव आणि 'थरमॅक्स' चे चेअरमन व मॅनेजिंग डिरेक्टर श्री. आर. डी. आगा यांनी जुन्या स्नेहाला स्मरून आंतरराष्ट्रीय विभागात 'सल्लागार' म्हणून एक वर्षासाठी माझी नेमणूक केली. भारतात माझे पहिले वर्ष सुखकारक झाले. माझ्या संकटकाळात सर्व मित्रांनी मनःपूर्वक मदत केली. त्यामुळे मी लौकर उभा राहिलो. माणुसकीचे ओलावे मित्रांकडून लाभले.

आश्चर्य म्हणजे जवळपास अनिल पत्की राहत होता. त्याच्याकडून समजले की, सतीश-मधुरा चुणेकर नव्या अपार्टमेंटमध्ये जवळच राहत होते. जुन्या मित्रांच्या भेटी झाल्या. एकनाथ बागूलशी फोनवरून संपर्क साधला. आता तो पुणे 'सकाळ' मध्ये साहायक संपादक बनला.

मी हाती लेखणी घेतली. रशियावर पाच-सहा लेख लिहिले. मॉस्कोत असताना डोक्यात एका पुस्तकाची योजना होती. व्यापाराच्या निमित्ताने व्यापारी प्रतिनिधी मॉस्कोला वारंवार येत. रशियन भाषेचे ज्ञान नसल्यामुळे त्यांची फार गैरसोय व्हायची हे मी पाहत होतो. त्यांच्यासाठी एक सुटसुटीत शब्दकोश तयार केला.

'While you are in Russia' हे पुस्तक आकारले. माझे अक्षर दिव्य. मधुराचे सुंदर हस्ताक्षर. म्हणून तिने हौसेने प्रेस कॉपी बनविण्याची कामगिरी पत्करली.

१९९० उजाडले. फारसा खडखडाट न होता आयुष्याचे सांधे बदलले. मॉरीशसला जाण्याची तारीख जवळ आली. ऐनवेळी जुईने माघार घेतली. परीक्षेचे निमित्त सांगितले. माझा जाण्याचा निश्चय होता. 'लोकसत्ता'चे संपादक श्री. माधव गडकरी यांना भेटलो आणि मनातील बेत सांगितले. त्यांनी उत्साहाने

पाठिंबा दाखविला. पोर्ट लुईमधील एक दोन पत्ते व नावे सांगितली. मॉरीशस सफरीबद्दल 'लोकसत्ता' साठी लेख लिहिण्यास सांगितले.

मॉरीशस म्हणजे श्री. प्र. श्री. नेरूरकर असे समीकरण बनलेय. त्यांचा जुना परिचय होता. नेरूरकरांशी फोनवरून संपर्क साधला. त्यांनी मॉरीशस मराठी साहित्य परिषदेचे अध्यक्ष श्री. होमराजेन गौरीआ यांच्या घरचा फोन नंबर दिला.

अशोक जागीरदारला भेटलो. ज्या दिवाणखान्यात पपांबरोबर अनेक संध्याकाळी साजऱ्या केलेल्या होत्या त्याच दिवाणखान्यात अशोकबरोबर संध्याकाळ साजरी केली. सौ. माधवीने म्हणजे अशोकच्या बायकोने, मॉरीशसमधला एक फोन नंबर दिला. पूर्वीची पुण्याची कु.नीलिमा शहाणे तिची नातेवाईक आहे. आता सौ. नीलिमा विश्वेश्वरचा फोन नंबर मिळाला. नव्या देशात अशा ओळखी ऐनवेळी मदत वाटतात.

प्रयाणाची तारीख ठरेना. पोर्ट लुईमधील प्रवासी एजंटांशी संपर्क साधण्याचा नील साठे प्रयत्न करीत होता. नेमके त्याच वेळी पोर्ट लुईमधील टेलिफोन नंबर बदलले. शेवटी टेलेक्समार्फत संपर्क साधला.

माझ्या मनात या सफरीबद्दल माफक अपेक्षा होत्या. रशियाच्या पूर्वानुभवाने मी सावध बनलो होतो. ज्या देशात काम करायचे तो देश आधी पाहून घ्यावा. तेथील जीवनमान निरखून घ्यावे. सगळे अंदाज येतात. आत्ता जाण्यात हाच हेतू होता. शिवाय सौ. शीलाबाय बाप्पू यांची भेट घ्यायची होती. एकदम सोक्षमोक्ष लागला असता. माझ्या प्रकृतीच्या सद्यःस्थितीत मी कितपत स्वतंत्रपणे प्रवास करतो हे जोखून घ्यायचे होते.

जेव्हा पुण्याहून डेक्कन एक्सप्रेसने मुंबईला निघालो, तेव्हा पुणे स्टेशनवर माझी विचित्र स्थिती बनली. मधुरा स्टेशनपर्यंत सोबत आली होती. गाडी फलाटाला लागली. पण मला जागचे हलता येईना. तिकीट कलेक्टरजवळचे दार मी आधारासाठी धरले होते. शेवटी मधुराने हात धरला आणि डब्यापर्यंत गेलो. हे असे का झाले ते समजेना. गर्दीची सवय गेली होती. स्ट्रोकनंतर आगगाडीने प्रथमच प्रवास करत होतो. दादर स्टेशनवर सहप्रवाशांनी उतरण्यास मदत केली. टॅक्सीपर्यंत हमाल घेऊन गेला. आगगाडीत टॉयलेटमध्ये जायची पंचाईत झाली. तेव्हा ठरवले की यापुढे प्रवास फक्त विमानातून.

२४ जानेवारी १९९० रोजी 'एअर मॉरिशस'च्या विमानाने पोर्ट लुईला

निघालो. विमान पहाटे होते. विमानतळावर रात्री दोन वाजता हजर व्हायचे होते. आता सोबत कुणी नव्हते. टॅक्सीवाल्याला दामदुपटीने पैसे द्यावे लागले. मुंबई ते पोर्ट लुई सहा तासांचा विमानप्रवास. उभय देशांच्या वेळांमध्ये दीड तासाचा फरक.

हिंदी महासागरातील 'मोती' म्हणून प्रसिद्ध असलेल्या मॉरिशस बेटाकडे विमान निघाले.

*

# मॉरिशस

पोर्ट लुई विमानतळावरच्या पासपोर्ट ऑफिसरने माझ्या सहलीच्या हेतूबद्दल खोदून खोदून विचारले. माझ्या पासपोर्टवर माझा व्यवसाय पत्रकार म्हणून नमूद आहे. मी कोणत्या वृत्तपत्राचा प्रतिनिधी आहे अशी चौकशी झाली. मी हौशी प्रवासी म्हणून आलो असा खुलासा केला. पुढे कस्टममधून 'ग्रीन चॅनल' घेतला. तरीही तेथील ऑफिसरने माझी एक सूटकेस व एक हँडबॅग हात खुपसून खुपसून तपासली. त्यांच्यापाशी इलेक्ट्रॉनिक उपकरणे नाहीत.

ध्वनिवर्धकावरून माझे नाव पुकारण्यात येत होते. सिल्व्हर विंग्ज ट्रॅव्हलचा माणूस बाहेर माझी वाट पाहत होता. माझ्या नावाची पाटी हाती धरून उभा होता.

एजंटाने आणलेली टॅक्सी निघाली. प्रशस्त रस्ते, स्वच्छता, टापटीप डोळ्यांत भरली. निळे डोंगर, उसाची शेते मनात ठसली.

हॉटेल विमानतळापासून खूपच दूर होते. वाटेत राजधानी पोर्ट लुई दिसली. खास वसाहती छापाच्या इमारती. त्यापुढे कित्येक किलोमीटर अंतर गेलो. बेटाच्या उत्तर किनाऱ्यावर हॉटेल 'कलमार' आहे.

'कलमार'च्या स्वागतकक्षात भारतीय वंशाच्या दोन तरुणींनी हसतमुख स्वागत केले. देवीना, बीना यांनी माझ्या तीन दिवसांच्या मुक्कामात खूप मदत केली. 'कलमार' म्हणजे स्वप्नातील हॉटेल होते. खुले रेस्तराँ व बार. समोर निळाशार हिंदी महासागर. खडकाळ किनाऱ्यावर लाटांचा शुभ्र फेस. प्रशस्त आवार. तीन खोल्यांचा टुमदार बंगला माझ्यासाठी देण्यात आला. तसेच

आणखी चार बंगले आवारात उभे होते. हे वातावरण पाहून खूप खूष झालो. एजंटाचा प्रतिनिधी म्हणाला, "इथं तीन दिवस राहा. मग क्युपिकमधल्या 'कॉन्टिनेन्टल' मध्ये राहा. तिथून पोर्ट लुईमध्ये जाणं जास्त सोपं. दुकानं वगैरे आसपास आहेत." मला किनारा सोडायचा नव्हता. सफरीच्या सहाही रात्री 'कलमार' मध्ये व्यतीत करायची इच्छा होती. टूर मॅनेजर मीरा मोहित हिला तसे कळवले.

पण आधी काम. भारतीय हायकमिशनमधल्या डॉ. आमोद पारसनीसांशी फोनवरून संपर्क साधायला सांगितले. तासाभरात डॉ. पारसनीसांचा फोन आला. दुसऱ्याच दिवशी सकाळी त्यांच्या कचेरीत भेट निश्चित झाली. त्यांच्यामार्फत मंत्रिमहोदया सौ. शीलाबाय बाप्पू यांच्याशी भेट ठरवायची असा हेतू होता.

गोष्टी अपेक्षेपेक्षा भराभर जमत गेल्या.

संध्याकाळच्या वेळी हिंदी महासागरावरचा सूर्यास्त पाहिला. अगदी पश्चिमी चित्रपटातील वातावरण होते. तमाराची आठवण प्रकर्षाने झाली. हा स्वच्छ, धूळविरहित देश तिला खूप आवडला असता. माझे मन तमाराकडे पुनःपुन्हा ओढ घेते. भारतीकडे अजिबात नाही. तमाराबरोबर आयुष्यातील कित्येक सुंदर क्षण जगलोय. म्हणून सुंदर स्थळी, रम्य प्रसंगी तिची आठवण येते.

दुसऱ्या दिवशी सकाळी प्रवासी एजंटचा प्रतिनिधी मोटार घेऊन आला. त्याने प्रथम स्वतःची कचेरी दाखवली. टूर मॅनेजर मीरा मोहित पारदर्शी, बदामी रंगाच्या डोळयांची आकर्षक स्त्री आहे. स्वतःच्या कामात वाकबगार आहे. क्युपिक उपनगरात 'कॉन्टिनेन्टल' हॉटेलात राहण्याबाबतचा माझा होकार तिने चतुराईने प्राप्त केला.

टूर प्रतिनिधी रझाक सोहावन छान हिंदी बोलतो. त्याने डॉ. पारसनीसांच्या ऑफिसपर्यंत मला सोडले. त्यापूर्वी हॉटेलात जाण्यासाठी टॅक्सी स्टँड दाखविला. अंदाजे भाडे सांगितले. मॉरिशसमध्ये टॅक्सींना मीटर नाही. आपल्या गोव्याप्रमाणे ड्रायव्हरशी आधी भाडे ठरवायचे. काही वेळा ते अवाच्या सवा रक्कम सांगतात. अशा वेळी टूर प्रतिनिधींची मदत होते.

डॉ. आमोद पारसनीस प्रसन्न व्यक्तिमत्वाचे आहेत. शुद्ध, स्वच्छ मराठी

बोलतात. पॅरिसमधील भारतीय दूतावासात त्यांनी काही वर्षे काम केले. फ्रेंच भाषेवर उत्तम प्रभुत्व आहे, अशी माहिती श्री. माधवराव गडकरींनी सांगितली होती. त्यांना माझे एक अनुवादित पुस्तक दिले. 'दोन्ही घरचा पाहुणा'ची कॅसेट त्यांनी उत्सुकतेने घेतली. सौ.बाप्पू यांची लौकरात लौकर भेट ठरविण्याचा प्रयत्न करीन असे त्यांनी आश्वासन दिले. भारतीय प्रजासत्ताक दिन दुसऱ्या दिवशी होता. त्यांच्या कार्यक्रमासंबंधात डॉ. पारसनीस गडबडीत होते. मॉरिशसमधल्या इंदिरा गांधी सांस्कृतिक प्रतिष्ठानचे ते संचालक आहेत.

'कलमार' मधील दुसरी संध्याकाळ. एकटा आवारात फिरत होतो. रेस्तराँच्या हिंदू मुख्य आचाऱ्याशी मैत्री जमवली होती. तसेच आवारातील छोट्या स्टोअरमध्ये मिनरल वॉटरच्या बाटल्या विकणारी सोळा-सतरा वर्षांची, इंग्रजी-हिंदी भाषा बोलणारी यशोदा-देवी ओळखीची झाली. ही सगळी मंडळी माझ्याभोवती कोंडाळे करून गप्पा मारीत. थोडासा अंधार पडल्यानंतर हॉटेलचा युगोस्लाव मॅनेजर आला. माझ्यासाठी त्याने व्हिस्की मागवली आणि स्वतःसाठी बीयर. आमच्या गप्पा सुरू झाल्या. मॉरिशसमध्ये तो पंचवीस वर्षांपेक्षा जास्त काळ राहत आहे. देशातील राजकीय बदलांना तो साक्षी आहे. त्याची बायको आणि एकुलता एक मुलगा मॉरिशसमध्ये राहतात. त्याच दिवशी त्याच्या बायकोचा वाढदिवस होता. माणूस दिलखुलास. बायकोबरोबर वाढदिवसाची शँपेन घ्यायला घरी निघून गेला. 'कलमार' मध्ये पुन्हा येण्याचे मला निमंत्रण देऊन गेला.

तिसऱ्या दिवशी सकाळी हॉटेल बदलायचे होते. होमराजेन गौरीआ फोनवरून नुसते बोलत होते. भेटायला येत नव्हते. स्वतःच्या घरी बोलवत नव्हते. नीलिमा आणि तिचा नवरा आपापल्या नोकऱ्यांमध्ये गुंतले होते. हॉटेल 'कॉन्टिनेन्टल' मध्ये भेटायचा त्यांनी वायदा केला. तसेच गौरीआ म्हणाले. हॉटेल बदलण्यासाठी टॅक्सीच्या खर्चाचा भुर्दंड बसला. चारशे रुपये ऐकताच घाम फुटला. शेवटी भारतीय वंशाच्या ड्रायव्हरला माझी दया आली. कशीबशी तडजोड केली.

क्युपिक उपनगर छानपैकी हिलस्टेशन आहे. डोंगराळ प्रदेश असल्यामुळे हवामान थंड, आल्हादक आहे. समुद्रतीरावर हवा वेगळी होती. पोर्ट लुई बंदरापाशी दमट गरम हवा असते. हॉटेल 'कॉन्टिनेन्टल' सुशीतल आहे.

खोलीतील बाथरूममध्ये टबची सोय होती. मॉस्को सुटल्यानंतर प्रथमच मनसोक्त आंघोळ केली. भारतीय न्हाणी-घरांमध्ये पाय लटपटतात.

माझे हॉटेल बदलले म्हणून सर्वांना फोन करून सांगितले. मॉरिशसमध्ये फोन कॉल महाग आहेत. भाड्याच्या जागा महाग आहेत. रेस्तराँ महाग आहेत. मॉरिशिअन रुपया भारतीय रुपयाच्या जवळजवळ सारखा आहे. एकूण मामला लक्षात आला.

होमराजेन गौरीआ आले. फोनवरून मंद, हळू आवाजात बोलणारा हा माणूस वयस्क असावा असे प्रथम वाटले. पण प्रत्यक्षात पाहतो तर छोट्या, काळ्या दाढीचा, मध्यम उंचीचा तरुण. मॉरिशसमधल्या साहित्य परिषदेचे ते अध्यक्ष आहेत. व्यवसायाने शाळेत मराठीचे शिक्षक. उत्साही सामाजिक कार्यकर्ते आहेत. मॉरिशसमध्ये वेगवेगळ्या परिषदांचे अध्यक्ष, चिटणीस वगैरे गोष्टींचे फार स्तोम आहे. दोन-तीन दिवसांच्या मुक्कामात हे ध्यानात आले. तुम्ही कोणत्या संघटनेमार्फत आलात, तुमचे तिच्यात पद कोणते वगैरे प्रश्नावली घडते. एखादा माणूस स्वतंत्रपणे एकटा येतो हे त्यांच्या ध्यानात येत नाही. मग भेटीसाठी टंगळमंगळ.

सुदैवाने मंत्रिमहोदया अपवाद ठरल्या. डॉ. पारसनीसांचा वशीला जबरदस्त ठरला. २९ जानेवारीला सौ.बाप्पूंच्या कचेरीत दुपारी एक वाजता भेट निश्चित झाली. डॉ.पारसनीसांनी शब्द पाळला. माझे काम केले.

मंत्रीमहोदयांच्या पोर्ट लुईमधील कचेरीपर्यंत मला नेणारा टॅक्सी ड्रायव्हर भला होता. त्याने ठरीव भाडे घेतले. परतीसाठी मी त्याला आधीच सांगितले. काही वेळ थांबण्याची त्याने तयारी दाखवली. माझे विचित्र चालणे पाहून मदत करण्याच्या हेतूने तो थेट कचेरीपर्यंत सोडायला आला. तिसऱ्या मजल्यापर्यंत चढणे कठीण होते. मॉस्को सोडल्यानंतर ही नवी समस्या लक्षात आली. मुंबईत थीबाकडे लिफ्ट आहे. दिदीकडे पहिलाच मजला. पुण्यातील नव्या इमारतींचे अरुंद जिने चढण्या-उतरण्यास समस्या ठरले. आता मॉरिशसमध्ये तीच समस्या.

सौ. बाप्पू यांनी वेळेवर भेट घेतली. नियोजीत वेळेआधी पंधरा मिनिटे मी पोहोचलो होतो. घाम जिरावा म्हणून. फोटोपेक्षा प्रत्यक्षात बाई जास्त सुरेख दिसतात. त्यांचे बोलणे झुळझुळत्या पाण्याच्या आवाजासारखे भासते. शिफारसपत्रे त्यांच्या हवाली केली. ‘रादुगा’, ‘प्रगती’ प्रकाशन गृहांनी दिलेली.

श्री. मुकुंदराव किर्लोस्कर आणि दिदी यांनी दुसऱ्या संदर्भात दिलेली. थोडक्यात साहित्य, नाट्य, चित्रपट क्षेत्रांशी माझा संबंध आहे हे सिद्ध करणारी. महाराष्ट्र भवनाच्या संदर्भात बोललो. त्यांचे डोळे चमकले. उत्साहाने त्यांनी फोन उचलला. मग माझ्या प्रयाणाचा दिवस विचारला. सहकारी संस्थांच्या खात्याचे प्रथम सचिव श्री. वीरजनन मल्लू यांच्याशी फोनवरून बोलल्या. श्री. मल्लू यांच्याकडे मला पोहोचविण्यासाठी स्वतःचा खास माणूस माझ्या सोबतीला दिला. मी त्यांना 'युक्रेनी लोककथा'ची प्रत भेट दिली. श्री. गौरीआ यांनी त्यांच्या दोन मुलींना मराठी शिकवले असे म्हणाल्या. खरे तर 'पाहुणा'ची कॅसेट त्यांच्यासाठी नेली होती. डॉ. पारसनीसांकडून मिळेल असे त्यांना सांगितले. १९९१ मध्ये मॉरिशसमध्ये दुसरी मराठी विश्वपरिषद भरणार आहे असे म्हणाल्या. मी अगदी योग्य वेळी भेटलो असे बोलल्या. माझा पुण्यातील पत्ता त्यांच्यापाशी दिला. बस्स ! 'नमस्कार' म्हणाल्या आणि निरोप दिला. अवघ्या दहा मिनिटांत मुलाखत आटोपली. वातावरण अनुकूल होते.

पण मल्लू यांनी जे सांगितले ते चांगले नव्हते. महाराष्ट्र भवनाचा प्रकल्प रेंगाळतोय. सुमारे एक कोटी रुपये खर्च होईल. महाराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. शरद पवार यांनी २५ लाख रुपयांची देणगी जाहीर केली होती. ते २५ लाख भारतीय रुपये अजूनपर्यंत मॉरिशिअन रुपयात बदलले नाहीत. उभय देशांमध्ये लाल फितीचे प्राबल्य. म्हणजे पैशांअभावी महाराष्ट्र भवनाचा प्रकल्प अडला. श्री. मल्लू यांनी थोडक्यात स्पष्ट सांगितले. ही समस्या 'लोकसत्ता' मध्ये लेखामार्फत मांडीन असे त्यांना मी आश्वासन दिले. निरोप घेतला.

टॅक्सी ड्रायव्हर अजूनपर्यंत शांतपणे वाट पाहत बसला होता. मध्यंतरी एक तासाचा अवधी उलटला होता. त्याने तक्रारीचा सूर अजिबात काढला नाही. 'समजून पैसे द्या' असे म्हणाला नाही. माझे काम झाले म्हणून त्याने खुषी व्यक्त केली. अर्थात मी त्याला 'समजून' पैसे दिले.

नीलिमा आणि जय विश्वेश्वर हे तरुण जोडपे त्यांच्या दोन सुरेख मुलींसह भेटायला आले. मुंबई विद्यापीठात विद्यार्थीदशेत दोघांची प्रथम गाठ पडली. प्रेमाची परिणती विवाहात झाली. नीलिमा मॉरिशिअन भाषा सफाईदार बोलते. पण मराठी बोलायला बिचकते.

दोघांनी मोटारीतून थोडे फिरवले. स्वतःच्या बंगल्यावर चहासाठी नेले.

जयचे वडील भेटले. तेथे त्यांचे मित्र डॉ.दान अल्लारखसिंग आले होते. डॉक्टरसाहेबांनी त्यांच्या हॉटेलमध्ये रात्रीच्या जेवणाचे निमंत्रण दिले. मला घेण्यासाठी मोटारीतून आले. नंतर समजले की, 'हॉटेल युरोपा' त्यांच्या मालकीचे आहे. डॉक्टरसाहेब अनेक वर्षे ब्रिटनमध्ये राहिले आहेत. मॉरिशसमधल्या मालमत्तेची व्यवस्था पाहतात. डॉक्टरी करतात. मॉरिशसमधील भिन्नवंशीय लोकांमध्ये अंतर्गत कलह आहेत अशी माहिती समजली.

पावसाच्या जोरदार सरीने हवा छान केली. ओल्या उन्हात मॉरिशसचा निरोप घेतला. त्या भूमीत भविष्यकालात माझे वास्तव्य होईल ? कोण जाणे !

*

## मुक्काम पुणे

पुण्यात आल्यानंतर 'लोकसत्ता' साठी लेख लिहायला घेतला. 'मॉरिशसमधले सात दिवस' हा लेख मार्चच्या आरंभीच प्रसिद्ध झाला. पण रशियावरचे लेख कालांतराने प्रसिद्ध होत गेले. 'रशियन स्त्री कशी आहे ?' हा लेख आंतरराष्ट्रीय महिला दिनानिमित्त 'स्त्री'च्या मार्च अंकात प्रसिद्ध झाला. 'रशियातील कौटुंबिक जीवन', 'रशियातील अनाथाश्रम', 'रशियातील धर्मस्वातंत्र्य' हे लेख जून ते ऑगस्ट या दरम्यान 'स्त्री' व 'किर्लोस्कर' मध्ये प्रसिद्ध झाले.

'While you are in Russia' च्या प्रकाशनाबाबत पुन्हा एम.पी. राव मदतकर्ते ठरले. प्रकाशिका सौ. ज्योत्स्ना भिडे यांनी एप्रिलअखेरी बोलणी निश्चित केली. जूनमध्ये माझ्या वाढदिवसाच्या दरम्यान प्रकाशनाची तारीख ठरली.

या गोष्टी सर्वसाधारणपणे लांबणीवर पडतात. १० ऑगस्टला पुस्तक सुबकरीत्या प्रकाशित झाले. भारतात आल्यानंतर पहिले यशस्वी काम. अवघ्या एका महिन्याच्या अवधीत सतराशे प्रती विकल्या गेल्या.

इतक्या महिन्यांच्या काळात पुण्यातील जीवनाशी जमवून घेण्याचे प्रयत्न करीत होतो. सकाळी फिरता फिरता अनिल पत्कीच्या घरात डोकवायचे. त्याच्याशी आणि सौ. शोभाशी व समीर आणि तुषार या तरुण पिढीशी गप्पा मारायच्या. पहिल्या चहाचा कप घ्यायचा. आमच्या कॉलेजच्या दिवसांमध्ये डेक्कन जिमखाना भागात ॲम्बॅसडर मोटारी चालवणाऱ्या दोन-तीन सुरेख

मुली होत्या. कु. शोभा देशमुख त्यांतील एक होती. आता ती ख्यातनाम चित्रकार आणि अभिनेत्री सौ. शोभा पत्की आहे. काही माणसे गुणांनी विकसित होतात. नुसत्या वयाने वाढत नाहीत. शोभा अंगच्या कलागुणांनी मोठी झालीय. अनिल तसाच मिस्कील आणि सुस्वभावी राहिलाय. आयुष्यात धक्के खाऊनही कडवट बनला नाही.

आईच्या हातचे जेवण जेवून लहानाचा मोठा वाढलो. सौ. बेबी हुबेहूब आईसारखे जेवण बनवते. तिच्या हातचे जेवण मिळताच माझी प्रकृती झपाट्याने सुधारली. कित्येक वर्षांनंतर शांत, निवांत जीवन लाभले. जगण्यासाठी रखरख नाही. धावपळ नाही. नवनवी मराठी पुस्तके वाचायची, नवनवीन मराठी चित्रपटांच्या व्हिडिओ कॅसेट पाहायच्या. संध्याकाळी फिरायचे. सतीश-मधुराच्या घरात डोकवायचे. हास्यविनोद करताना व्हिस्कीचे दोन घोट घ्यायचे. महिनाभरात एक-दोनदा एम.पी. रावांबरोबर उत्तम रेस्तराँत मद्यपान आणि भोजन करायचे. छानदार जीवनक्रम बनला.

सोळा वर्षांनंतर भारतीय उन्हाळा अनुभवला. दोन महिने तलखी झाली. पाऊस सुरू झाला. २७ जूनला जुई आणि सचिन यांचा विवाह झाला.

३ जुलैला 'मुलखावेगळा' लिहायला घेतले. अनेक वर्षांच्या कल्पनेला मूर्त आकार देऊ लागलो. त्याआधी एक आठवडा 'मृत्युंजय'कार श्री. शिवाजी सावंत यांची भेट झाली. फार पूर्वी जेव्हा मी 'बुवा' नाटकात काम करीत होतो, त्यातील एक कलावंत श्री. ज्ञानेश्वर चिंचवडे यांच्यामुळे हा योग घडला. सावंताना 'मुलखावेगळा' बद्दल बोललो. त्यांनी आश्वासन दिले की, प्रकाशक मिळवून देतो.

खरेच त्यांनी प्रकाशक मिळवून दिला. लेखन सुरू केल्यानंतर दोन आठवड्यांच्या अवधीत सुवर्णा प्रकाशनचे श्री. सुरेश जोशी यांच्याशी फोनवरून बोलणे झाले. पुणे शहराच्या मध्यवस्तीत गर्दीमुळे मला जाता येत नाही हे जाणून श्री. जोशी भेटायला आले. पहिल्या दोन प्रकरणांचे हस्तलिखित घेऊन गेले. मधुराने सुवाच्य अक्षरात कॉपी बनवली होती.

सतीश-मधुरा या जोडप्याने आपला पूर्वीचा शब्द पाळला. भारताच्या लोकसंख्येत त्यांनी भर घातली नाही. पुण्यातील आरंभीच्या दिवसात या दोघांनी फार मदत केली. बाहेर जाताना मधुरा सोबतीला यायची. रस्ता

ओलांडायला हात धरून मदत करायची. सतीशला नोकरीचे व्याप असूनही माझ्या गरजेच्या वस्तू तो आणून देतो. या जोडीने आयुष्य आनंददायी केले. त्यांचे मित्र माझे मित्र झाले. जीवनाला वेग लाभला. सतीश-मधुरा रात्र रात्र जागून सुवाच्य अक्षरातील प्रेस कॉपी बनवू लागले. ही दोघे प्रस्तुत पुस्तकाचे पहिले वाचक. त्यांच्या सूचना मौलिक ठरल्या. मित्रांच्या बाबतीत मी सुदैवी आहे.

श्री. जोशी आठवडाभरानंतर आले. त्यांना लेखन आवडले. पुस्तक प्रकाशनासाठी त्यांनी स्वीकारले. आता मी खऱ्या अर्थाने पुणेकर बनतोय.

*

## ना पसाशोक

रशियन शब्द 'ना पसाशोक' म्हणजे One for the road. शेवटचा घुटका.

खरे म्हणजे आत्ता नव्या जीवनाला आरंभ झालाय. लौकरच हे दशक संपेल. दहा वर्षांनंतर शतक संपेल. एकविसाव्या शतकाकडे लक्ष लागलेय. काळाच्या आधी विचाराने आणि कृतीने असले पाहिजे हे सूत्र. पूर्वीचा निराशावाद नाहीसा झाला. मनातील धुके विरले. माझ्या विचित्र चालण्याची भोवतालच्या लोकांना सवय झाली. अडखळत्या बोलण्याची मित्रांना सवय झाली. तरीही आयुष्य थांबत नाही. आता अभिनयाचा पेशा करता येणार नाही. अजून लिहू शकतो. रशियात मी अनुवादित केलेली पुस्तके १९९२ पर्यंत महाराष्ट्रात येतील. यापुढे मॉस्कोत किमान दोन मराठी अनुवादकांना नोकरी मिळेल. मराठी चित्रपटांचा चेहरामोहरा बदलला हे पाहून फार बरे वाटले. नवे दिग्दर्शक, कलावंत काळाच्या गतीबरोबर वेग राखतात हे छान आहे. पहिला मराठी सिनेमास्कोप चित्रपट येतोय. पाण्याखाली घडणारी चित्रपटकथा माझ्यापाशी आहे. किशोरवयीन प्रेक्षकांसाठी दुसरी एक प्रेमकथा आहे.

मॉरिशसहून अद्याप पत्र आले नाही. वालेंतिन अनिसोव यांचे मॉस्कोहून पत्र आले. 'योग्य वेळी भेटू' असे लिहितात.

१९९२ साली पुण्यातील 'कलाग्राम' मध्ये माझे अपार्टमेंट तयार होईल असे म्हणतात. या भारतात पाचशे चौरस फूट जागेचा प्रथमच मालक होईन. रशियाबरोबरच्या निर्यात व्यापारक्षेत्रात काम करण्याच्या शक्यता निर्माण झाल्यात. ही नवी भूमिका मला आवडतेय. नावीन्याचा सोस अजून आहे.

*

